स्वप्नींहि अनय न घडो, अपकीर्ति नसो, असें असेल मनीं
तरि तारील जगत्पति मज सालसं जरि नसेन तन्नमनीं ६३
युद्धास घतासहि जावें; नाहीं ह्मणोंनये वा, हे ॥
माझी असी प्रतिज्ञा सत्या अत्यादरोचिता आहे" ॥ ६४
ऐसें वदोनि राजा सकुटुंब निघोनि गजपुरा आला ॥
त्याला पाहुनि आप्तां थोडा, बहु हर्ष दुर्जनां झाला ॥६५

# अध्याय. ४ था.



## सारांश,

धृतराष्ट्रानें द्यूत खेळण्याकरितां सभागृह तयार करविल्यावर दुसरेदिवशीं त्या सभेंत पांडवांस बोलावून नेलें. नंतर द्यूतास आरंभ झाला. एका बाजूस धर्मराज, व दुसऱ्या बाजूस शकुनि होता. धर्मानें क्रमेंकरून रथ, घोडे, दास, दासी, व द्रव्यराशि असें ऐश्वर्य पणास लाविलें. व शकुनीनें तें कपटेंकरून जिंकिलें. मग धर्मानें क्रमानें आपले पुत्र व बंधु पणास लाविले. नंतर आपणासही पणास लावून घेतलें. व सरशेवटीं द्रौपदीही पणास

१ आळसानें युक्त. २ ईश्वराच्या नमनाविषयीं. ३ अति सत्कारास योग्य.

लाविली. तोही पण शकुनीनें जिंकिला. मग दुर्योधनानें विदुरास सांगितलें कीं, द्रौपदी आमची दासी झाली; यास्तव तूं तिला सभेंत घेऊन ये. विदुरानें असें न करण्याविषयीं त्यास उपदेश केला. पण दुर्योधनानें तो ऐकिला नाहीं. त्यानें प्रातिकामि नांवाच्या सूताला द्रौपदीस आणण्यास पाठविलें. पण त्याच्या हातून तें कार्य झालें नाहीं. मग दुर्योधनानें दुःशासनास सांगितलें कीं, तूं स्वतः जाऊन द्रौपदीला घेऊन ये.

दुसरे दिवसीं नेले पांडु-सुत नव्या सभेंत बाहून ॥
शकुनि "ह्मणे खेळों या" धर्म ह्मणे "अधिक काय याहून[1]"
भीष्म, द्रोण, विदुर, कृप, धृतराष्ट्र; सकर्ण जे शत भ्राते[2]
खळ होते; साधूंचा करणार बळें सभेंत वंभ्रा[3] ते ॥ २ ॥
कपट-द्यूतीं लावी प्रथमचि तो साधु-गीत-कथ रथ[4]; रे ॥
तों शकुनि ह्मणे 'जितिला' तैं थोड्यांचेंचि चित्त न थरथरे ३
मग धर्म लक्ष-दासी- पण मांडी; 'जिंकिला' ह्मणे शकुनी॥
कपटें जिंकू पाहे हंसाला जेंवि दुष्ट बक-शकुनी[5] ॥ ४ ॥
धर्म ह्मणे "छळ[6] करिसी, मर्यादा त्यजुनि टाळिसी फांसे॥

१ 'खेळों' हें तर आहेच. पण याहून अधिक ह्म० पण लावावयाचा आहे काय. २ सकर्ण शतभ्राते. ३ विडंबना. ४ साधूंनीं गाइल्या कथा ज्याच्या तो धर्मराज. ५ पक्षी. ६ कपट.

शकुने, त्यजितां धर्म- व्यवहार-पथासि सत्सभा हांसे" ॥५
"कोणा व्यहारीं छळ नाहीं? दे धरुनि गज-वरा खळगा ॥
भ्यालासि तरि निवर्ते" प्रभुलाहि ह्मणे असेंचि तो खळगा६
राजा ह्मणे "प्रतिज्ञा माझी, नाहीं ह्मणोंनये असि कीं ॥
त्यागीन तिला कां मी यत्त्यागें निष्फळें यशें असिकीं॥७
देवनकर्ता मजसीं मत्तुल्य सभाग्य कोण गा आहे" ॥
धर्म असें सत्य-वदे; तें दुर्मति तो सुयोधन न साहे ॥ ८ ॥
गर्वें ह्मणे "अहो, मी मामाला द्यावया धनें रत्नें ॥
आहें समर्थ, देवन- साहित्य करीन सर्वथा यत्नें" ॥
धर्म ह्मणे "अन्यासीं अन्याचें द्यूत हें विषम वाटे ॥
ऐसेंहि असो; परि परि- णामीं भय सोडितां सुनय-वाटे१०
मणि हार दास दासी रथ हय गज कनकनिधिहि तो लावी
जिंकी कपटी जी श्री, श्रीदे-श्रीशीं विशंक तोलावी॥११
कपट-द्यूत विलोकुनि बिदुर "ह्मणे काय हें आगा रायां॥
कां भ्रमलासि? स्वकरें अग्नि कसा लाविसी अगारा या॥१२
मद्वाक्य तुला न रुचे मरणारा अगदसें अगा, बापा, ॥

---

१ नीतीनें व्यवहार करण्याच्या मार्गाला. २ मोठ्या हत्तीला. ३ खेळापासून मागें फीर. ४ ज्या प्रतिज्ञेच्या त्यागानें. ५ सगळीं. ६ द्यूत. ७ सुनीतीचें आवरण. ८ तो धर्मराज. ९ कुबेराच्या संपत्तीशीं. १० निःसंशय. ११हे धृतराष्ट्रा. १२ घराला. १२ मरणाऱ्याला. १३ औषधासारखें.

पुत्र कसें ह्मणसी या नरकीं नेत्या सविग्रहा पापा ॥१३॥
कोल्हाचि पाळिला त्वां, आरडला उपजतांचि जंबुकसा।
श्रीदं त्यजिले; वरिला अदक्षिणावर्त तुच्छ कंबु कसा१४
मधुतेंचि मूढ पाहे, पाहत नाहीं परी प्रपातातें ॥
त्वां घातली कुरु-कुळीं द्यूत-विष-मयी बरी प्रपा तातें१५
त्यजिले खल सुत कविनीं. पाहुनि तत्संग्रहांत असागं ॥
न्याय्य त्याग अशांचा केवळ अन्याय होय असांग॥१६
भोज-कुळीं कंस तसा याहि कुरु-कुळीं कलंक हा राया॥
नांदोत ज्ञाति सुखें दे आज्ञा पामरांसि माराया ॥ १७॥
तो कृष्ण त्या खळाला, तैसा हा कृष्ण या खळासि वधू
ज्याली असंग्रहार्हा ह्मण गा भूपा अशा मळासि वधू १८
देऊनि काक, घ्यावे पांच तुवां चित्र-बर्ह-शितिकंठ ॥
घे पंचाननें पांच, क्रोष्टा दे; मानवेल शितिकंठें ॥ १९ ॥
राया कुलार्थ पुरुष, ग्रामार्थ कुलहि समस्त सोडावें ॥।

---

१ मूर्तिमान अशाला. २ संपत्तिदायक. ३ डाव्या आंगास भोंवरा ज्याचा तो. ४ पर्वताच्या कड्याला. ५ द्यूतरूप विषानें बनलेली. ६ पाणपोई. ७ त्या दुष्टपुत्रांच्या ठेवण्यामध्यें. ८ मोठा अपराध. ९ यथायोग्य. १० त्याग न करणें. ११ नीचाला. १२ अर्जुन. १३ संग्रहास अयोग्य अशाला. १४ चित्रविचित्र वर्णाचे पंख ज्यांचे असे मयूर. १५ सिंह. १६ कोल्हा. १७ शंकर.

१८ त्यजेदेकंकुलस्यार्थे ग्रामस्यार्थे कुलंत्यजेत् ॥
ग्रामंजनपदस्यार्थे आत्मार्थे पृथिवीं त्यजेत् ॥

अर्थ—एका पुरुषामुळें कुलाचा नाश होत असल्यास त्या पुरुषाचा त्याग करून कुल रक्षावें. इ०

ग्रामहि देशार्थ, मही आत्मार्थ, बुधें भलेंचि जोडावें॥२०
भाग्यें येउनि बसले स्वर्ण-ष्ठीवी[1] निजालयीं[2] पक्षी ॥
आमिष-लोभांऽध[3] परम पामर कोणी तशा खगा भक्षी ॥
मग तळमळे रडे बहु तो आपण आपला करुनि घात ॥
तैसेंच तुजहि घडतें हो सावध आवरीं नृपा हात ॥२२॥
धन-लोभें नुमजे परि तूं ह्मणसील 'क्षण-क्षणीं मग हा[4] ॥
आमिष-लोभांऽध जसा तो पश्चात्तप्त मंद-धी खगहा[5]॥२३
माळाकार[6] तरूंचें घेतो फळ पुष्प जेंवि तेंवि नृपा ॥
घे पांडुसुतांपासुनि वित्त, असोंदे मनांत पूर्ण कृपा॥२४॥
धन-लोभ धरुनि चित्तीं द्यूतें चरणाश्रितां न गांजावें ॥
त्वां नरकासि न घेउनि संगें स्व-सचिव-सुताऽनुगां[7] जावें
ऐका हो सर्व तुह्मी या रायाचें करूनि हित वांचा ॥
साधुच्छळें कुळ-क्षय कीर्ति-श्री-भंग संग कितवांचा[8] ॥२६॥
शकुनि कुनीतिज्ञ[9] कुमति येथुनि आतांचि या खळा दवडा॥
हा न भला बुडवाया शिरलाया राजमंदिरीं कवडा[10]" २७
इत्यादि विदुर बोले तें ऐकुनिही अचक्षु[11] तो न वळे ॥

---

१ सुवर्ण ओकणारे. २ आपल्या घरीं. ३ मांसलोभानें अंध झालेला. ४ हायहाय. ५ पक्ष्याला मारणारा. ६ माळी. ७ आपले प्रधान, पुत्र व सेवक यांना. ८ शठांचा. ९ कुमार्ग जाणणार. १० हा एक पक्षी आहे. हा घरांत शिरला असतां अशुभदायक असें मानिलें आहे. ११ अन्ध, धृतराष्ट्र.

दुर्योधन पंचाऽक्षरि-मंत्रें परमोग्र- भूतसा खवळे ॥ २८ ॥
जनकाहूनि परम हित परें महितें ज्ञान-सिंधु जो त्यातें ॥
धिक्कारी; उडवी त्या स्व-शिव-गृहाधार-भूत जोत्यातें २९
"विदुरा, उगा उगा गा मेळविलें बुडवितोसि यश कां गा
कोण तुला पुसतो कीं अजि आह्मां नेणत्यां स्वहित सांगा
निपुण असेल निजहितीं करिल पराचेंहि तोचि धीर हित
स्वामि-द्रोह-रता तुज काय कळे तूं प्रसिद्ध धी-रहित ॥
तूं पोशिलासी सादर सतत जसा आत्मकाय मत्तातें ॥
निंदिसि सभेंत दुष्टा कर्म विसरलासि काय मत्ता तें ३२॥
अस्मदहितहित इच्छिसि लाविसि आह्मां इहांत बालिशता
वाचाल कृतघ्न कुटिल भरतकुळीं तूंचि पात्र गालि-शता
राज-सभेंत वदावें कैसें तें न शिकलासि अभ्यासीं ॥
चतुरपण परम दुर्मिळ तुज परिचय न घडलाचि सभ्यासीं
तुज काय राज-नीति- ज्ञान? अरे साप दुखविला साचा ॥
मृत्यु तसाचि सपत्नहि कैंचा मग लाभ सुख-विलासाचा॥
शत्रुच्छेद करावा करितों कां लावितोसि अन्याया ॥

---

१ पिशाच्च आंगांतून काढऱ्याचे मंत्र ज्यास येतात तो. २ भयंकर पिशाच्या सारखा. ३ अत्यंत. ४ मान्य. ५ आपलें कल्याण, हेंच गृह. त्याला आधार झालेला. ६ चौथ्याला (विदुराला) ७ राजद्रोहाविषयीं तत्पर. ८ बुद्धिहीन. ९ पोशिला गेलास. १० अस्मद्-अहित-हित ह्म० आमच्या शत्रूचें कल्याण. ११ मूर्खपणा १२ शिव्यांच्या शतकाला.

आम्हींच साहतों न दु -रुक्ति तुझ्या सोसतील अन्या या
जों मृदु लागे तों तों दडपी शिशु फार ऊन भातातें ॥
तैसें न करावें त्वां न बसावें हारवूनि भा[1] तातें ॥ ३७ ॥
शास्ता एकचि, न दुजा, गर्भी[2] जीवासि जो[3] शिकवितो रे
करितों तच्छिक्षित मी बैस उगा तूं न होसि कवि तोरें[4]
हित[5]-शत्रु निकट[6] न बरा जा त्यांप्रति दयित[7] जे तुलाअसती
टाकुनि जातीच बहु प्रेमें जारि सतत सांत्विली असती[8]"३९
विदुर ह्मणे "न धरील श्रोत्रियवचनें[9] सदाचरण कुलटा॥
टाकावितां दुर्व्यसन द्वेषें इच्छील घात ती उलटा ॥४० ॥
बोध प्रगल्भ[10] हा जारि न करायाचा स्व-धर्म-हानि बरा ॥
परि कुरु-वर-मति न वरी नवरी जैशी वरा[11] महानिबरा[12] ४१
अप्रिय[13] परि पथ्य असे वक्ता श्रोताहि दुर्लभ स्पष्ट ॥
बहु सुलभ प्रिय-वदते वाढविती चुकविती न ते कष्ट ४२
सुप्त-व्याघ्रांसि[14] नको लावूं दाटूनि शृंग परिणामीं ॥

१. तेज. २ उत्पत्तिकालीं. ३ ब्रह्मदेव. ४ गर्वानें. ५बाह्याकारीं हित असून अंतर्यामी शत्रु.६ समीप. ७ प्रिय.८ जारिणी. ९ वेदवेत्त्या ब्राह्मणाच्या वचनानें.१०प्रौढ.११पतीला. १२अतिजरठाला.

१३ अप्रियस्यहिपथ्यस्य वक्ता श्रोताच दुर्लभः ॥
लभ्यते खलु पापीयान्नरः सुप्रियवागिह ॥
अर्थ–न आवडणारें,पण हितकारक, असें वचन बोलणारा व तें ऐकणारा विरळा. परंतु मधुर बोलणारा व पापप्रवर्तक पुरुष अनायासानें सांपडतो. १४ निजलेल्या वाघाला.

संकट पडेल म्हणतों   काय अहित हे मदांध[1]-हरिणा मी ॥
स्पष्ट हित अहित कथिता   जो होय, सहाय तोचि रायास
प्रियवाग् नर कीं नरकीं   भोगवितो भोगितो चिरायास[2] ॥
सदय हित-काम जो त्या  असमंजस कर्म पाहवेना गा ॥
कैसें लावूं द्यावें   पद, ज्या लंघन न साहवे नागा[3] ॥ ४५॥
भ्रातृ[4]-हितेच्छु बिभीषण   पावे धिक्कार कीं परम हाही[5] ॥
खळ बहु खोटा, त्यासमं[6]  म्हणति किती कवि भलां[7] पर महाही
शकुनि म्हणे "धर्मा त्वां   हारविलें धन समस्त कीं आहे"
या वचनांसि न पुच्छीं   दत्तें[10] पदाला भुजंगसा साहे ४७॥
"काय पुसससि रे  अयुत  प्रयुत तथा शंकु पद्म अर्बुद कीं
खर्व निखर्व, समुद्रांहि[11]   पूर्ण धनी मी; जसा उदधि उदकीं
हा ग्लह[12] माझा, शकुने,  हूं खळ; च्छळ नको करूं होगा[13] ॥
कपटें यम-दूत-वृक-  व्याघ्रां-मध्यें न कोकरूं हो गा" ॥४८

१ गर्वानें अंध झालेल्या हरिणा, दुर्योधना. २ दीर्घकालपर्यंत श्रम. ३ सर्पाला. ४ बंधूचें हित इच्छिणारा. ५ हा विदुरही. ६ त्या खळा सारखा. ७ किती कवि, महाहि त्या सम म्हणती. पर, महाहि भला.

सर्पदुर्जनयोर्मध्येवरं सर्पो न दुर्जनः ॥
सर्पो दशति कालेन दुर्जनस्तुपदे पदे ॥

अर्थ--सर्प व दुर्जन यांत सर्प बरा. कारण तो काळें करून एकदा दंश करितो. पण दुर्जन पदोपदीं दंश करितो. ८ परंतु. ९ महासर्प. १० दिलेल्या पाउलाला. ११ धनांनी पूर्ण असा समुद्र. १२ पणास लावण्याचें द्रव्य. १३ आक्रम शक्ति हीन.

ऐकुनि ह्मणे जितं[1], तो मत्स्यातें बक जसा खळ पणातें ॥
ग्रासी उपमाचि नसे दुसरी त्याच्या विशृंखळ[2]-पणातें ॥५०
"वृष हय धेनु अजा[3]ऽविक हें धन म्यां लाविलें" ह्मणे धर्म
तों तो 'जितं' ह्मणे हो होय भरत-कुळसभेंत हें कर्म५०॥
वर्जुनि विप्रधन, सकळ पुर-जन[4]-पद-भू अविप्र[5]-पुरुष असें
हें शिष्ट[6] मद्धन ह्मणे धर्मात्मा भाषि तें चुकेल कसें ॥५२॥
दुर्जन 'जितं' ह्मणे हो, मग सर्व अमूल्य निज-कुमार-मणी
द्यूतीं लावी, जिंकी त्या नियति[7], जसी हरा[8] उमा रमणी॥
मग धर्म वदे, "सिंह-स्कन्ध[9] युवा[10] श्याम[11] दीर्घ-भुज नकुळ
हें माझें धन, जेणें धन्य ह्मणे कुरु-कुळासि सुजनकुळ"॥
"इदमपिधनं[12]जितं ते" शकुनि ह्मणे, दीप्त-पावक[13] पटानें[14]॥
बांधी मणि[15]-भ्रमें बहु फुगला मलिन-स्वभाव[16] कपटानें॥५५
धर्म ह्मणे "गा शकुने, न कुनेत्रें[17] जाय रूप; कु-ज्ञानें[18]॥
ज्ञानासि लोचनाहुनि फार जपावें ह्मणोनि सु-ज्ञानें ॥५६
सद्गुण-मण्डित पण्डित दण्डि[19]तपस्व्यीड्य सद्विवेक[20]पिता ॥

१ जिंकिलें. २ निर्भयपणाला. ३ बकरे व मेंढरें. ४ पुर, व जनपद ह्म० देश, ह्यांतील. ५ विप्रावांचून इतर ह्म० क्षत्रियादिकांचें. ६ शिलक. ७ दैव. ८ शंकराला. ९ सिंहा प्रमाणें खांदा ज्याचा तो. १० तरुण. ११ सुंदर. १२ हेंही तुझें धन जिंकिलें. १३ प्रज्वलिताग्नि. १४ वस्त्रानें. १५ रत्नाच्या भ्रांतीनें. १६ कपटी प्रकृति ज्यांची तो. १७ वाईट डोळ्यानें. १८ कुत्सित ज्ञानानें. १९ संन्यासी व तपस्वी यांनीं स्तविलेला. २० सद्विचारांचा जनक.

सहदेव ग्लह[1] माझा  स्वप्नींहि न यन्मना[2] शिवे कापितां"॥
"त्वद्बन्धु-रत्न हेंही  द्यूतीं म्यां जिंकिलें" ह्मणे शकुनी॥
साहे महाऽपराधाहि  दण्ड खळाला करावया शकुनी[3]।५८
ग्लह केले माद्री-सुत  परि आतां परम कठिन[4] वाटेल ॥
सोदर[5]भीमधनंजय-  पण करितां कण्ठ फार दाटेल ॥५९॥
धर्म ह्मणे "मी ह्मणतों ' मूर्ति-धर[6] बहिश्चर[7] स्व असु यांतें॥
शकुने परुषोक्तीतें[8]  भ्याल्या श्रुति[9], कांपतील न सुयांतें६०
सर्व अनिष्ट करावें  शकुने त्वां कीं परेंहि अन्त-रतें ॥
परि न वदावें बन्धु-  प्रेमीं जेणें पडेल अन्तर तें" ॥६१॥
शकुनि ह्मणे" कौंतेया,  द्यूतीं कितवप्रलाप[11] बहुतर, ते ॥
वदते हित मित, कितव  व्यसनीं बुडते कशास? बहु तरते
ज्येष्ठ श्रेष्ठ नृपा तूं  न धरावे बोल हे मनीं कांहीं ॥
द्यूतीं बहु कितवांहीं  बडबडिजे संगरीं अनीकांहीं[12] ॥६३॥
धर्म ह्मणे "ग्लह केला  अर्जुन, जरि योग्य हा न या कामीं
शकुने याच्या तेजें  झालोंसें विदित फार नाका[13] मी ॥
"तो जिंकिला" ह्मणे खळ,  बसला मूळींच नागवाया ६४
कीं भेटला कपट-मिष  साक्षात् कोल्हाचि नागवा याला ॥

---

१ पणास लावावयाचें द्रव्य. २ ज्या सहदेवाच्या मनाला. ३ माकडचेष्टा. ४ समर्थ असून. ५ सख्खे बंधु, भीम व अर्जुन यांचा. ६ देहधारी. ७ शरीरा बाहेर फिरणारे. ८ कठोर भाषणाला. ९ कान. १० नाशा विषयीं नम्र. ११ जुवेबाज लोकांची बडबड १२ सैन्यांनीं. १३ स्वर्गाला.

धर्म ह्मणे "पण केला आतां, ज्याच्या कृतान्त भी महिम्या
अमितबलं सन्नतं-भ्रू तिर्यक्-प्रेक्षी गदोंद्र भीमहि म्यां"६६
शकुनि ह्मणे "याहि पणा जिंकुनि पण विजय-तत्पर मदक्ष
धर्मा, ग्लहांऽतरांची वाट पाहताति हे परम दक्ष ॥६७॥
सुत बन्धुहि हारविले, उरलें धन काय गा पणास हित"
धर्म ह्मणे "मी द्यूतीं बुडविन सर्वस्व आपणा-सहित"६८
धर्मासहि जिंकी खळ, कपटजयें परम अक्षमहि माते ॥
जे व्यसन टाकणारे बुध हा ऐकोत अक्ष-महिमा ते ॥
शकुनि ह्मणे "चुकलासि ग्लह-योग्यहि संग्रहीं असोनि धन
जिंकोनि घेतलें कां? समयीं चुकणें नसो, असो निधन ॥
घे आपणासि राया, सोडवुनी द्रौपदीस लाव कसा ॥
श्रीचा कैवारी नृप धन्य, स्त्रीचा सदैव लावकसा, ॥७१॥
धर्म ह्मणे "शकुने, जी रूपें श्रीला, क्षमा-गुणें महिला, ॥
साजे सखी अविन्ना कृत्य-भरें सुमति आमुची महिला ॥

---

१ अमर्याद सामर्थ्य ज्याचें तो. २ कामान दार भिवया ज्याच्या तो. ३ वक्र पाहणारा. ४ गदाधरांमध्यें श्रेष्ठ. ५ विजय मिळविण्यास दक्ष. ६ माझे फांसे. ७ दुसऱ्या पणाची. ८ निपुण. ९ उपयुक्त. १० असमर्थ. ११ उन्मत्त होई. १२ फाशांचा पराक्रम. १३ मृत्यु. १४ लावक पक्ष्यासारखा. हा पक्षी स्त्रीचा फार लोभी असें ह्मणतात.

शरदुत्पल[1]-पात्रोऽक्षी शरदुत्पल[2]-पुण्यगन्ध-सम-गन्धा ॥
अस्खलित चालवी गृह- धर्मीं मज, यष्टि तसि पथीं अन्धा
आली मख[3]-वेदीच्या जी द्रुपद[4]-सुकृत-भरास्तव कुशीला ॥
वाटो बरा सुशीला[5] वाटेल न हा बरा स्तव[6] कुशीला[7]॥७४॥
आधीं जिणें उठावें, पाहुनि निजलों असें मग निजावें॥
रागे[8]जणें सु-दुर्मिळ तेंहि[9] जिचें उंवालसें[10] गगनि जावें ॥७५
धौम्यापासुनि गोपां- पर्यन्त जिनें स्वयें समाचार ॥
घ्यावा श्रित-तापहर[11] श्री-गंगेचा जिचा सम[12]चार ॥ ७६ ॥
ती देवी आतां म्यां या द्यूतीं लाविली, अहाहा ! रे ॥
छळिसी[13],द्यूतींच कसा हारे?अन्यत्र कां न हो[14]हारे?"७७॥
धर्म नय[15]ज्ञोत्तम जो द्यूतीं स्व-कलत्र[16]-रत्न तो लावी ॥
हांसे 'जितं' ह्मणे खल, कविहो, तीं गोष्टि काय बोलावी
धिक् धिक् सभ्य-जन ह्मणे,विदुर अधो-वदन बैसला उगला[17]
भीष्म द्रोण ह्मणति"हा,भाच्यांसह शकुनि जय-सुखें फुगला

---

१ शरदृतूंतील कमलपत्राप्रमाणें नेत्र जिचे ती. २ शरत्कमलाचा सुगंध, त्या प्रमाणें जिचे शरीराचा सुवास आहे ती. ३ यज्ञकुंडाच्या. ४ द्रुपद राजाच्या विशेष पुण्यामुळें. ५ सुस्वभावाच्या पुरुषाला. ६ स्तुति. ७ दुर्जनाला. ८ रागावणें. ९ कचित्. १० अग्निज्वाले सारखें. ११ आश्रितांचें दुःख हरणारा. १२ एक आचरण. १३ कपट करितोस. १४ हा धर्म, अन्यत्र कां नहारे? द्यूतींच कसा हारे ? यास्तव छळिसी हें स्पष्ट. १५ नीतिनिपुणांत श्रेष्ठ. १६ स्त्रीरत्न. १७ स्तब्ध.

"किं जितमिह? किं जितमिह" ऐसें असकृत् पुसे अचक्षु रसें
रडले सभ्य, तयांच्या हृदयीं तें लागलें वचं क्षुरसें ॥८०॥
सखिहस्तीं हस्त न नृप पांडवहृदयांत सायकां मारी ॥
क्रोधा तें भीम गिळी. गरळातें जेंवि काय कामांऽरी॥८१॥
अन्धसुत ह्मणे "विदुरा, कृष्णा दासी, सभेसि आणावी
गृहसम्मार्जन करणें, हे सेवा तीस योग्य जाणावी" ॥८२
विदुर ह्मणे "शस्त्र वधी गिळितां तत्काळ, बोकडाला हें॥
तैसेंचि कर्म करिसी, रे मन्दा न मृत्यु रोकडा लाहें॥८३॥
हरिच्या पुनःपुन्हा कां काड्या नकांत घालिसी शशका
यश काय पक्षि-पतिचें येइल हे चार करूनि तुज मशका
ब्रुयात् क्षमी गभीरोऽसीति बत युधिष्ठिरं प्रभुं को न ॥
निज नीचपण प्रकटिसि तूं श्वान भल्यावरीहि भुंकोन८५
पांडव किमपि न वदती तूं वदसि सभेंत शब्द घाणेरे ॥

---

१ या द्यूतांत काय जिकिलें हो ! या द्यूतांत काय जिंकिलें. २ वारंवार. ३ अंध, धृतराष्ट्र. ४ आनंदानें. ५ भाषण. ६ वस्तऱ्या सारखें तीव्र. ७ मित्र जो कर्ण, त्याच्या हातावर. ८ राजा दुर्योधन. ९ बाणाला. १० शंकर. ११ दुर्योधन. १२ घरांतील झाडसारवण. १३ मूर्खा. १४ धर्मरूपी सिंहाच्या. १५ दुर्योधनरूप सशा. १६ धर्म रूपी गरुडाचें. १७ चेष्टा. १८ दुर्योधन रूपीचिलटा. १९ " त्वं क्षमी, गभीरः असि " इति बत कः न युधिष्ठिरं प्रभुं ब्रुयात् ! " तूं क्षमाशील व गंभीर आहेस " असें कोण बरें धर्मराजाला ह्मणणार नाहीं ?

हे सकळ-खळ-तिळांचे रगडुनि करणार पिष्ट घाणे रे"८६
दुर्योधन हित कथितां धिक्कार तुला असो असेंच वदे ॥
ज्वारितां जसें सासितें-पय सद्वचन न दुर्जना तसें चव दे ॥
कल्यंशं खळशिरोमणि कपटपटु कटु- स्वभाव सद्द्वेषी ॥
तो प्रातिकामि-नामक सूतातें द्रौपदीप्रति प्रेषी ॥ ८८ ॥
"सूता जा कृष्णेला घेउनि ये भय नसे तुला लेश ॥
सर्वज्ञ न किंचिज्ज्ञ क्षत्ता; ब्रह्मा नव्हे कुलालेश ॥ ८९ ॥
बहु कातर विदुर सदा वट वट करितो अशींच हा नीच ॥
या खोट्याला गमते जी अस्मद्‌-वृद्धि ती स्वहानीच"९०
जाउनि तो सूत वदे "कृष्णे द्यूतांत तूं स्वयें धर्में ॥
हारविलीस; सुयोधन- सदनाप्रति ये करावया कर्में"॥९१॥
हें वाक्य त्या सतीतें बहु दुःसह जेंवि वज्र कदलीतें ॥
परि परिसावें धैर्यें त्यासी जें ती सु-बुद्धि वदली तें ॥९२
"सूता काय वदसि हें द्यूतीं हारविति संपदेतें गा॥
श्री म्हण, न स्त्री म्हण; हें त्वद्वचन मनास कंप देतें गा"
सूत म्हणे "आधीं श्री मग साऽत्मज- बधु-मंडळी धर्में ॥

---

१ रोग्याला. २ शर्करायुक्त दुग्ध. ३ कलिपुरुषाचा अंशावतार दुर्योधन. ४ अल्प ज्ञाता. ५ सूत, विदुर. ६ कुंभाराचा नायक. ७ भित्रा. ८ आमचा उत्कर्ष. ९केळीला. १० बुद्धिमती द्रौपदी. ११ पुत्रांसह. १२ संपत्तीला.

हारविली निजमूर्ति द्यूतीं स्त्री शेवटीं असत्कर्में" ॥९४॥
राज्ञी ह्मणे "तरि अगा, जा पूस सभेंत तूं असें आर्या ॥
राजेंद्रा हारविली प्रथम द्यूतीं स्व-मूर्ति कीं भार्या"॥९५॥
सूत सभेंत विचारी धर्मातें कीं "असें पुसे आर्या ॥
राजेंद्रा हारविली प्रथम द्यूतीं स्व-मूर्ति कीं भार्या"॥९६॥
धर्म न कांहींच वदे तों दुर्योधन ह्मणे "सभेस तिनें ॥
यावें स्वयें पुसावें जें पुसणें योजिलें तिच्या मतिनें ॥ ९७
कृष्णे प्रति सूत ह्मणे "देवि न कांहींच धर्म वदला गे ॥
जाणो सभासदांसिहि कठिन त्वत्प्रश्नवाक्य-पदें[१] लागे ॥
दुर्योधन वदला कीं त्वांचि पुसावें सभेंत; डोलेल ॥
त्वत्प्रश्न-श्रवण-सुखें, तुज पाहुनियां यथार्थ बोलेल॥९९॥
बहुधा सभेंत तुजला नेईल क्षुद्र-बुद्धि गांजाया ॥
नसतां उपाय कांहीं आग्रह करिशील तूंहि कां जाया"॥
कृष्णा ह्मणे "समर्थ न कोणी ही सुज्ञ भावि टाळाया ॥
जेंवि विधु[२] राहु येतां पर्वीं[३] आत्म-प्रभा[४] विटाळाया ॥१०१
रक्षील धर्म समयीं धरिती त्याचाच भरंवसा सु-कवी ॥
आर्जविला असतां तो स्व जन-व्यसनासि[५] निश्चयें चुकवी१०२
भरत-कुळ-धर्म न बुडो सभ्यांला पूस एकदां जा गा ॥
तन्मत मान्य मला कीं, नय तच्चित्तीं[६] असे सदा जागा ॥१०३
पुनरपि सभेंत जाउनि सूत ह्मणे "सभ्यहो तुह्मांस सती ॥

१ तुझ्या प्रश्नवाक्यांतील शब्द. २ चंद्र. ३ पूर्णिमेस. ४ आपली कान्ति. ५ आपल्या भक्तांच्या संकटाला. ६ सभ्यांच्या मनांत.

द्यूतांत मी जिता कीं, अजिता, ऐसें मदाननें पुसती १०४"
दुर्जन-दुराग्रहांचे ज्ञाते सभ्यहि न पहातीच वर ॥
तेथें उत्तर कैंचें न चलेसें न वदती कवि-प्रवर ॥ १०५ ॥
जाणुनि संकट धर्में दूत-मुखें कळविलें स्व-जायेतें ॥
कीं, श्वशुरासि, शरण ये, गुरु कवच, व्यसन उग्र ज्या येतें
सभ्य न वदती कांहीं पांडवही मूक-बधिर-सम गमती ॥
पाहुनि असें सुयोधन बोले जो सत्पथोपरमगमती॥१०७॥
"तीतेंचि आण जा रे ती कां स्वमुखें पुसे न येऊनी ॥
सभ्य-जनीं हित-पृच्छक सीतार्तहि कोण गा नये ऊनीं१०८
सभ्यानीं प्रश्नोत्तर योजावें नीट, कीं न योजावें ॥
आर्तें वैद्य-गृहाला, गुण यो कीं प्राक्तनें नयो, जावें"१०९
मत्तें श्व-यूथेंप श्वा सिंहीप्रति धाडितां धरायाला ॥
जाईल कसा? तैसा सूतहि भी कर्म तें करायाला॥११०॥
तांतड करी सुयोधन, परि सूत पुन्हा ह्मणे" अहो; सभ्य
काय वदों प्रश्नोत्तर कृष्णेला कां न होय हो लभ्य" १११
कोपें ह्मणे सुयोधन "भीतो भीमासि सूत हा भितरा ॥
दुःशासना, स्वयें जा आण तिला; कर्म हें नव्हे इतरा"१२

१ माझ्या मुखानें. २ दुष्टाच्या दुराग्रहाला. ३ न चालणारें असें. ४ मुके व बहिरे यांसारखे. ५ सत्पथ-उपरमग-मती ह्म० सन्मार्गाच्या नाशाला गेली, बुद्धि ज्याची तो. ६ थंडीनें कांकडलेली. ७ उनांत. ८ रोगग्रस्तानें. ९ कुत्र्याच्या कळपाच्या नायकानें. १० कुत्रा.

# अध्याय ५ वा.



## सारांश.

दुःशासनानें द्रौपदीला सभेंत ओढून नेलें. द्रौपदीनें दुःशासनाची तसें न करण्याविषयीं विनवणी केली. व त्यास नीतीचा उपदेशही केला. पण तें सर्व व्यर्थ गेलें. सभेंत नेल्यावर द्रौपदीनें भीष्मादिकांस आपण जित किंवा अजित असा प्रश्न केला. पण सर्व स्तब्ध बसले. धृतराष्ट्राचा पुत्र विकर्ण मात्र स्पष्ट बोलला कीं, द्रौपदी जिता नाहीं. पण कर्णानें त्याचा उपहास केला. व दुःशासनाला पांडवांचीं व द्रौपदीचीं वस्त्रें हिरावून घेण्यास सांगीतलें. दुःशासन वस्त्र फेडण्यास प्रवृत्त झाला, त्यावेळीं द्रौपदीनें भक्तवत्सल श्रीकृष्णाचा धांवा केला. तेव्हां श्रीकृष्ण भगवान् धांवून आला. व त्यानें गुप्त रूपानें द्रौपदीस वस्त्रें पुरविलीं. आणि तिच्या लज्जेचें रक्षण केलें. पांडव कांहीं बोलले नव्हते. परंतु भीमास कोप सहन न होऊन तो सभेमध्यें उभा राहिला व त्यानें प्रतिज्ञा केली कीं “ हे राजे हो, जर मी दुःशासनाचें त्हृदय फोडून त्याचें रक्त प्यालों नाहीं तर मला पूर्वजांस झालेली उत्तम गति मिळणार नाहीं. ”

नंतर विदुर ह्मणाला, द्रौपदीच्या प्रश्नाचें उत्तर द्या. सत्याचा लोप करूंनका. सत्याचा लोप केला असतां, तुह्मांस अधःपात

प्राप्त होईल. त्यावर भीष्म ह्मणाला. धर्माची गति फार सूक्ष्म आहे. या करितां आह्मांस यांत अमुकच सत्य, असें स्पष्ट सांगतां येत नाहीं. या प्रसंगीं धर्मराज बोलेल तेंच प्रमाण.

---

तो हरिणीहरणार्थी अत्युग्रप्रकृति लांडगा साच ॥
गेला तेंचि कराया दुःशासन दुष्ट दांडगा साच ॥ १ ॥
कृष्णेशि "ह्मणे चाल द्यूतीं तुज जिंकिलें भजं कुरुतें ॥
कुरु-पातिस पहा, लज्जा त्यज, सेवावें तुवां शत गुरुतें"२
त्या दुष्टोक्ति-श्रवणें धर्माची संकटीं पडे जाया ॥
संरक्षणाऽर्थ धांवे धृतराष्ट्राच्या स्त्रियांकडे जाया ॥ ३ ॥
पळतां धांवोनि तिला त्या केशांतें धरूनि आकर्षी ॥
ज्यां राजसूय-यज्ञीं अभिषेकिति बहु महर्षि नाकर्षी ॥४॥
कृष्णा ह्मणे, "सभेंत न न्यावें मज, मी रजस्वला, आंगा
आच्छादन एकांबर, नेतोसि असीस आग्रहें कां गा"५॥
दुष्ट ह्मणे "स्व-सभेला तुजला नेतोंचि, दूरसी अस कीं ॥
एकांऽबरा अस, तुझीं अंगें नग्नें असोत कीं असकीं"॥६॥
देवी ह्मणे "अनार्या नाहीं तुझिया मनांत पाप-दर ॥

---

१ अति क्रूर स्वभावाचा. २ सेवन कर. ३ दुर्योधनास. ४ महा तपस्वी असे ब्राह्मण. ५ स्वर्गांतील ऋषि नारदादि. ६ एक वस्त्र. ७ रजस्वला. ८ सर्व. ९ पापभीति.

ओढूं नको फरफरा घेऊंदे सांवरूनि हा पदर" ॥ ७ ॥
अधम ह्मणे "द्यूत-जिता दासी, तूं लाजसी कशला गे ॥
चाल उगीच, प्रभुशीं हट करितां पाठिशीं कशा लागे"८
कृष्णा ह्मणे "पति कसें पाहुनि हें कर्म साहतील?नद्या ॥
पद सर्प- शिरीं; तुमच्या रक्ताच्या स्पष्ट वाहतील नद्या९
गुरु-जन- सभेंत कैसा नेसी ओढूनि कायें हा नीचा! ॥
करितोसि कर्म दुष्टा प्राप्त्यर्थ बळेंचि कायहानीच्या १०॥
धर्म परम सूक्ष्म असे धर्मात्मा धर्मनृप नसे चुकला ॥
सावध व्हा, कंठीं यम- पाश कसे घालितां?अहा उकलाँ"
ओढुनि सभेंत नेली तेव्हां ती द्रौपदी ह्मणे "कुरुची ॥
कीर्ति बुडाली, हा धिक् कुरु-वृद्धांलाहि मानली कु-रुची ॥
हा!भीष्म द्रोण कसे न ह्मणति हे सहज-मित्र सत्व रहा ॥
अन्यायें बुडणार व्यसनीं कुरु-राज-वंश सत्वर हा ॥१३॥
अन्यायाऽचल भिदुरें विदुरें अनवरत-शुद्ध-सत्वरतें ॥
जाऊं दिलें कसें? जें गेलें सोडूनि सख्य सत्वर तें ॥१४॥
कारुण्यरसें भरले होते, जे दुर्बळाशि उद्धरिते ॥
झाले कसे अकस्मात् ते केवळ कुरुगुरु प्रबुद्ध रिते"॥१५॥
प्रेरियले भेदाया पतिधैर्यद्विरदकंट कटाक्ष तिनें ॥

१ चाबूक. २ देह. ३ शरीरनाशाच्या. ४ उलगडून काढा. ५ दुष्ट आवड. ६ अन्यायरूपी पर्वताचें भेदक वज्र अशा विदुरानें. ७ निरंतर शुद्धज्ञानांत निमग्न, अशानें. ८ पाठविले. ९ पतीचें धैर्य हाच द्विरद ह्म० हत्ती, त्याचा कट ह्म० गंडस्थान.

प्रथम न ह्मणती श्रीच्या ह्मणती स्त्रीच्याचि कटकटा[1] क्षतिनें[2]
पेटे पांडवकोपा-[3] ऽनल कृष्णादृष्टि[4] होय तद्धमनी[5] ॥
करितील काय होते निजमर्यादागुणें[6]चि बद्ध मनीं ॥१७॥
दुःशासनासि ह्मणती "भीमादिक निजमनांत[7], हे बाल ॥
हूं सुप्त सर्पिणीतें मेली मानूनि ओढ हे बाल[8]" ॥
केश धरुनि दुःशासन तीस वळें फिरफिरोनि दे हिसके ॥
भावितमः[9]प्रशमीं न क्षमे[10]ही होऊनि तेज[11] देहि सके[12] ॥१९॥
'दासी, दासी, ऐसें असकृत् तो खळ ह्मणे सहासें[13] तितें ॥
जाणों क्षमालि[14] शिकवी "जेंजें अरि करिल तूं सहा सतितें"
'दासी, दासी, ह्मणतां दुर्योधन कर्ण शकुनि मानवंती[15] ॥
हांसति खळ, सभ्य रडति, दुष्टें छळितां सभेंत मानवंतीं[16] २१॥
गांगेय ह्मणे "सुभगे धर्म परम सूक्ष्म यास्तव स्पष्ट ॥

---

१. हाय, हाय. २ नाशानें. ३ पांडवांचा क्रोधरूप अग्नि. ४ द्रौपदीचे कटाक्ष. ५ त्या अग्नीची फुंकणी. ६ आपल्या मर्यादारूप रज्जूनें. ७ हे बाल ह्म० हे मूर्खा. ८ केश. ९ पुढें होणाऱ्या अनर्थाच्या नाशाविषयीं. १० समर्थ. ११ पराक्रम. १२ नसके. ह्म० समर्थ झालें नाहीं. पुढें होणारा वस्त्रहरणरूप अनर्थ टाळण्या सारखें तेज द्रौपदीच्या आंगीं होतें, पण तिनें तें प्रकट केलें नाहीं. १३ उपहासपूर्वक. १४ क्षमा हीच आलि ह्म० सखी. १५मान्य करिती. १५ सन्मान्य स्त्री. १६ हे सौभाग्यसंपन्न स्त्रिये.

ऐसेंचि असे मजला वदवेना हा विचार बहु कष्ट ॥२२॥
वदला 'जितोऽस्मि, ऐसें धर्म; शकुनिनें तयावरि स्व-मतें
पण करविला तुझा, या वरुनि तरि न तूं जिता असेंगमतें॥
द्यूतांत परस्वं-पण स्थापाया निःस्वं-जन नव्हे शक्त ॥
स्त्रीचें भर्तृ-वशत्वहि पाहोनि न मी वदों शकें व्यक्त २४
कुरु-वृद्ध असें बोले उपहासें ताप ते कितव देती ॥
सभ्यांसि निर्णयार्थ प्रार्थुनि पुनरपि अशंकित वदे ती२५
"द्यूतीं अनति-निपुर्ण-नृप कितवांनीं आणिला बळेंचि कसा
दाउनि कर्पूर जसा घालावा लोचनीं बळें चिकसा ॥२६
केलें तसेंचि; हरिलें कपटें सर्वस्व शेवटील पणें ॥
नृप जिंकिला शकुनिनें याला नरकींच शेवटीं लपणें २७
केलें स्वं-परिभवांत द्यूत; पुन्हा भूप लाउ दारं-पण ॥
या बुद्धिनें शकुनिनें दाखविलें आपुलें उदारपण ॥ २८॥
ऐसें असतां द्यूतीं अजिता मी कीं जिता? करा सवदां ॥
पण्याचा; पुशिलें हें सत्य पहा, जोडित्यें करास, वदा२९
कुरु-गुरुं-वचन तसें जरि संदिग्ध वदाल, तरि न भागावें॥
अजि सभ्य हो जरि गुरुहि न हरी संदेह तरि नभां गावें"
न वदे कोणीहि किमपि दुःशासन घाबरी करी तीतें ॥

१ मी जिंकिला गेलों. २ दुसऱ्याच्या द्रव्याचा पण. ३ निर्धन. ४ पतीच्या स्वाधीन असणें. ५ भीष्म. ६ फार निष्णांत नव्हे; अर्थात् कच्चा. ७ आपला पराभव होई पर्यंत. ८ स्त्रीचा पण. ९ व्यापार. १० भीष्मवचन. ११ आकाशाला.

तद्रीति सम कवि ह्मणो ग्राम[1]-हरीच्या बरीक[2] रीतीतें ३१
तें पाहुनि भीम ह्मणे "राया आह्मां-समक्ष कृष्णेची ॥
हे दुर्दशा वरी कीं? पूर्ति असे कीं न अक्ष[3]-तृष्णेची ॥३२॥
आहेत कितव पुष्कळ पुष्कळ त्यांच्या गृहांत बटकीही ॥
स्नेहें तेहि न त्यांतें पण करिति मदुक्ति काय लटकी ही ३३
श्री बुडविली महेंद्र-श्री-तुल्या[4] मज इची नसे परवा ॥
पर वामलोचनेच्या[5] ऐकों न शकेंचि या विलापरवा[6] ३४
या साध्वीस न-दुःखद पर करचि,तुह्मां स्व-कीर्ति-हानिकर
हा निकर[7] पातकाचा कैसा केला खळें महा-निकर॥३५॥
रे सहदेवा, सत्वर पुष्कळसा अग्नि आण जाच कसा ॥
जाळूं यांचे[9] हे कर आह्मां हा सोसवेल जाच कसा॥३६॥
श्वेताश्व[10] ह्मणे "बापा, भीमा, जीमाजि[11] वास अशिवाचा[12]
केवळ बाळपणीं ही वदलासि न तूं कधींहि अशि वाचा
द्यूतीं स्व-धर्मगौरव[13]- धन बहुधा त्वांहि सर्व हारविलें ॥
उक्तींत तें[14] दिसेना लेश जसें भित्तिचित्र[15] सारविलें ॥३८॥
क्षात्र-व्रतं[16] स्मरोनि द्यूतीं पाचारिलें ह्मणुनि आला ॥

---

१ कुत्र्याच्या. २ मात्र. ३ द्यूताच्या इच्छेची. ४ इंद्राच्या संपत्ती सारखी. ५ वाम ह्म० सुंदर लोचन जिचे ती. द्रौपदी, हिच्या. ६ शोकाच्या शब्दाला. ७ समूह. ८ मोठा अनर्थ. ९ धर्माचे. १० श्वेत-शुभ्र अश्व ज्याचे तो. अर्जुन. ११ ज्या वाचे मध्यें. १२ अकल्याणाचा. १३ स्वधर्म ह्म० आपला भातृधर्म, त्या विषयीं गौरव ह्म० महत्त्व; हेंच धन. १४ गौरवधन. १५ भिंतीवरील चित्र. १६ क्षत्रियांचा धर्म.

व्यसनी स्वयें नव्हे हा आर्य, अतिक्रमिसि कां बुधा, याला
सद्गुणसुसेव्य हा गुरु- देव-प्रिय, यासि जोंवि हार उनीं ॥
घालिसि तापांत कसा गति कोण पुढें स्व-सत्व हारउनी
आह्मां व्यसनांऽर्तांची धर्म-स्थिति हेचि वाजे, पावें गा॥
त्वां मोडावें न इलीं स्व-स्वास्थ्यसुखार्थ वा जपावें गा ॥
हें काय बरें? या-गुरु- घातें रिपु परम मुदित होतील ॥
स्व मुखीं विष, अमृत-रस व्यालमुखीं, कोण सुज्ञ ओतील'॥
भीम ह्मणे "न विनवितें जरि फार असेंचि मनींहि, कर करुनी
भस्म ललाटीं धरितों; कीं करितों प्रथम बद्ध करकरुनी"
निववी असुरांत जसा साधु प्रह्लादराय कवि-कर्ण ॥
धृतराष्ट्र-सुतांत तसा एकचि नय-निपुण-नायक विकर्ण॥
भीष्म-धृतराष्ट्र-विदुर- द्रोण-कृप नृपांसि बोल तो लावी
"कीं समयीं न वदावी तरि मग केव्हां सदुक्ति बोलावी॥
बोला हो बोला हो बोला हो सर्व सभ्य बोला हो ॥

---

१ अवमानितोस. २ सद्गुणांनीं उत्तम प्रकारें करून सेवा करण्यास योग्य ह्म० जो सद्गुणाचें माहेरघर. ३ गुरु आणि देव प्रिय ज्याला तो. ४ दुःखपीडितांची. ५ खाटलें. ६ या धर्मरूपी वाजेला. ७ आपलें स्वस्थपण व सुख या करितां. ८ गुरु ह्म० पितृतुल्य धर्मराज याच्या नाशानें. ९ सर्पमुखांत. १० माझें मन मला असेंचि ह्म० तुझ्या ( अर्जुनाच्या ) ह्मणण्या प्रमाणें वागण्या विषयीं न विनवितें तर इ० ११ नीतिज्ञजनांत श्रेष्ठ. १२ सत्यभाषण.

अस्मर्थ-मौनें तुमच्या मुञ्ज-पणाच्या न हानि मोला हो ॥
श्रवण तरि करा मज जें सुचलेंसे तेंचि भीड तोडूनी ॥
वदतों, पद तों गुरुचें न शिवों द्यावें शिखीस सोडूनी ४७
चार- व्यसनें, मृगया स्त्री पान द्यूत यांत जो सक्त ॥
तो धर्म-च्युत[2], तत्कृत[3] सत्कृत[4] न महा-जनांत हें व्यक्त ४८
धर्म द्यूत-व्यसनीं झाला कितवांसि वश पराभूत ॥
कां हो भ्रांत करीना स्वमतोऽत्यऽशुचि-क्रियापरा[11] भूत ॥
धर्म जयाच्या नादीं लावुनि जिंकूनि शकुनिनें आर्या ॥
पण आपणचि करविला पांचांची आपुली सती भार्या ॥
अन्यर्त्विगननुमत[5] जें द्रव्य न होता[6] असोन होमुनि तें ॥
होइल सभेंत बहुमत तो एकातरिहि काय हो सुनितें ५१॥
द्यूतीं साधारण धन- पण करुनि नव्हेचि एक हारविता
गिळिल दुराऽग्रह-राहु त्यजिना परि सद्विचार हा रविता
सभ्यांमाजि वदाया विहित असें बोलतोंचि आजि तत्व
हरि-कीर्ति सती हेही तुल्या यांचें समान अजितत्व ५३॥
तें साधु[10] साधु साधु ध्वनि करिती, ह्मणति "बोल कानांहीं

---

१ अवेळीं भरलेल्या स्तब्धपणानें. २ धर्मभ्रष्ट. ३ त्या व्यसनी पुरुषाची कृति. ४ सन्मान्य. ५ अन्य-ऋत्विग्-अननुमत ह्म० दुसऱ्या ऋत्विजांस अमान्य. ६ होता न असोन ह्म० यज्ञकर्ता नसून. ७ समाईक. ८ दुराग्रह हाच राहु. ९ सूर्यत्व. १० शाबास, शाबास. ११ स्वमतानें अति अशुद्ध कर्मांत तत्पर झालेल्याला.

घ्यावें असेचि, तूं कीं विदुर, तिजा स्पष्ट बोलका नाहीं५४
न्याय-मृकंड-सुताच्या दुस्तर-धृतराष्ट्रजाऽब्धिसाधुवटा ॥
सभ्या भला भला! विधु लाजेल तुझ्याचि मानसा धुवटा"
कर्ण "ह्मणे वाचाळा, रे, सर्वस्व-ग्लहांत हे आली ॥
अजिता कसी? तुझी मति मति-मंदा विदुर-बुद्धिची आली
वरकड हे काय मुके ? वक्ता धर्म-ज्ञ तूंचि? बैस उगा ॥
न भला स्व-भाव; हा तुज बालिश-जन-पंक्तिला न बैसउ गा
न वदति सभ्य, न पांडव, जरि हे कृष्णा ह्मणे 'अहो सांगा'
अजिता असती तरि हे तैसेंचि स्पष्ट न वदते कां गा५८
ह्मणसील 'सभेंत सती नाणावी, तरि सती न हे असती'
असतो एक सतीचा उप-भोक्ता पांच ते इला असती५९
आनयन सभेंत इचें कीं हें एकांबरत्व न विचित्र ॥
नग्नत्वहि नवल नव्हे न चुना बहु नासिकेशि ज्या श्वित्र

१ न्याय हाच मृकंडुसुत ह्म० मार्कंडेय. याच्या. २ तरण्यास कठिन, असा जो धृतराष्ट्रपुत्ररूप समुद्र, त्यांतील उत्तम अशा वटवृक्षा, विकर्णा. मार्कंडेयाचें आयुष्य सोळा कल्प. प्रत्येक कल्पास जलप्रलय व्हावयाचा. त्यावेळीं एक वटवृक्ष मार्कंडेयास आधारभूत होऊन त्याचें रक्षण होत असे, अशी कथा आहे. ३ निर्मल अशा मानसाला. ४ सर्व द्रव्याच्या पणांत. ५ सखी. ६ मूर्ख लोकांच्या रांगेला. ७ आणणें. ८ एकवस्त्रता. ९ नाकाला. १० कुष्ठरोग.

सं-स्त्रीक स-धनें पांडव शकुनि-जित स्पष्ट, काय बोलाशी रे
देतो सभेंत लघुता जो स्वांविषयीं बळेंचि बोल शिरे ६१॥
दुःशासना, न याचे ऐकावे फोल बोल; हा बाळ ॥
गीष्पतिपुढें मिरवितो साऽक्षरतां दाखवूनि गम्रबाळें ६२॥
वदतो बुधांत भलतें बोलाया न स्त्रियांतहि सकोनी ॥
हूं घे पांडव-वस्त्रें या दासीचेंहि वस्त्र हिसकोनी" ॥ ६३॥
तें ऐकतांचि वस्त्रें टाकुनि उघडेचि पांचही बसले ॥
भीष्म "ह्मणे हें दुःसह त्त्हृदयांत असें न शर-कदंब सले॥
माहात्म्य सतीचें हो, देवा, पावो न आस विलयालां
हे आपणासि ह्मणत्ये बाल-मृगी, स्पष्ट आसविल यालां"
दुःशासन सोडाया झोंबे स्व-कुलांऽहितोदया लुगड्या ॥
तेव्हां स्मरली कृष्णा, कृष्णा दीनाचिया दयालु-गड्या॥
तो दुर्जन आर्धांही साधूंच्या करुनि हानि रीतीची ॥
नग्न सभेंत कराया पाहे खळ धरुनि हा निरी तीची ६७॥
जैं दुर्दशा कराया दुर्दैवें सिद्ध नीच हा केला ॥
तैं दीनबंधुला ती कृष्णा मारी मनींच हाकेला ॥ ६८ ॥
"हे नाथ, रमा-नाथ, व्रज-नाथ, हरे, मुकुंद, कंसाऽरे ॥

---

१ स्त्रीसहित. २ धनासहित. ३ आपला विषय नव्हे त्यांत. ४ बृहस्पती पुढें. ५ विद्वत्ता. ६ गाबाळग्रंथ. ७ समर्थ होऊन ८ बाणसमूह. ९ आशा. १० नाशाला. ११ आस्वल. १२ दुःशासनाला. १३ आपल्या कुलाच्या नाशाच्या उदया करितां. १४ हे कंसशत्रो श्रीकृष्णा.

गोविंद, कृष्ण, केशव, दीनार्ति-हरस्त्वमेव संसारे ॥६९ ॥
काळेंहि सख्या न तुझ्या दासीस पहावयासहि सकावें ॥
त्वद्भगिनी-वस्त्र खळें नग्न करायासि काय हिसकावें ७०॥
जीहुनि नसे सुभद्रा तुज बहु-मान्या, अकीर्ति हे तीची ॥
धांव दयाऽब्धे होते विश्वांत तुझ्या अकीर्ति हेतीची ७१
झालासि त्राताचि, न होवुनि विधिच्या अधीन होगलिता
बिरुदावळी तुझी हे गज-वर-वरदा कधीं न हो गलिता॥
'भगिनी ऐसें वदल्यें पारि फाराचि लाभल्यें न हें लटिक॥
प्रभुजी, रक्षा तुमच्या दासांची मी लहानसी बटिक७३॥
जिंकिल काय खळा तो, जिंकी घर्ती न धर्म जो डावा॥
सुज्ञें पंक-पतित पर- धेनुद्धरणेंहि धर्म जोडावा ॥ ७४ ॥
भागा, या, गाय तसी मी, न धरी अघ-भयास हा यवन
गुरु-जन सत्पालक, पारि झाले या निर्दया सहाय वन॥७५

---

१ त्वम्-एव-संसारे-दीनार्तिहरः ह्म० तूंच संसारामध्यें. अनाथा-चें संकट निवारणारा. २हे दयानिधे. ३खड्गाची. ४ ऐश्वर्य हार-विणारा. ब्रह्मदेवानें गोकुळांतून गाई, वत्सें, गोपाळ यांस हिरावून नेलें. पण श्रीकृष्णानें ब्रह्मदेवास शरण न जातां स्वशक्तीनें तीं सर्व उत्पन्न केलीं. ५ यशांची पाक्ति. ६ गजेंद्रास वर देणाऱ्या. ७ चिखलांत पडलेली. ८ दुसऱ्याच्या धेनूचा उद्धार करण्यानें. ९ पापभीतीला. १० हा दुःशासन. ११ अरण्य.

कीर्त्यर्थ उद्धरीं मज उद्धारिली[1] जेंवि सागरीं महिला[2] ॥
त्वद्दामांची होती त्या अमृतीं[3], आजि या गरीं महिला॥
वा ढळतां तिळहि पदर भावी[4] व्यजनासि[5] सांऽग[6] रामा[7] जी
ती खळ-सभेंत उघडी पडये न पडोनि सागरामाजी ७७॥
भो भगवन्, भो वत्सल, भो हत-चाणूर[8]-मल्ल, भागावें ॥
त्रिश्वीं तुझेंच दुसरें न यशः श्री-प्राण[9]-वल्लभा गावें॥७८॥
आजि असत्पर-पुरुष- स्पर्श, न अपराध अन्य केला हो॥
झांका प्रसाद-पदरें न कुजनें[10] दृक्-स्पर्श कन्यकेला हो ७९
अवतरला उतराया जो दुःसह दुष्टभार महिवरला ॥
अहि-वर[11]लास्यपटु प्रभु करुणोक्तें द्वारकेंत गहिवरला ॥
परमेश्वर रूप धरी स्वपर[12]-जन-हितोदया लुगाडियांचें ॥
निववाया सभ्यांसह मन नयनहि तो दयालु गडियांचें[16] ॥
हा अंबरावतार[13] श्रित[14]-लज्जा-रक्षणार्थ अकरावा ॥

---

१ या ठिकाणीं ' उद्धारिलें, असतें तर बरें. २ पृथ्वीला. ३ तशा निरुपम सुखांत. ४ मानी. ५ पंख्याला. ६ अपराधी. ७ सुंदरी. ८ वधिला आहे चाणूरनामा मल्ल ज्यानें तो. ९ हे लक्ष्मीपते. १० दुर्जनाच्या दृष्टीचा स्पर्श. ११ अहिवर-सर्पश्रेष्ठ, कालियसर्प, त्याच्या मस्तकावर नृत्य करण्यांत कुशल. १२ स्वपर ह्म० आपणाविषयीं तत्पर, अर्थात् आपले भक्त, अशा जनाच्या हिताच्या उत्कर्षा करितां. १३ वस्त्रावतार. १४ आश्रितांच्या लज्जारक्षणा करिता. १६ आपले गडी पांडव, यांचें.

प्रभुमत असे, सदवनीं[1] आग्रह वेषीं कदापि न करावा ॥
शेले शालू साड्या क्षीरोदक लांब रुंद पाटावें ॥
झाला अनंत वस्त्रें कीं तीस अनाथसें न वाटावें ॥ ८३ ॥
पदसेवाऽर्थंचि[2] भजती अनवरत[3] महा[4]-विभूति ज्या निपट[5] ॥
तो कृष्णा-वपु झांकी होऊनि महा[6]-विभूति-जानि पट ८४॥
पहिलें वसन व्यसनें[7]- प्रतिपादनपटु करें कु-मति सोडी ॥
तों दुसरें आहेचि प्रथमाऽधिक वस्त्र, त्यासही वोडी ८५॥
कृष्णादेह[8]सदंबर- रत्नाकर त्यासि खळ-भुजा[9] टिरवी ॥
उपसी, परि गांभीर्यें[10] आपण न उंहूं[11] ह्मणोनि त्या[12] विरवी
मानिति मायां[13] केवळ अल्प सभेंतील भूमि-तळ[14] पट हो ॥
ह्मणति आदित्यादि सत्या 'या मेल्याचें समूळ तळपट हो' ॥
जें झांकिलें अनंतें दिव्यें भव्यें सदंबरें[15] सुघडें ॥
तें साधु-कार्य[16] काय क्षुद्र[17]-मति करील नागवें उघडें ॥८८॥
तो शतशः पट झट झट फेडुनि भागे सभेंत वेडावे ॥
किति खळ[18]-बळ! जलनिधिचे कीं दुस्तर[19]-तर तरंग फेडावे[20]॥

---

१ साधूंच्या रक्षणार्थ. २ पदसेवा करण्यास सांपडावी ह्मणून. ३ नित्य. ४ मोठी विभूति ह्म० ऐश्वर्य यांचे ते. ५ केवळ. ६ महाविभूति ह्म० लक्ष्मी, ही जाया ह्म० स्त्री ज्याची तो. ७ दुःख देण्यांत कुशल. ८ द्रौपदीच्या शरीरावरील उत्तम वस्त्रें, हाच समुद्र. ९ दुष्टाचा हात. १० खोलपणा मुळें. ११ नको. १२ त्या दुःशासनाला. १३ मावण्यास. १४ भूमीचा पृष्ठभाग. १५ सुंदर वस्त्रानें. १६ पवित्र शरीर. १७ दुष्टबुद्धि दुःशासन. १८ दुष्टाचें सामर्थ्य. १९ तरण्यास अतिकठिन. २० निवारावे.

होय सभेंत हलहला- स्वन कृष्णेसि प्रशंसिती राजे ॥
‘छी’ ते खळासि ह्मणती गेले भव-नदं-पर-प्रतीरा जे॥९०
भीम ह्मणे “राजे हो तरि पूर्वजं-गति न हो मला परिसा
जरि दुःशासन-वक्षः- क्षतज न सेवीन मी स्वबें हरिसा”९
सभ्य सकळ, साधु, ह्मणति भीमातें, धिक् खळासही ह्मणती
हरि हरि! हरि-हरिणांसचि त्यांची केलीच त्या जनें गणती
तेव्हां विदुर ह्मणे “हो प्रश्नोत्तर द्या न सत्य बुडवावें ॥
कीं देवभोग्य दामं न बाळें सुज्ञासमक्ष तुडवावें ॥ ९३ ॥
प्रह्लाद-सुत विरोचन, विप्र सुधन्वा सु-शील आंगिरस ॥
प्राणं-पण वृत्त यांचें परिसा हो अमृत यापुढें विरस९४॥
स्व-कर-ग्रहणोद्युक्ता त्या दोघांलाहि केशिनी कन्या ॥
प्रार्थुनि ह्मणे “भजेन श्रेष्ठ उभयतांत जो तया धन्या”९५
‘मी वर’ ह्मणे सुधन्वा कीं साक्षात्तात अंगिरा ज्याचा ॥
‘मी वर’ ह्मणे विरोचन कीं तो सुत साधु-संगि-राजाचा॥
“श्रेष्ठ नव्हेसा झालों तरि यावज्जीव मी तुझा दास”॥
ऐसा प्राण-पण तिहीं केला हो करुनि या विवादास९७

१ हाहाकर. २ संसार हाच नद, त्याच्या परतीरास. ३ पूर्वजांस झालेली गति. ४ दुःशासनाच्या ह्दयांतील रक्त. ५ भीम हा हरि ह्म० सिंह आणि दुःशासन हा हरिण. ६ देवांनीं उपभोग घेण्यास योग्य. ७ पुष्पमाला. ८ प्राणांचा आहे पण ज्यांत तें. ९ आपलें करग्रहण ह्म० विवाह, त्या विषयीं उत्सुक. १० साधूंचा सहवास ज्याला तो.

विप्र ह्मणे "चाल पुसों दोघेही हें तुझ्याचि बापाला ॥
मज मान्य तदुक्त असे कीं तो भीतो अकीर्तिपापाला" ॥
प्रह्लादास ह्मणे मुनि "जें सत्य असेल सांग कविपा[1] तें ॥
वदतां अयथार्थ[2] तुझा मूर्धा[3] शतधा फुटेल पविं-पातें"[4] ९९
जाय पुसाया त्यातें ज्या सुतपोराशि-कश्यपा दास ॥
जितसे षडरि[5] भजति, यम नियमहि, होऊनि वश्य पादास ॥
प्रह्लाद ह्मणे "स्वामी वक्ता अस्पष्ट कीं मृषा[6] वक्ता ॥
प्रेत्य-गति[7] कसी त्यांची हें सांगावें तुह्मीं मला भक्ता" १
कश्यप ह्मणे "कळोनि न बोले जो स्पष्ट त्यास वरुणाचे ॥
दश-शत पाश करकरुनि बांधिति पापकृददृष्ट-करुणाचे[8] ॥
जो साक्षी अनृत वदे वत्सा त्याचीहि होय[9] तीच गती ॥
वर्षांऽतीं एक[10] सुटे एवंच सहस्र अब्द ते[11] तगती ॥१०३॥
जेथें धार्मिष्ठाला खोटेपण लावितो स्वयें खोटा ॥
तेथ अवचनें, अनृतें, संदिग्धें, घात होतसे मोटा॥१०४॥

---

१ कविश्रेष्ठा. २ अयोग्य. ३ मस्तक. ४ वज्रप्रहारानें. ५ कामक्रोधादिक सहाशत्रु. ६ असत्य. ७ परलोकची गति. ८ पापकृद्-अदृष्ट-करुणा ह्म० पापकरणाऱ्या विषयीं न पाहिली करुणा ज्यानें अशा वरुणाचे. ९ तीच गति होय ह्म० त्याला वरुण हजार पाशांनीं बांधितो. १० एकवर्ष झालें ह्मणजे एक पाश सुटतो. या प्रमाणें हजार वर्षांनीं सर्व पाश सुटतात. ११ ते पाश.

हें धर्म-शल्य[1] दूर न करितां दुरिताऽर्ध[2] भाग भर्त्याला[3] ॥
उरल्या दुरिताऽर्धाचा सभ्यांला पाद[4]; पाद कर्त्याला॥५॥
भूत-पुरुष सप्त[5], तसे भावीही सात जण, असे चवदा ॥
वदता अनृत बुडवितो याकरितां साधु हो खरेंच वदा॥६
त्हृतधन[6] हत-पुत्र[7] ऋणी व्याघ्र-नृप-ग्रस्त[8] साक्षिहत[9] वा हे ॥
सम-दुःखि असीच स्त्री सुतहीनां[10] कीं जिला सवत आहे७
हीं दुःखें पडति गळां त्याच्या, जो पुरुष बोलतो लटिकें
वत्सा, पळहि विनोदा करितांहि तशा समीप तूं न टिकें"
प्रार्थुनि आंज्याला[12] ज्या राजा[13], मा-जानि-सेवकें[14] उक्ती॥
आयकिल्या[15], त्या वरिल्या,[16]भव-तरि देवर्षिच्या[17] जशा युक्ती
प्रह्लाद ह्मणे "पुत्रा आवडतो धर्म तेंवि तूं न मज ॥
तुज परिस हा सुधन्वा श्रेयान्[18] स्व-मनांत हें बरें समज ॥

---

१ धर्मास बाधा करणारें कृत्य. २ पापाचा अर्धा वांटा. ३ धन्याला. ४ चतुर्थांश. ५ पूर्वींचे सात पुरुष, सात पूर्वज. ६ ज्याचें धन हरण केलें तो. ७ ज्याचे पुत्र मेले तो. ८ व्याघ्रानें किंवा राजानें ग्रासिलेला. ९ साक्षिदारांनीं ज्याचा घात केला तो. १०निपुत्रिक. ११हे प्रह्लादा. १२ प्रह्लादाचा आजा कश्यप ऋषि. कश्यपाची स्त्री दिति, हिच्या ठायीं हिरण्यकशिपु झाला. १३ राजा हा प्रार्थुनि याचा कर्ता. १४ मा-लक्ष्मी जाया ज्याची तो विष्णु. त्याचा सेवक प्रह्लाद यानें. १५ स्वीकारिल्या. १६ संसारसमुद्रांतील नौका. अशा उक्ति. १७ नारदाच्या. १८ अधिक श्रेष्ठ.

याचाचि पिता श्रेयान्, न तुझा श्रेयान् पिता, तुझी माता
न श्रेयसी, तसी जसि याची माता, यथार्थ हें ताता॥११
त्वत्प्राणेशं[1] सुधन्वा, जा दास्य करीं जपोनि आमरण ॥
विप्र-चरण[2]-परिचरणचि कामद[3], पुरवील काय काम[4] रण॥
विप्र ह्मणे "साधो त्वां त्यजिला नंदनहि, धर्म न त्यजिला
वे सुत दिला, तिला कां न जपेल मुकुंद? मान्य सत्य जिला
ऐसी कथा[5] असे हो उपेक्षितां जीवनाशि[6] गाय मुके ॥
मौनें[7]-शिशुचेचि घेतां त्यागुनि सत्याऽमृतासि[8] काय मुके[9]
आर्येला[10] मानियलें बहु, पाहुनि सज्जनीं चमत्कृतिला[11] ॥
खळचि न मानिति तैसे, बहुदूषण[12]-सज्ज नीच मत्कृतिला[13]
कोणी दयाळु नसती त्या पंकांतूनि गाय काढी गा ॥
भी कृष्णा त्या मूर्ता[14]- पापाच्या त्रास-दायका दीगा[15]"॥१६
देवी ह्मणे "रहा क्षण करिसी निरयाऽर्थ[16] काय जोडि[17] खळा
सभ्योक्ति आयकोंदे, रे, न शिळेला अपाय जो ढिखळा[18]॥

१ तुझ्या प्राणांचा धनी. २ ब्राह्मणाच्या पायाची सेवा. ३ इच्छा पूर्ण करणारी. ४ इच्छा. ५ ज्या कयाभूला. ६ प्राणांला. ७ मौनरूप पुत्राचे. ८ सत्यरूप अमृताला. ९ चुंबनें. १० द्रौपदीला. ११ भगवंतानें वस्त्रें पुरविलीं ह्या चमत्काराला. १२ पुष्कळ दूषणें देण्यास तत्पर. १३ माझ्या कृत्याला. १४ मूर्तिमान पाप्यांच्या. १५ समूहाला. १६ नरकप्राप्ती करितां. १७ लाभ. १८ मातीचें मोठें ढेंकूळ.

पुशिलें तें सांगा जी अजि सभ्य तुह्मांसि विनवित्यें नमुनी
न वदावें हें सद्व्रत[1] पारि त्यासि[2] सभेंत आणिती न मुनी"॥
ऐसें, वदतां वोढुनि पाडी वोढी तशाहि पतितेतें ॥
विषसें गिळिती तीचें पडणें रडणें तदीय-पति ते तें ॥१९
कृष्णा ह्मणे "अहा जी द्रुपद-सुता धर्म-नृपतिची भार्या॥
श्री-मद्यदु-नाथ-सखी मानवल्या सर्वदा जिला आर्या२०
तीला खळ वोढितसे वातहि न विशंक जीस आतळला
न्हता ताप कटाहीं[3] जरि असता सुचिर काय हा तळला
केला तप्त अनघजन[4] तैलाच्या तापल्याहि न कटाहें ॥
कुरुगुरु, धन्य सहातां न जनें धिक्कारिलाहि नकटा हें ॥
कष्टें सांचविलें यश बुडवितसे मंद मत्त पाहोनी ॥
साहति कसें नवल हें ज्याचें तप उग्र मत्तपाहोनी ॥२३॥
सांगा याची दासी? कीं मी दासी न्हें? मता निवडा ॥
श्रवणीं धरूनि सूक्ता राज-सभा शोभते न तानिवडा"२४
भीष्म ह्मणे "गे बाई वदलों पहिलेंचि सूक्ष्म धर्म-गती ॥
ज्ञात्यालाहि कळेना, इतरांशि कळेल काय गे मम ती२५
बळवान् वक्ता असतां होय अधर्महि सुधर्मसा धन्ये ॥
दुर्बळ वक्ता असतां धर्महि होतो अधर्मसा कन्ये"॥२६॥
श्रीभीष्माऽऽशय हा कीं "अजिता ह्मणतांचि हे अति-क्रुद्धा
जाळील कौरवांतें अन्यायें गांजिली मती शुद्धा ॥ २७ ॥

१ सज्जनांचें व्रत. २ त्या सद्व्रताला. ३ कढईत. ४ निष्पाप जन.

द्रौपद्यपमानंज कीं कुरु-नाशेज दोष गुरु न हें समजे ॥
कौरव-नाशचि होतो उरतात उदंड दुष्ट यांसम जे ॥२८॥
पांडव अ-शस्त्र केवळ पर-दासहि, धार्तराष्ट्र तत्स्वामी ॥
कृष्णेसहि दोषाऽऽवह तन्नाश; नसे कलंक तद्धामीं॥२९॥
खळ-लय होणारचि मग तप बुडवावें किमर्थ सांचविलें ॥
ऐसें चिंतुनि भीष्में स्पष्ट न बोलोनि त्यांस वांचविलें"३०॥
"जें व्यसनीं सद्वृत्त त्यागावें तेंच कर्म अति नीच ॥
असाज्य धर्म-पथ हें तुज कथिलें न वदतांहि पतिनींच३१
वत्से सत्सेव्य-त्वत्- सत्वा दृग्दोषलव नसो; सकता ॥
न सहाया शांतहि या व्यसना,अन्यत्र हे न सोसकतां३२
सांगो धर्म जिता तूं कीं अजिता हें, प्रमाण तेंचि सती
सत्व-सुधा-नदि कृष्णे व्यसुंसे द्रोणादि सभ्य हे दिसती"

---

१ द्रौपदीच्या अपमानें करून झालेला. २ कौरवांच्या नाशा पासून उत्पन्न झालेला. ३ त्या पांडवांचे स्वामी. ४आपल्या पतींचे स्वामी जे कौरव त्यांचा नाश. ५ तिच्या घरीं. ६ दुर्योधनादि-दुष्टांचा लय त्यांच्या पापकर्मानें आपोआप होणार.७ पांडवांनींच. ८ सज्जनांनीं स्वीकारण्यास योग्य अशा तुझ्या सत्वाला. ९ दृ-ष्टिदोषाचा लेश. १० सहनशीलता. ११ सत्वरूप अमृताची नदी. १२ गतप्राण असे.

# अध्याय ६ वा.



## सारांश.

दुर्योधन द्रौपदीस ह्मणाला कीं, तुझे पति भीमार्जुननकुळसहदेव हे जर ' धर्म आमचा स्वामी नाहीं. ' असें ह्मणतील तर तुझी सुटका तत्काळ होईल. तें ऐकून भीम क्रोधानें ह्मणाला. ' धर्म आमचा स्वामी आहे. तो करील तें आह्मांस प्रमाण. तसें नसतें तर तुमचा संहार करण्यास मला वेळ लागला नसता. आझून ही धर्मराज आज्ञा देईल तर एका क्षणांत तुमचा सर्वांचा संहार करीन.

मग कर्ण द्रौपदीस ह्मणाला " तुझे पति जिंकिले गेले. व तूं अजिता अशी आहे तर आतां तुला कोणी धनी नाहीं. यास्तव तूं अनाथ झालीस. स्त्रियांनीं अनाथ राहूं नये या करितां तूं दुर्योधनादिकांचा स्वीकार करून सनाथ हो. दुर्योधनानें आपली डावी मांडी द्रौपदीस उघडी करून दाखविली. तेव्हां भीम क्रोधानें ह्मणाला. " जर या तुझ्या मांडीवर माझ्या गदेला बसविणार नाहीं तर मी पितृलोकास जाणार नाहीं. " इतक्यांत धृतराष्ट्राच्या अग्निहोत्रगृहांत कोला शिरला आणि तो मोठ्यानें ओरडला व दुसरेही पुष्कळ उत्पात झाले. मग धृतराष्ट्रास भय उत्पन्न होऊन त्यानें दुर्योधनाचें निवारण केलें व तो द्रौपदीस

ह्मणाला. हे वत्से, तूं फार थोर आहेस, आह्मांकडून मोठा अपराध घडला. याची तूं क्षमा कर. राग धरूं नको. वर माग. मग द्रौपदीनें वर मागून आपल्या पतिपुत्रांची दास्यत्वापासून मुक्तता करविली. पांडव धृतराष्ट्रास नमन करून इंद्रप्रस्थास जावयास निघाले. इतक्यांत दुर्योधनादिकांनीं, मसलत करून पुनः पांडवांस द्यूतास बोलाविलें व असा पण केला कीं, ह्या डावांत ज्याचा पराभव होईल त्यानें बारा वर्षें वनवास व एक वर्ष अज्ञातवास भोगावा. धर्मराजानें तें कबूल केल्यावर पुनः द्यूत सुरू झालें. तोही डाव शकुनीनें जिंकिला. तेव्हां प्रतिज्ञे प्रमाणें पांडव वनवासास निघून गेले.

---

**दुर्योधनाहि ह्मणे "गे धर्मास 'अनीशं अनृतं' हे चवघे ॥**
**तव धव भीमादि मुखें ह्मणोत; ऐकोत सभ्य हे अवघे॥१**
**येणेंचि दास-भावा- पासुनि तूं पावसील सुटकेला ॥**
**अस्मत्-प्रसादकारण हेंचिं, न शतवार पाणि-पुटं केला॥२**
**कीं "मी अनीश्वर" असें धर्म ह्मणो, साधुरीतिस त्यजुनी**
**आवडती तूंचि नवी, बहु नावडतीच होय सत्य जुनी॥३**

---

१ स्वामी नव्हे. २ हा खोटा आहे. ३ आमची कृपा होण्यास कारण. ४ भीमादि चोघांनी, धर्मास हा आमचा स्वामी नव्हे, व हा खोटा आहे असें ह्मणावें हेंच. ५ हात जोडणें. शंभर वेळ हात जोडिले तरी आमचा प्रसाद होणार नाहीं. ६ जुनी साधुरीति.

काय वदतील सभ्य व्याकुळ झाले तुझ्याच तापानें ॥
कीं एकदांचि फुटलें त्वत्पति-पंचक-कपाळ पापानें"॥४॥
त्या दुर्योधन-वचनें खळबळलें तदनुजादि-खळ-बळ तें ॥
जैसें श्रवणीं पडतां साधूक्त पिशाच-कटक खळबळतें ॥५
धर्माकडेचि पाहत होते ते सु-जन कु-जनही, परि तो ॥
किमपि न वदला, बहुधा समयीं समयज्ञ मौनही धरितो६
भीम ह्मणे "अस्मदसु[१] प्रभु धर्म, नृपेंद्र हा न व्हे लटिका
नसतें असें तरि, मला तुमच्या मथना न लागती घटिका
कपट-द्युतीं अजितहि नृप जरि जित आपणासि मानील
मानूं असेंचि आह्मीं अस्मद्रीतीस विश्व वानील ॥ ८ ॥
हे कृष्णा तों अजिता ऐसेंहि[२] असोनि साहतों अनया ॥
गुरु-वश नसतों तरि अरि- रुधिराच्या कां विनिर्मितों न नया
हे काय अशक्त पहा या माझ्या वज्रतुल्य बाहूतें ॥
यांच्या आकृतिला जें उचित भुजग-राज तेज बाहू तें१०
माते क्षमे ह्मणोंदे या त्वद्वशगा[३] मनुष्य-देवा[४] हूं ॥
हो भीम पळ विशृंखळ[५] खळखळ खळ-रक्त-पूर दे वाहूं ॥
गुरु आज्ञा देता तरि अरि-करि-हरि[६] मी सपत्न-शशकांतें[७]

---

१ आमचे प्राण. २ हे सहनशीलते. ३ तुला वश असलेल्यास. ४ धर्मराजाला. ५ निष्प्रतिबंध. ६ शत्रुरूप गजांचा सिंह. ७ शत्रुरूप सशांना. ८ नद्या.

वधितों, काय श्रम मज  मथितां या धार्तराष्ट्र[1]-मशकांतें॥
आज्ञा पुन्हा कशाला  आहे पहिलीच गुरु[2] वराऽऽज्ञा[3] ते॥
न पुसति पुनःपुन्हा जे  झाले सेवूनि गुरु[4]-वरा ज्ञाते"॥१३
भीष्म द्रोण विदुर सा  क्रुद्धाला ह्मणति "बा न कोपावें॥
करिसील सर्व संमति  ह्मणतोसि तसें करूं नको पावें"१४॥
कर्ण ह्मणे "हेंच तिघे  धर्म-विलंघन-समर्थ, चवथा न, ॥
यांसि तसें पति-निंदा[6]-  व्यसन,जसें दे मुलासि चव थान
इच्छिति मूलच्छेद  स्वामीचा, न गणिती महाऽघातें[7] ॥
व्याकुळ मनीं न होती  सुकृत यशाच्या अशा न हा !घातें
द्रौपदि ऐक मदुक्त  च्छात्रतनुजदास[8] हे अधन; यांत ॥
तूं दास[9]-धन; सुयोधन  नाथ[10] तुझा, स्पष्ट हें स्मृतिनयांत[11] ॥
दुर्योधन[12]-दार-चरण-  संवाहन-निरत-बुद्धि हो भावें ॥
त्वन्नाथ धार्तराष्ट्रच,  पांडव[13]-दीनीं तुवां न लोपावें ॥१८॥

---

१ धृतराष्ट्रपुत्ररूप चिलटांना. २ मोठी. ३ वररूप आज्ञा. ४ गुरूश्रेष्ठाला. ५ भीष्म, द्रोण विदुर. ६ स्वामीच्या निंदेचें व्यसन. ७ महा पापाला. ८ शिष्य, पुत्र व दास हे तिघे अधन. ह्म० यांचें कांहीं धन असल्यास तें यांचें नव्हे. तें त्यांच्या गुरूचें, पित्याचें अथवा धन्याचें समजावें. ९ दासांचें धन, हें त्याच्या धन्याचें होय. अर्थात् तूं कौरवाची दासी झालीस. १०धनी. ११ स्मृति व न्याय ह्यांमध्यें. १२ दुर्योधनाच्या स्त्रीचे चरणांचें मर्दन करण्यांत तत्पर बुद्धि जिची ती. १३ पांडवरूप दीनांमध्यें.

अथवा-स्वपतिंजयें जरि आत्म-जयांतें न मानिशी स्व-मतें
तरि तूं तरुणि अपतिका, अन्यकरीं कां न हें भलें गमतें
वर्तति मनें-मानेसें सुरत-परां अ-पतिका स्त्रिया बटकी ॥
तें तुज विदित असो, गे जो तो कामी गळां पडे,हटकी॥
तुज परि-मित-पतिक-असा काशाला दार-भाव? सांडावा
अपरि-मित-पतिक दास्य स्वीकारुनि काम-चार मांडावा
सहदेव नकुळ अर्जुन भीम युधिष्ठिरहि दास हे अवघे ॥
न तुझे पति, तूं दासी, जो तुज मानेल तो सुखें धवें घे"॥
ऐसें ऐकुनि सोडी अहि-पतिसा भीमसेन सुसकारा ॥
बहुधा गुरु-संकोच ग्रासी तन्नामवर्तिसु-सकारा ॥ २३ ॥

---

१ आपल्या पतींच्या जिंकण्यानें. ह्म० द्यूतांत झालेल्या पराभवानें.२आपल्या पराभवाला.३पतिहीना.४मनास वाटेल तसें.५संभोगाविषयीं उत्सुक.६संभोग मागतो.७मोजके, अर्थात् पांचच पति ज्याचे असादारभाव ह्म०पत्नीत्व.८यथेच्छवर्तन.९पति.१०मोठ्या सर्पा सारखा, शेषासारखा.११धर्माची भीड. १२ ' भीम सेन ' ह्या नांवांतील उत्तम सकाराला गुरुसंकोचानें ह्म० धर्माच्या भिडेनें ग्रासिलें. बाकी " भीमएन " असें राहिलें. भीम ह्म० भयंकर सेना ज्याची तो. अर्थात् महा-पराक्रमी. पण धर्माच्या भिडे मुळें ' भीमएन ' ह्म० भयंकर पातकी झाला. सारांश दुर्जना पासून द्रौपदीचें रक्षण आपल्या हातून झालें नाहीं ह्मणून भीमानें आपणास महापातकी असें मानिलें.

भीम ह्मणे "धर्मातें राया या नीच-सूत-तनयास ॥
काय ह्मणों? स्वं-कुलोचित वदतो, ह्मणतील साधुजं न यास
द्यूत न करितासि जरीं न्यायें जरि वर्ततासि तरि बापा
कां होतों दास नृपा स्वप्नांताहि न करितां किमपि पापा
कां या सभेंत करिते अरि तेजोभंग? कां असें वदते॥
जे शशरवें विरावे देती मृगराजमस्तकीं पद ते" ॥ २६ ॥
तों दुर्योधन बोले "धर्मा अजिता जरी द्रुपद-तनया ॥
तरि वद,वदन वरि करीं, कीं जाणसि मुज्ञ तूं नया अनया"
ऐसें पुसे कुचेष्टा तो दुर्मद त्या सभेंत ही मांडी ॥
कृष्णेदेखत दावी डावी उघडी करूनियां मांडी ॥ २८ ॥
भीम ह्मणे "जरि समरीं या मांडीवरि गदा न बसवीन॥
तरि पितृ-सालोक्यातें क्षणाहि न पावेन, नरक वसवीन"
विदुर ह्मणे "हे अजिता, खळ हो हें कर्म कायहो करितां
केचें कुशल सशांचें शापुनि समरासि सिंह होकरितां"
पुनरपि सुयोधन ह्मणे " कृष्णे घोघे 'अनीश धर्म, असें
बोलोत; मुक्त करितों कीं मत्सदनीं करोनि कर्म असें ॥
जिष्णु ह्मणे "या पूर्वी होता हा ईश आमुचा साचा ॥

---

१ आपल्या कुलास उचित. २ कुलीन. ३ सशाच्या शब्दानें. ४ विरघळून जावे. ५ सिंहाच्या मस्तकावर. ६ पितर ज्या लोकीं आहेत त्या लोकीं राहणें. ७ शिव्या देवून. ८ बोलाविला असतां. ९ धर्मराज.

आतां प्रभु कोणाचा न मला संकोच दुष्ट-दासाचा"[1]३२॥
इतुक्यांतचि धृतराष्ट्र- क्षिति-पतिच्या अग्नि-होत्र-भवनांत
जंबुक शिरोनि बोले पितरांच्या जेंवि वल्लभ-वनांत[2] ३३॥
तो जंबुक आरडतां बहु रासभ दुष्ट खगहि आरडले ॥
उत्पातज्ञ सदय जन तेंव्हांचि मनीं ह्मणोनि हा! रडले३४॥
तेंव्हां धृतराष्ट्रातें गांधारी विदुर अशुभ कळवीती॥
त्यातें अति-प्रयासें नाना-परि बोध करुनि वळवीती॥३५
वृद्ध ह्मणे "रे मंदा कां स्व-कुळ-ज्येष्ठ-बंधुभार्येशीं ॥
आह्मां-समक्ष करिशी अतिवाद[3] त्यजुनि लाजआर्येशीं[4] ॥
असकृत् निवारिलें जरि सुज्ञें विदुरें तसेंचि मत्तातें ॥
करिशी भलतेंचि कसें अवमानिशि कां सदुक्त मत्ता तें
वत्से सति मतिमति[5] अति मान्या मज तूं क्षमा करीं दे हें
वर माग, राग न धरीं, मत्पुत्रांचीं तुझ्या करीं देहें[6] ॥३८
सुमति ह्मणे "जरि देतां वर, वचनें स्तवुनियांहि मामाजी॥
धर्म अदास असो हा वर-पट[7] द्या आजि या हिमामाजीं[8] ॥
प्रतिविंध्यास ह्मणावें 'हा दासात्मज' असें न बालांनीं[9] ॥

---

१ दुष्ट दुर्योधनाचा दास धर्म ह्याचा. २ पितरांचें वल्लभ वन ह्म० श्मशान. ३ निष्ठुरभाषण. ४ भीष्मानें, व्यासानें. ५ बुद्धिमती. ६ शरीरें. देहशब्द पुन्नपुंसक आहे. ७ वररूप वस्त्र. ८ प्रस्तुत प्राप्त झालेल्या विपत्तिरूप हिमांत. ९ अज्ञान मुलांनीं.

अनुचित दाससुतत्व स्कंधीं ज्या वाहिलें नृपालांनीं" ४०॥
भूप ह्मणे " हें दिधलें दुसरा मज माग वर सुने त्रात्या ॥
ऐसे परिसोनि पुन्हा वर मागे ती सती सुनेत्रा त्या४१ ॥
सायुध स-रथ नकुळ-सह- देवाऽर्जुन-भीम यांस दासत्व ॥
न शिवावें, हें द्यावें मज,यांचें स्थिर असो सदा सत्व"४२
माग ह्मणे " तिस राजा तिसरा, जाया लया तिचा राग ॥
नागवधूतें जाणों पाजी वरदुग्ध करुनियां आग ॥ ४३ ॥
देवी ह्मणे " उदारा स्त्री योग्य नव्हे तिजा वर वराया ॥
लोभें आशीचीचि न मणि-राशींची वरी वरव राया ४४
नीचत्व-तीर्ण मत्पति हे मुक्तें पावतील कल्याण ॥
येतां सदऽश्व हाता दुर्लभ साहूनि काय पल्याण"॥४५॥
कर्ण ह्मणे "ज्या व्यसनो- दधि-मग्ना गुरु,सुमित्र,सुत,नुतरी
साला झाली भार्ग्ये प्राप्त पहा हे समर्थ सु-तनु तरी ४६॥
"स्त्रीगति पाण्डु-सुतांची "हा दैव" असें ह्मणोनि भीम कर
चोळी, अनुजाशि ह्मणे " जिष्णो यादोगणीं न भी मकर
तैसा मी शत्रु-गणीं परि पाश तयाशि, तेंवि मज राजा॥
दाखवितों कौतुक जरि वत्सा,ह्मणतासि करुनि गजरा जा

---

१ वररूप दूध. २ अपराध. ३ आशीर्वादाची. ४ शोभा. ५ नीचत्वापासून मुक्त झालेले. ६ उत्तम घोडा. ७ खोगीर. ८ संकटांच्या समुद्रांत बुडालेल्यास. ९ उद्धरीत नाहीं. १० सुंदरी. ११ जलजन्तुसमूहांत.

स्त्रीस सभेंतहि शिवला  मग एकांतीं नसेल कां विटं[1] तो ॥
जो शुचि तो स्वप्नींही  परदारांच्या विलोकनें विटतो ॥
कर्णाकडे विलोकुनि  हांसोनि ह्मणे धनंजया, स्मरतें ॥
कंसातें मन त्यां[2] जें  ग्रासी तत्काळ तेज तूं स्मर तें ॥८०॥
जिष्णु ह्मणे "नीचाशीं  सन्त न वदती ह्मणोनि सुज्ञानीं
सोसावें बा आर्या,  कीं तूं आहेसि पूर्ण सुज्ञानी ॥ ८१॥
भीम ह्मणे "धर्मा, हूं  मात्र ह्मण, प्राज्य[3] राज्य तूं[4] कर गा
करं-गा भूमि करीं मग  हरिला[5] व्हाया सदां मुदाकर[6] गा[7]
क्रोधें भीम खवळला  कल्पांतज्वलनसाच[8], परि त्यातें ॥
प्रतिबन्धकं[9]-मणि झाला  धर्म रिपु-पतंग[10]-दाह करित्यातें ॥
धृतराष्ट्राप्रति अंजलि  करुनि युधिष्ठिर ह्मणे "अहो तात
तुमचे पाद तसे प्रिय  अमृत[11]-कराचेहि मज न होतात८४॥
ईश्वर तूं, त्वद्वचनीं  मन्मन जाणोनि परम हित रमतें ॥

१. दुष्ट. २ त्या श्रीकृष्णरूप तेजाला माझें मन स्मरतें. जें तेज कंसातें तत्काल ग्रासी. तूंही तें स्मर. सारांश श्रीकृष्णानें कंसाला तत्काल मारिलें, तसें तूं कर्णास तत्काल मार. ३ पुष्कळ. ४ हस्तगत. ५ श्रीकृष्णाला. ६ आनंदाची खाण. ७ गायन कर. ८ प्रलयकालच्या अग्नी सारखा. ९ अडथळा करणारा मणि. एकप्रकारचा मणि आहे, तेणें करून अग्निभय नाहींसें होतें असें ह्मणतात. १० शत्रुरूप पतंगाचें दहन करणाऱ्या भीमाला. ११ चंद्राचे.

राज्य-पदाऽधिक गुरु-पद  वदतों हें गुरुमतें न इतर मतें ॥
पूर्वी गुरुवचनें जो  पी दुग्धरसा गरासहित राया ॥
त्या प्रह्लादातें बुध  गाती भवसागरासहि तराया ॥ ५६ ॥
देवा सांभाळें त्वां  जें तुज वाटेल सांऽगपां यांतें ॥
हे वाहतील पांचहि  तुझिया प्रीत्यर्थ अंग पायांतें" ५७॥
धृतराष्ट्र ह्मणे "धर्मा  आलासि तसाचि त्या नव पुरा जा
रक्षाऽर्ह शील रक्षीं,  रक्षो हेंच स्वयें, न वपु राजा॥५८ ॥
वत्सा अजात शत्रो,  तूं बन्धु-कृताऽपराधं-विसरा या ॥
अन्ध-स्थविर गुरुकडे  पाहुनि आहेस योग्य विसराया५९
अतिशुद्ध बुद्धिचें फळ  शांतिबळें सहन शील बापा हें ॥
सर्व तुला विदित असे  आह्मां वृद्धांकडेचि वा पाहें ६०॥
सु-कृतातेंचि स्मरति, न  कुकृतातें, याचि साधु-रीतीची ॥
रुचि रसिका, न सुधेची,  कीं केवळ अल्प माधुरी तीची
हें म्यां उपेक्षिलें कीं  पुत्रबळाऽबळ मला विदित व्हावें ॥
द्यूतविलोकनकौतुक-  मिलिताऽप्तहि भेटतील या भावें ॥
कळलें पुत्रांत तुह्मीं  श्रेष्ठ भले, जा स्वराष्ट्र सांभाळा ॥
बुडतां असदंऽनुसरणें  लावावा शब्द दोप कां भाळा ६॥

---

१ सह-अंगप ह्म०कर्णासह दुर्योधनादिकांस. २ रक्षणास योग्य ३ सद्वृत्त. ४ तुझे बन्धु दुर्योधनादि, यांनीं केलेल्या अपराध-समूहाला. ५वृद्ध. ६द्यूत पहाण्याच्या कौतुकानें मिळालेले आप्त. ७ दुष्टास अनुसरल्यानें.

नमुनि पित्यासि निघाला तो व्यसनोन्मुक्त सस्वजन पार्थ
सुजनासि गमे ज्याच्या कीर्तिश्रवणेंचि जन्म अनपार्थ॥
दुःशासन, कर्ण शकुनि दुर्योधन हे जया स्थळीं होते ॥
तेथें जाउनि सांगे " शक्र-प्रस्थासि चालिले हो ते ॥६५॥
सुटले शत्रु दुखविले अहिसे वधितील हे तुह्मां; तारा ॥
व्यसनांत आपणांतें, न बरा हा नाश-हेतु ह्मातारा"६६॥
जाणोनि अत्यनिष्ट क्षिप्र तया आंधळ्यासि भोंदाया ॥
धांवुनि गेले शत-सुत शोकाऽजगराऽननांत कोंदाया ६७॥
त्यातें ह्मणे सुयोधन "केला कीं व्यर्थ यत्न हा तातें ॥
मोहें गमाविलें जें आलें अहि-मूर्ध-रत्न हाता तें ॥ ६८॥
जों झाले न रणोद्यत सर्वोपायें सपत्न मारावे ॥
त्यांतचि कुशल; स्वाऽऽश्रित जन सुज्ञें सर्वथैव तारावे६९॥
वृत्रारीप्रति वदला गुरु ज्या या भद्र-धाम नीतीतें ॥
प्रभुवर्या अवमानुनि कारिसी बहु खिन्न कां मनीं तीतें॥७०॥
द्यूत-जित प्रचुर-धनें पूजुनि नृप सर्व करुनि वश अरि ते
मारावे, हें मन्मत; कीं न भले वृत्तिचे हरण करिते ॥७१॥
पांडव न सोडिले ते दुखवुनि अत्यंत उग्र अहि तातें ॥
नीति-ज्ञ कोण दुसरा अंत्य-सुताच्या करील अहितातें ७२
येतील कटक घेउनि आह्मां वधितील राज्य हरितील ॥

१ धर्मराज. २ व्यर्थन. ३ शोकरूपी अजगराच्या मुखांत. ४ मरण्यास. ५ सर्पाच्या मस्तकावरील मणि. ६ युद्धास तयार. ७ शत्रु. ८वृत्रासुराचा शत्रु इंद्र, यास. ९बृहस्पति. १० कल्यणाचें गृह.

दयितेच्या क्लेशांतें चिंतुनि ते काय गा न करितील॥७३॥
आजुनि तरि सावध हो द्यूतार्ऽथ फिरोनि येतसे कर गा॥
करिल पुन्हा मन्मातुल शत्रूंच्या राजसंपदा करगा ॥ ७४ ॥
द्यूतीं असा करूं पण करणें वनवास अब्द बारा, हें ॥
होतां, अज्ञात वसति वत्सर, आइक, उगाचि बा राहें ७५
अज्ञात-वास अंतीं करणें जो काय तो समानजनीं ॥
जरि उमगले, वसावें द्वादश वर्षें पुन्हा तसेंचि वनीं ॥ ७६॥
निद्रिद मामा, मा मा न ह्मण, मदिष्टार्ऽथ तप नको कांहीं
प्रार्थावा पुत्रांहीं स्व पिता स्वसुखार्थ नपन कोकांहीं॥७७॥
होऊनि वद्ध-मूल स्वसहाय करूं समस्तनृपकटक ॥
मग मज भक्ष्य, व्यसनीं तरलेही अरि, जसे घृतीं वटक ७८
व्यसनीं सरंध्रहि उरे जोंवरि राहे धरूनि तळ उगला ॥
भक्ष्यचि इतर सु-वृत्तहि वटक कटाहीं तरोनि जो फुगला" ७९
अंध ह्मणे "हूं किंवा जाऊंद्या जवन दूत नंदन हो ॥
देवा, युधिष्ठिराचा तो द्यूतोत्साह लेश मंद न हो"॥८०॥
द्रोणादि सुज्ञ वारित होते, परि न वळलाचि तो कांहीं॥
मरला भरीं भुलविला दावुनि धन-लोभ दुष्ट तोकांहीं ८१

१ प्रिया द्रौपदी, तिच्या. २ हस्तगत. ३ आत्मतुल्य जनांत. ४ मामा ह्म० 'नाहीं नाहीं' असें. ५ चक्रवाक पक्ष्यांनीं. ६ ज्यानें मूळ ह्म० पाया मजबूद झाला तो. ७ आपणांस मदत करणारें. ८ सर्व राजांचें सैन्य. ९ वडे. १० रंध्र ह्म० छिद्र, पक्षीं न्यून ११ क्षुद्र. १२ वर्तुलाकार, पक्षीं सदाचारसंपन्न. १३ कढई मध्यें.

लोभांऽध गुरु न हो तो आत्मांऽरि तथांनिजानुगां-धारी
आंताहि जो अंध तया बोध किती हो करील गांधारी ८२॥
नरकीं बुडवील, न हा पुत्र, त्यागचि बरा, न अंत्याग ॥
बांधा वधा खळाला स्नेहें घडतें तुझांसि अत्यांग ॥८३॥
क्षण-भरि मात्र खळ-तनुज- विरहातें मन करूनि गाढ वहा
राजगृहीं न वसावा. भ्रमलासि, नव्हे सदश्व गाढव हा ८४
एकैक शत-सुताऽधिक ते सुत याहूनि काय हो ऊन ॥
सन्मणि टाकुनि घेतां कांच कसे सुज्ञ-राय होऊन"॥ ८५ ॥
भूप ह्मणे "बहुधा कुळ बुडतें वारावयासि मी न शकें ॥
गरुडासहि लंघ्य न जें लंघावें दैव तें कसें मशकें ॥ ८६ ॥
गांधारि, उगीच रहा होऊंदे द्यूत औरसा मान्य ॥
श्रुति-ह्मणति न इतराला त्यासारिसि केंवि पौरसामान्य"
ऐसें वदोनि भूपें पाठविला प्रातिकामि सूत बळें ॥
तेव्हां स्तविति खळ खळां गळति खळखळां सु-साधु-नेत्रजळें
तो सूत दूर धांवत जाउनि गांठी पथांत पार्थातें ॥
ठकुनि लुटावया पटु ठक जेंवि स-सार्थ-वाहसार्थातें॥८९॥
"द्यूतार्थ बाहतो तुज तात, युधिष्ठिर नराऽधिपा परत"
ऐसें तो सूत ह्मणे दे श्रवणें दुस्तरांधि पाप-रत ॥ ९० ॥

१ आत्मघातक. २ त्या प्रमाणें ह्म० आत्मारी प्रमाणें वर्तणाऱ्या सेवकांना पोसणारा. ३ न टाकणें. ४ मोठा अपराध. ५ उत्तम घोडा. ६ सार्थवाह-व्यापाऱ्यांचा नायक. त्यासहित व्यापारी मंडळीला. ७ तरण्यास कठिण अशी चिंता.

धर्म ह्मणे "क्षम नाहीं लंघाया सुज्ञही नर कपाळा ॥
स्तुत होय स्वःपाळा केव्हां 'जी जी' ह्मणे नरक-पाळा॥९१
द्यूतें क्षय हें कळतें, परि फिरतों, लंघ्य काय हो तात ॥
पितृ-वचनें-कर निरुपम श्री-कीर्तींचे निकाय होतात" ९२
द्यूतासि पुन्हा सेवी गुर्वाज्ञे करुनि शिशु जसा गरळा ॥
किंवा परार्थ जेंवि प्राशी श्री-कंठ नीरसा गरळा ॥ ९३॥
बसले सभेंत पांडव शकुनि ह्मणे "गा युधिष्ठिरा, जरि तें॥
जित-धन दिधलें, देवू, वृद्ध करू सर्व गेह आज रितें ९४॥
राया आतां द्यूतीं एकचि आह्मी तुह्मी करूं पण हो ॥
सर्वस्व हारवावें कीं जिंकावें, न भीरु तूं पण हो ॥ ९५ ॥
द्यूतीं निर्जित झालों तरि आह्मी रौरवाऽजिनें धरुनी॥
द्वादश-वत्सर व्हावें वन-वासी सु-मुनि-वृत्तिला वरुनी९६
अज्ञातवास सजनीं परि वत्सर एक मग करावा हो ॥
होतांचि ज्ञात पुन्हा पहिला वन वास-पथ धरावा हो९७॥
जित होतां वर्तावें याचि न्यायें तुह्मीं सदारांनीं ॥

१ स्वर्गपालक इंद्राला. २ दुर्दैवाला, आक्का बाईला. ३ पितरांची आज्ञा पाळणारा. ४ राशि. ५ गरळा ह्म० विड्यांत अनेक औषधें घालून चावून त्याचा जो रस लहान मुलांस पाजितात, तो. ६ तुमचें जिंकून घेतलेलें द्रव्य किंवा घरांतील सर्व द्रव्य धृतराष्ट्रानें तुह्मांस दिल्यास कांहीं चिंता नाहीं. तो तें खुशाल देवो. ७ रुरु ह्म० काळवीट, त्याचीं अजिनें ह्म० चर्में. ८ लोकवसतीच्या प्रदेशांत. ९ ओळखलेले. १० स्त्रीसहित.

म-जनीं वर्षभरि वसा द्वादश-वर्षें वसा सदा रानीं ॥ ९८ ॥
तेरा वर्षें ऐशीं क्रमिल्यावरि लागतांचि चवदावें ॥
राज्य करावें आपण, हा पण; कोण्हीं असत्य न वदावें" ९९
सभ्य ह्मणति "अक्ष-ग्रह घात-भ्रमकर, नसे असा घुतरां॥
कौरव हो, गौरव हो सुजनीं न करुनि असें असाधु तरा १०० ॥
अन्योन्य-करें तुमचा बुधहो, समरांत न सहसा वध हो ॥
धर्मा, तूं तरि आइक देती भयलक्ष अक्ष, सावध हो" १ ॥
धर्म ह्मणे "न व्यसनी, परि मी त्यजितां निज प्रतिज्ञा ते
जे सुप्रसन्न मजवरि केवळ विटतील संप्रति ज्ञाते ॥ १०२ ॥
शकुने, खेळ यथेष्ट द्यूतीं मी मांडिला त्वदुक्तपण ॥
छद्में कल्याण नसे ऐकावें प्रथम हें सदुक्त पण ॥ १०३ ॥
पूर्वोक्त पणोच्चारण करुनि सभेमाजि शकुनि अक्षांतें ॥
टाकुनि 'जितं' ह्मणे खळ कपटें जिती खळांऽतदक्षांतें ॥ १०४

# अध्याय. ७ वा.



## सारांश.

पांडव मृगचर्मपरिधान करून वनास जावयास निघाले. त्या समयीं दुःशासनानें त्यांची थट्टा केली. तो द्रौपदीला ह्मणाला "पां-

१ फांशांचा अंगीकार २ नादिष्ट. ३ तूं बोलिलेला पण. ४ खळांचा अंत करण्यांत दक्ष जे पांडव त्यांस

डव नपुंसक आहेत. यांस सोडून तूं दुसरा पति कर." तसेंच आणखी बोलला कीं, "काळरूपी अतिथीला मधुपर्कपूजा करिते वेळीं हे पांडवरूप पशु सोडिले आहेत. यांस न मारतां 'गौः गौः' असें ह्मणून सोडून दिले आहेत." असें बोलून आनंदानें नाचला. दुर्योधनानेंही भीमाच्या गतीचें अनुकरण करून त्याची थट्टा केली. तें पाहून भीम क्रोधानें बोलला. "मी दुर्योधनाच्या मांड्या गदेनें फोडीन, सहदेव शकुनीला मारील, अर्जुन कर्णाला मारील. या प्रमाणें चवदाव्या वर्षीं या तुमच्या दुष्टकर्माचें उसनें फेडूं." धर्मानें वनास जातांना धृतराष्ट्रास नमन करून त्याची आज्ञा घेतली. व सर्वांस विचारून तो बंधूं सह वनास जावयास निघाला. विदुरानें कुंतीस आपले घरीं ठेवून घेतलें.

पांडव निघून गेल्यावर नारद स्वर्गांतून उतरून सभेंत आला. व "भीमार्जुनांच्या हातून चवदाव्या वर्षीं हे सर्व कौरव नाश पावतील" असें भविष्य सांगून निघून गेला.

अजिनें नेसुनि झाले पांडव वन-वास-दीक्षित तशांतें ॥
दुःशासन बहु हांसे गावें ज्यांच्या सुधोत्तम-यशांतें ॥ १ ॥
आजि-पराजित नव्हते झाले जे, तेच हे पराजित कीं ॥
आह्मां सुखेंचि तितुकीं दुःखेंजीं आमुच्या परा जितकीं ॥
आजि अकंटक केलें नृपनयनिपुणें सुयोधनें राज्य ॥
प्राज्य प्रीतिद झालें सुहृदांला गाळिलें जसें आज्य ॥३॥

१ अमृता पेक्षां उत्तम यशांला. २ युद्धांत पराभव पावलेले. ३ राजनीतिनिपुणानें.

तातें ह्मणे "नित्य असो या धर्मा भव्य भाग्य मत्तनया"
ते हे आह्मां हांसत होते, रक्षी न भाग्यें-मत्त नया ॥४॥
हे पंडित परि पांडव नरकीं श्रीमद धरूनि कां पडले ॥
केवैर्तास अदीक्षित अजिनधर वनांत बंधु सांपडले ॥५॥
आपण षंढतिलसे असें निःसंशय जाणतील हे आतां ॥
गर्वें फुगले होते फुगवूनि स्वगुण काय कीं गातां ॥ ६ ॥
क्लीबांसि सुता देउनि सुमति परि द्रुपद फार चुकला हो॥
यमभट, हो, बळकंट यां स्वाऽपत्य-विडंबकासि बुकला हो
द्रौपदि, हे कुरु दांत क्षांत सधन, यांत कान्त जोडावा ॥
लाभ नसे, ताप वसे, ज्यामध्यें तो कु-संग सोडावा ॥८॥
षंढतिल, चर्ममयमृग, कर्क-यव, जसे तसेचि फटकळ गे ॥
हे व्यर्थ कांकणाचे दाविति न समर-सिंधु-तट कळंगे॥ ९॥
कृष्णे, काडी मोडीं, काय तुला दीन मानले शवसे ॥
जे राज्य-भ्रष्ट कितव ज्यांचे ठायीं न मान लेश वसे" १०॥
भीम ह्मणे "रे कोल्ह्या याचा घेईन मूड जाण खरें ॥
हाणीन बाण वर्मीं हाणिशि वचनें जशींच बाणखरें॥११॥
"काळाऽतिथि-मधुपर्की जे पांडव-पशु निवेदिले होते ॥

१ धृतराष्ट्र. २ भाग्यें करून उन्मत्त झालेला पुरुष. ३ कातकऱ्याला. ४ नपुंसक. ५ द्रुपदाला. ६ आपल्या अपत्याची विडंबना करणाऱ्याला. ७ इंद्रियदमन ज्यांनीं केलें ते. ८ सहनशील. ९ धान्याचें वांझें कणीस. १० युद्धरूप समुद्राचें तीर. ११ कांकणाचा चुरा. १२ बाणां सारखीं तीक्ष्ण. १३ काल हाच अतिथि. त्याच्या मधुपर्कपूजे मध्यें.

जाणो न मारिले वध- कातरें सोडोनियां दिले हो ते"॥१२
'गौ गौं' असें ह्मणे खळ दुःशासन अति असंत तो नाचे ॥
किति वर्णावे सद्गुण सन्नीति करूनि संततोनाचे ॥ १३ ॥
दुर्योधन आपण मति- वेश्येचा जरि नवा दर्वा, याला ॥
हांसे गत्यनुकारें वाळ न भी ज्वलन वाढवायाला ॥ ४१ ॥
हंस-खगा काक जसा, कीं धुतरा पुष्प-कुळ-वरा कमळा॥
वेडावी, लावाया वांछी अर्कीहि तो वराकं मळा ॥ १५ ॥
तें अवलोकुनि ह्मणे त्यासि निवृत्तार्धकाय भीम असें ॥
"मंद रहा, मंदर हा मी भीम खळाऽब्धि-मथन-योग्य असें
मी या सुयोधनाचा हंता, जरि मन्मनांत अनहंता ॥
सहदेव शकुनिचा या, कर्णाचा जिष्णु दुष्ट-जन-हंता" १७
जिष्णु ह्मणे "कर्तव्य प्रकट न करिती निजाननें आर्य ॥
पाहूं तें चवदाव्या अब्दीं यावरि घडेल जें कार्य" ॥१८॥
भीम ह्मणे "दुर्योधन- दुःशासन-कर्ण-शकुनिरक्तानें ॥

---

१ मरणा विषयीं भितरे. २ गाय, गाय. मधुपर्कपूजेच्या वेळीं अतिथीला गाय देतात. ती मारितात किंवा 'गाय गाय, असें ह्मणून सोडून देतात. ३ दुष्ट. ४ संतत-ऊन ह्म० निरंतर जो नीच, त्याचे. ५ बुद्धिरूप वेश्येचा. ६ वेश्येचे मागें पखवाज वाजविणारा साजिंदा असतो, त्याला निंदेनें ह्मणतात. ७ भी-माला. ८ भीमाच्या गतीच्या अनुकरणानें. ९ सूर्याचे ठिकाणीं १० नीच. ११ मागें फिरविला आहे शरीराचा अर्धा भाग ज्यानें तो. १२ अहंकार नसणें.

भू त्वां तृप्त करावी ऐकावें गुरुवचो ऽनुरक्तानें" ॥ १९ ॥
पार्थ ह्मणे "करिन तुझें जें प्रिय तेंचि प्रसाद जोडाया ॥
हें किति ! मज उशिर नसे त्वत्प्रतिकूल स्व-बाहु तोडाया॥
अनुगांसह कर्णातें मारुनि मी हर्पवीन आर्यातें ॥
तोडीन स्व-भुजहि जरि हे न तुझ्या साधितील कार्यातें २१.
परि आरि राज्य न देइल जरि हायनें लागतांचि चवदावें
गुरुसीं वाक्य प्रथमचि सुविचार बरा करूनिच वदावें"२
सहदेव ह्मणे "शकुने, अक्ष ह्मणसि परि नव्हेत हे अक्ष॥
मूढा सहदेवानें त्वां वरिले शर रणीं स्व-वध-दक्ष ॥२३॥
कार्यें उरकूनि घे रे तेरा वर्षेंचि राहिलें आयु ॥
होतिल चतुर्दशाऽब्दीं माझे शर सर्प, असु तुझे वायु ३४॥
पोर्दी जशी पति- शुभा- ऽशुभ-भव-मुदमुद्भरें पुलक लंका॥
गांधार-राजधानी पोषू तैशीच रे कुल-कलंका" ॥२५ ॥
नकुळ ह्मणे "व्याघ्र-शिरीं दिधला हा वाम पाद ओतूनी
हा! तापविली दयिता कर्णीं परुषोक्तिगरळ ओतूनीं२६॥
कृष्णेसि रुक्ष वदले जे जे, मरतील ते समस्त रणीं ॥
खळ-बळ नकुळ तसें, तृणं- दव कीं किंवा जसे तमस्तरणी"

१ गुरुवचन पाळण्या विषयीं तत्पर. २ वर्ष. ३ धारण करिते. ४ पति-शुभ-अशुभ-भव-मुद्-अमुद्-भरें ह्म० रावणाच्या शुभाशुभ कर्मा पासून झालेला अनुक्रमें हर्ष किंवा विषाद, यांच्या अतिशयपणानें. ५ माजरांनीं. ६ कठोरभाषणरूप विष. ७ तृण आणि वणावा. ८ अंधकार व सूर्य.

एवंविध प्रतिज्ञा करुनि महासत्व पांडु-सुत राया ॥
धृतराष्ट्रा पुसति नमुनि त्या धर्मं आपदब्धि उतराया २८
धर्म पुसे ज्यां ज्यांतें मागे जाया वनासि आज्ञा ते ॥
भीष्म द्रोण कृप विदुर होऊन उदश्रु ह्मणती हा! ज्ञाते२९
त्यांहि पुसे स्वाऽहित जे वाजविती न धरुनि त्रपा टीर ॥
धर्मासि एक माजे सदसत्सम-शील मित्र पाटीर ॥ ३० ॥
छळकाशि कवि न शापिति देतें जई कनक काय हो गाळी
पाळी जों त्यांशि मधुर इक्षु तसा त्याहि अदय जो गाळी
विदुर ह्मणे "कुंतीचें वपु कोमल, वास-योग्य न वनीं तें ॥
कष्टांत वृद्धदेहें न उरावें, आतपांत नवनीतें ॥ ३२ ॥
सेवाऽधिकार मज द्या ठेवा माझ्या गृहीं स्व-मातेतें ॥
दुर्गत बंधु पहातां दुःख जसें इतरथा न भातें तें" ॥ ३३॥
पांडव ह्मणति "बहु-बरें पितृ-तुल्य पितृव्य तूं बुधा,सरसें ॥
भवदुपदेशें निवतो, त्वद्रापण तापल्या सुधा-सरसें ॥३४॥
तूं आमुचा परम-गुरु न त्वत्सम ऐकिला सदय चुलता ॥
त्वच्छाया नसतां किति आह्मी? या संज्वरें गिरिहि उलता"
विदुर ह्मणे "बा, धर्मा, व्यसनीं सद्रीति-नीति नव नौका
करिशील राज्य, झाला काय श्रीराम-राय न वनौका ३६

१ महाज्ञानी. २ विपत्तिसमुद्र. ३ अश्रुयुक्त. ४ स्वशत्रु. ५ लज्जा. ६ कुह्रा. ७ सत् आणि असत् हे समशील वाटतात, ज्याला तो. ८ चंदन. ९ शिव्या. १० दारिद्री. ११ दुसऱ्या प्रकारानें. १२ वृद्धि पावे. १३ तुझ्या उपदेशानें. १४ तापलेल्याला. १५ अमृताच्या सरोवरासारखें. १६ वनवासी.

सर्व असा एकमतें, जें युष्मात्प्रिय, घडेल सत्वर तें ॥
कोठेंहि कधींहि चिर स्थिर अनुभाविलें न दुःख सत्वरतें" ३७
कथिली विदुरें सन्मति जाणों दिधली तयां शिदोरी ती॥
कीं व्यसन-कूप-पतितां अनुपायज्ञां तयांशि दोरी ती॥३८
पुत्र-वियोगें कुंती बहु वळमळली, ह्मणे " अहाहा तें ॥
मागूं कीं निंदूं सा लिहिला जेणें कुलेख हा हातें ॥ ३९॥
असु जातां तनु विकळा कीं जातां वत्स जेंवि धेनु, सती॥
तेंवि ह्मणे अलिकीं कां लिपि लिहिली अश्रु-दा विधें नुसती
त्यजिली जसी तुह्मीं हे सुत हो, त्यजिली तशी न कां असुनीं
हे या संज्वर-गेहीं देहीं होतील तप्त कीं असुनी ॥ ४१ ॥
सुत हो शुद्धांस कसें आतळलें व्यसन; अंक हा रचिला ॥
विपरीताचि हें कुरु-कुळ- दीपांनीं स्वप्रकाश हारविला॥४२॥
आलां हत-भाग्येच्या पोटाला ह्मणुनि भोगितां ताप ॥
संसर्गें भोगावें पुण्य जसें साधु हो तसें पाप ॥ ४३ ॥
तुमचा धन्य पिता ती माता माद्री सतीहि धन्या हो ॥
वंध्यत्व बरें, परि मज ऐशी कोणासही न कन्या हो॥४४
माझा पुत्र स्नेहें त्यजुनि मला तुजकडेचि आला गे ॥
स्वव्रतवत् प्रतिपाळीं रक्षाया अधिक काय या लागे॥४५
वत्से कृष्णे, माझा बाळक सहदेव देवसा यास ॥
बहु सांभाळीं व्हावा सुकुमार कुमार हा न सायास ॥

१ संकटांच्या विहिरींत पडलेल्यांस. २ ज्यांस उपाय माहीत नाहींत, त्यांस. ३ कपाळीं. ४ कलंक. ५ आयासयुक्त.

म्यां वत्स निरविला तुज, हा मदसुन्यास, यास जतन करीं
विश्वासें दिधलें हें तुझिया जीवन-हित स्व वतन करीं४७
रे वत्सा, सहदेवा जाऊंदे धर्म, भीम, वन-वासा ॥
जाऊ अर्जुन, नकुळहि, कां वा झालासि बांधव नत्रासा॥
मजविण तुज, तुजविण मज तेरा कल्पान्त ते, न वत्सर हा
ने मज, नेम जरि अधिक, पाहूं तरि दे मुखेंदु वत्स रहा॥
हा कृष्णा, जगदीशा, काय बरें दैन्य हें अगा धात्या ॥
व्यसनार्तासि तराया सेतु जसा सागरा अगाधा त्या ५०
कृष्णाश्रित-जन-सर्व- व्यसन-घन-घन-प्रकंपना बापा ॥
तापाकुल कुल कुरुचें संरक्षावें हरूनियां पापा ॥ ५१ ॥
गे बाई कौसल्ये, संसाराला न हे वृथा आली ॥
झाली तुहिन-कर-कुळीं उत्पन्न दुजी तुझी पृथा आली५२
काय करूं चुकला विधि भाळीं लिहितां लिहावया मरण
बहुःमुखमाझ्याधितेजें पडलें चतुराननासि विस्मरण"॥५३॥
विदुर तिला समजावुनि नेउनि सदनीं ह्मणे नकोचि रडों
जननि, उगी, धीर धरीं, या चिंतागिरि-भरें नको चिरडों॥
सति भर आनंदाला जो देतो तोचि भर विलापाला ॥

१ भाइया प्राणांचा ठेवा. २ उपजीविकेस हितकारक. ३ ब्रह्मदेवाचे दिवस. ४ वर्ष. ५ आश्रितांचीं सर्व दुःखें, हेच निबिड मेघ, त्यांचा महावायुच अशा हे कृष्णा. ६ चंद्रवंशांत. ७ बहुमुखांचें जें माझें दैव, त्याच्या तेजानें. ८ ब्रह्मदेवाला. ९ चिंतारूप पर्वताच्या भारानें.

बल-जलं-निधिनें विधिनें श्री-राम-मुखींहि भरविला पाला"
कौरव पौर-वधू बहु रडति ह्मणति तें कु-कर्म परिसून ॥
"वृद्ध श्वशुर च्यवला न च्यवली गांजिलीहि परि सून५६
बाई द्रौपदि केली आत्म-श्रीचीच दुर्दशा कुरुनीं ॥
गुरुनीं न दंडिलें कां वारावें कां न दुर्जना दुरुनी ॥५७॥
स्ववितील लोक तुज गुरु मुकृतें व्यसनांत बाइ,तरलीला॥
गेया हे या वंशीं त्वल्लीला, असि नसे इतर लीला ॥५८॥
स्वकृताऽनय आठवितां धृति पावे नाश अंधरायाची ॥
आंवळिली आधि-महा- पाशें बांधूनि कंधरा याची॥५९
उद्विग्नचित्त होउनि आणवुनि क्षिप्र सुस्वभावातें ॥
'पांडव वनासि कैसे गेले ऐसें पुसे स्व भावातें ॥ ६० ॥
"नृप मुख झांकुनि गेला देता झाला जना न पाहूं तें ॥
पाहत होता जातां विपिनाशि वृकोदर स्वबाहूं तें ॥६१॥
जो सर्व-शिष्य-वृंदीं द्रोणाला परम-तोषकर सिकता ॥
त्याचा वनासि जातां पेरित होता पथांत कर सिकता ॥
नकुळ रजांहीं मळवुनि सर्वाऽगाला वनासि गेला हो ॥
सहदेवेंही जातां सारवुनि मुखेंदु मलिन केला हो ॥ ६३॥
केशांनीं मुख झांकुनि गेली रोदन करीत तव सून ॥
द्रुपदें विलोकिली जी कन्या देवव्रजांसि नवसून ॥६४ ॥

---

१ बलाचा समुद्र, अशा विधीनें. २ स्वापराध. ३ चिंता रूप मोठ्या पाशानें. ४ मान. ५ शिकणारा. ६ वाळू. ७ देवसमूहाला. ८नवस करून.

कुश-दर्भ-पाणि भगवान् धौम्य पुरे गात गात गेला हो ॥
क्षत्ता ह्मणे "तुह्मां त्यां श्रुत तद्गमन-प्रकार केला हो" ॥
अंध ह्मणे "गा माझ्या चतुरा चतुरास्य-सुज्ञ भावा तें ॥
रूप तसें विविध तिहीं कां केलें? स्पष्ट सांग भावातें ६६॥
क्षत्ता ह्मणे "युधिष्ठिर करिता झाला स्वदृक्-पथा पिहित
यद्यपि भस्म करावे तव-सुत, चित्तीं सदा तथापि हित ६७
घालीन गांठि सत्य स्वरिपूसीं संगरांत बाहूंनी ॥
समजावी भीम असें. तळमळ करितां मनांत, बाहूंनीं ६८
हा भाव अर्जुनाचा, कीं शत्रूंसीं घडो समर, सिकता ॥
जेंवि अशा इषु सोडिन, माझी समरीं हरा सम रसिकता
कोणीं न वोळखावें हस्तिपुरीं आपणासि, हा नियम ॥
करूनी, करिति रजांहीं लिंपोनि स्वस्वरूपहानि यम ७०
कृष्णेचा भाव असा ज्यांहीं मज गांजिलें अति-द्वेषें ॥
त्यांच्या स्त्रिया समस्ता चवदाव्या वत्सरीं अशा वेषें ७१
देवुनि जलांजलि स्व- प्रिय-सुतबंधूंसि ह्मणुनि हा रडत ॥
सोडोनि मोकळे कच येतील पथीं अशाचि आरडत ७२
धौम्याऽभिप्रायहि हा जें वरिजेतील कुरु परेतत्वें ॥
गातील पुढें कुरुगुरु दर्भ धरूनियां करीं बरे तत्वें" ७३॥

१ मृतकर्मांतील मंत्र. २ ब्रह्मदेवाप्रमाणें ज्ञात्या. ३ अभिप्रायाला. ४ आपल्या दृष्टिमार्गाला. ५ आच्छादित. ६ बोलावून. ७ भुजांच्या योगानें. ८ नकुलसहदेव. ९ प्रेतत्वें. १० कौरवांचे उपाध्याय.

ऐसें विदुर वदे तों देवर्षि त्यजुनियां नभा उतरे ॥
बोले सभेंत कीं "हा, लोभी कविचाहि हा न भाउ तरे॥
दुर्योधनाऽपराधें भीम-धनंजय-बळें महागर्व ॥
हे कौरव चवदाव्या वर्षी मरतील निश्चयें सर्व" ॥ ७५ ॥
बोलोनि भविष्य असें भरला नारद मुनींद्र गगनींच ॥
द्रोणाशि शरण गेले राज्यनिवेदन करुनि मग नीच ७६
शरणागत-दुर्योधन- भूपाला गुरु ह्मणे "अगा राजा ॥
रक्षील कोण त्याला? वद, दहनें व्यापिलें अगारा ज्या ॥
पांडव अवध्य सुरसुत धार्मिक, माझे वधिश्वर असु खरे॥
तत्त्यागीं महद्सुख प्राण- त्यागीं नसे मज असुख रे॥७८॥
आलां शरण मज तुह्मी तुमचाही उचित होय अत्याग॥
शरणाऽगताऽरिच्याही सागें घडतें जनासि अत्याग७९
मन्निधनार्थ द्रुपदें केला उत्पन्न तनय. तो मातें ॥
धृष्टद्युम्न त्पतसे ग्रासाया, जेंवि राहु सोमातें ॥ ८० ॥
भगिनी-प्रियार्थ समरीं होइल पांडव-सहाय सद्रिपु रे ॥
काळापुढें किती मी? हरिशीं युद्धांत काय अद्रि पुरे?८१॥
त्यासि जय-श्री न त्यजि तसि, जशि ऐरावतासि अभ्रमुंर॥

१ नारद. २ दुर्योधन. ३ धृतराष्ट्र. ४ त्याग न करणें. ५ मोठा अपराध. ६ माझ्या वधाकारितां. ७ द्रौपदीच्या प्रीतीस्तव. ८ इंद्राशीं. ९ ऐरावताची स्त्री.

यच्छर-पवनें समरां- ङ्गिर-गगनीं शत्रु-कटक-अभ्र पुरे॥८२
त्या अर्जुना सर्व जें करणें समरांऽगणीं समागम तें ॥
मरण-शताऽधिक संकट सत्य मज तदीयपितृ-समा गमतें॥
तुजकारितां रज आलें चवदाव्या वत्सरीं रणीं मरणें ॥
शाश्वत न तुझीहि, करा सत्वर सर्वहि असेल जें करणें"
अंध ह्मणे "विदुरा, गुरु- वचन खरें, पुत्र वदति तें न खरें
यां दुःसहें धनंजय- शस्त्रें, हरिचीं गजां जशीं नखरें ८५॥
त्यांला वन-वास न हो, सत्य-व्रत-रक्षणार्थ अथवा हो, ॥
परि पाद-चार न विहित त्यांसि तयांचा सशस्त्र रथ वाहो"
गेले वन-वासाला जेव्हां ते विष्णुचे सखे दास ॥
संजय असें पुसे त्या अंधास स्वाननें सखेदास ॥ ८७ ॥
"राया, सुत-विजयीं तुज व्हावा आनंद, खेद कां गमला?
धर्म बुडविला, हरिली श्री, चुकलें काय कार्य? सांग मला
धृतराष्ट्र ह्मणे "आतां कैंचा आनंद संजया, मातें ॥
चिंता-रजनीच्या अनु- भवितें मच्चित्तकंज यामातें॥८९॥
हृत-मणि-फणि-वैर बरें वा गा साहेल कोण, वैरा या ॥

१ ज्या अर्जुनाच्या बाणांच्या वायूनें. २ रणांगणरूप गग-नांत. ३ शत्रुसैन्य हेंच मेघ. ४ त्यांच्या पित्या सारख्या मला ५कौरवांना. ६ पायीं चालणें. ७ खेदयुक्त झालेल्या अंधास.८ चिंतारूपी रात्रीच्या. ९ माझें चित्त हेंच कमल. १० प्रहराला. ११ ज्याच्या मस्तकांतील मणि हिरावून घेतला, त्या सर्पाचा द्वेष.

कळताचि कुकर्म केलें कुरुकुळ काळाऽननांत वैराया ९०॥

विदुरोक्त हिताहि तनुजं- स्नेहैकपरें न मानिलें कांहीं ॥
केली म्यांचि, न केली अक्षांहीं, वा न हानि लेंकांहीं९१

भक्तमयूर-करें हें श्रीगुरुनें लिहविलें सभापर्व ॥
कीं आर्यानंदाचें रसिकांची नित्य हो सभा पर्व ॥ ९२ ॥

---

१. मृत्युमुखांत. २ पुत्रप्रीतितत्परानें. ३ आनंदाचें पर्व ह्म० आनंदाचा एक अवयव.



---

मुम्बई येथें.
श्रीहरिवरदा प्रिन्टिंग प्रेसमध्यें छापिला.

# सभापर्व.

| पृ. | ओ. | अशुद्ध. | शुद्ध. |
|---|---|---|---|
| ३ | ५ | करावा | करावा |
| ४ | १० | तसें | जैसें |
| ६ | ८ | नहुप | नहुष |
| ७ | ८ | तपकर | तप कर |
| ८ | १ | जगंम | जंगम |
| ११ | ९ | जरा संधा | जरासंधा |
| ११ | १२ | सन्यास | संन्यास |
| १२ | ५ | अशयें. | अयशें |
| " | १३ | ध्यानस्थ | ध्यानस्थ |
| " | १८ | अद्दुत | अद्भुत |
| १३ आ. ७६ | १ | सुटलेली ओंळ | देता झाला रा· जा स्वकरें स· मभाग करुनि दोघांतें ॥७६॥ |
| " | ६ | जडिलीं | जडलीं |
| १४ | १९ | करणाराची | करण्याची |
| १५ | २ | हुताग्नि वर्चा- | हुताग्निवर्चा |
| " | १६ | मोडिती | मोडिति |
| १७ | ६ | कार्तिकाच्या. | कार्तिकाचा |
| " | ७ | दिवसांचा | दिवसाचा |
| " | ८ | वस्त्र [ मीच्या | वस्त्र [ त्याचा |
| " | १९ | कार्तिकस्वा- | कार्तिक माहि- |
| १७ | १५ | भुतें इ०. | कृष्णचतुर्दशी |
| १८ | २ | कोशिघ्र | कौशिघ्र |
| " | ११ | देशोदशींचे | देशोदेशींचे |
| १९ | १२ | पाडव | पाण्डव |
| १९ | १८ | पूर्वेला | पूर्वेला |
| २१ | ४ | सम्राट | सम्राट् |
| २१ | १० | द्रोण | द्रोण |
| २२ | १६ | ह्मणले. | ह्मणेल |
| " | १८ | ज्याज्या | ज्याच्या |
| २४ | १४ | प्रभूनें | प्रभुनें |
| २८ | ३ | धृतराष्ट्रच्या | धृतराष्ट्राच्या |
| ३० | ४ | आगा | अगा |
| ३१ | ३ | त्यातें | त्याला |
| ३२ | १५ | भाग्यें | भाग्य |
| " | १५ | कळवील | कळवीलें |
| ३५ | ५ | दोघांच्या | दोघींच्या |
| " | २० | सहवासानें | मसलतीनें |
| ३६ | ६ | वह | वद्द |
| ३८ | २ | व्यहारीं | व्यवहारीं |
| " | १४ | आगा | अगा |
| " | टी. ७ | आवरण | मार्गास |
| ३९ | १० | कृष्ण | कृष्ण |
| ३९ | १९ | संग्रहास | संग्रहास |
| ४६ | ४ | पाहताति | पहाताति |
| " | १९ | कामानवार | कमानदार |
| ४७ | १ | पात्राशीं | पत्राशीं |
| " | १० | हाहारें | हा हारें |
| ४८ | ८ | मंत्रा | मंत्र |
| " | ९ | नकांत | नाकांत |
| ४९ | ४ | सद्दर्पी | सहदर्पी |
| " | १५ | बधु | बंधु |
| ५१ | १ | यतांत | यूनांत |
| ५१ | २ | पहाती | पाहती |
| ५१ | ९ | सीतातें | शांतातें |

| पृ. | ओ. | अशुद्ध. | शुद्ध. |
|---|---|---|---|
| ५१ | १२ | युथंप | यूथपें |
| ५३ | ७ | शत गुरुतें | शतगुरुतें |
| ५४ | ४ | नद्या | न द्या |
| ५५ | ९ | क्षामालि | क्षमालि |
| ५६ | २० | निष्णांत. | निष्णात |
| ५७ | २ | ह्मणे | ह्मणे |
| ” | ८ | पर कराचि | परकराचि |
| ५९ | टी. ६ | न असोनि | असोनि |
| ५९ | ६ | नसून | असून |
| ” | १२ | धन- | धन |
| ” | २१ | तसर | तत्पर |
| ६० | २ | मृकंड | मृकंडु |
| ६२ | ११ | धेनुद्धरणींहि | धेनूद्धरणींहि |
| ६३ | ८ | कुजन | कुजन- |
| ६४ | १७ | यांचें | ज्यांचें |
| ६५ | टी. १ | हाहाकर | हाहाकार. |
| ७२ | १८ | चोघांनीं | चौघांनीं |
| ७४ | १० | अघन | अधन |
| ” | १३ | लोपावें. | लोभावें |
| ७७ | २० | स्तुत | प्रस्तुत |
| ८१ | १४ | अत्म | आत्म |
| ८२ | ६ | आज्ञात | अज्ञात |
| ८४ | टी. २ | वृर्वीला | यमाला |
| ८६ | २० | सुहृदांला | सुहृदांला |
| ८७ | ११ | कक | काक |
| ” | १७ | काळातिति | काळातिथि |
| ९२ | ९ | कृष्णाश्रित | कृष्णा श्रित |
| ” | १८ | भाज्या | माझ्या |
| ९३ | १३ | स्वबाहु तें | स्वबाहूतें |
| ९४ | १७ | परतत्वें | परतत्वें |

॥ श्री ॥

# श्रीमयूरकविकृत.



भारतांतर्गत

# वनपर्व.



बाबाजी अनंत तेंडुलकर.

यांनीं आपल्या

" श्रीहरिवरदा " छापखान्यांत छापिलें.

मुंबई.



१८९०.

# भारत.

## [ वनपर्वांतील आर्या. ]



## अध्याय १ ला.

### सारांश.

धृतराष्ट्राच्या आज्ञेनें पांडव वनवासास गेले. व ते काम्यक वनांत जाऊन राहिले. त्याबरोबर पुष्कळ ब्राह्मण ही गेले. सर्वांचा निर्वाह होण्या करितां, धर्मानें सूर्याची प्रार्थना केली, तेव्हां श्रीसूर्यानें त्यांस एक थाली दिली. तींतून पाहिजे तितकें अन्न त्यांस मिळतसे.

धृतराष्ट्रानें विदुरास स्वहित पुशिलें. तेव्हां विदुरानें "दुर्योधनाचा त्याग करून पांडवांचा स्वीकार कर" असें सांगितलें, तणें करून धृतराष्ट्रास फार राग आला. व त्यानें विदुराची निर्भर्त्सना करून त्यास पांडवां कडे जाण्यास सांगीतलें. तो पांडवांकडे जाऊन राहिला. धृतराष्ट्रास पुढें पश्चात्ताप होऊन त्यानें संजयास काम्यक वनांत पाठवून विदुरास परत आणविलें. विदुर परत आला तें पाहून दुर्योधनादिकांस फार वाईट वाटलें. दुर्योधन पांडवांच्या नाशार्थ सैन्य घेऊन निघाला. तों मार्गांत व्यास भेटले. त्यांनीं त्याचें निवारण केलें. व धृतराष्ट्रास

त्याचा त्याग करण्यास सांगितलें. तेव्हां धृतराष्ट्र ह्मणाला. "हा दुर्योधन कुलक्षयास कारण आहे. हें मला समजतें; पण काय करूं ! पुत्रमोहानें त्याचा त्याग माझ्यानें करवत नाहीं. करितां. तुह्मीं त्यास उपदेश करून वाटेवर आणावें". व्यास ह्मणाले, "माझ्या उपदेशानें दुर्योधन वळणार नाहीं.आतां मैत्रेयऋषि येतील. व ते उपदेश करितील. तो न ऐकिल्यास ते शाप देतील." असें ह्मणून व्यास निघून गेले. नंतर मैत्रेय आले. त्यांनीं दुर्योधनास पाण्डवांशीं सख्य करण्यास सांगितलें. तें दुर्योधनास रुचलें नाहीं. त्यामुळें ऋषीस राग आला. व " भीम गदेनें तुझ्या मांड्या चूर्ण करील " असा शाप देऊन तो निघून गेला.

---

नंतर विदुरानें धृतराष्ट्रास, भीमानें किर्मीर राक्षस कसा मारिला तें सांगितलें.

---

**डमरु-धर-प्रिय-गुण-सख पांडव गेले वनासि साङ्गनं,तें॥**
**यश परिसा, बुध हो, म्यां कथिजेल भवद्वरेंचि साङ्ग नंतें**
**जाय वनाशि युधिष्ठिर- नृप सहवासार्थिभूमि-सुरसहित॥**
**ज्याला न विप्र संगा-हुनि वाटे स्वर्गि-सेव्य सु-रस हित ॥ २**
**ब्राह्मण-कुळ-वृत्त्यर्थ प्रार्थी कौंतेय मानुला भावें ॥**

---

१ डमरुधर-शंकर. त्यास प्रिय गुण ज्याचे तो श्रीकृष्ण. त्याचे सखे पांडव. २ सह-अंगना ह्म० स्त्रीसहित. ३ तुमच्या वरानें. ४ संपूर्ण. ५ नम्र झालेल्यानें. ६ समागम इच्छिणाऱ्या ब्राह्मणांसहित. ७ देवांनीं सेविण्यास योग्य. ८ अमृत. ९ ब्राह्मणसमूहाच्या उपजीविकेकरितां. १० कुंतीपुत्र धर्म.

कीं त्या प्रभु[1]- प्रसादें   प्रणतें मोक्षादि इष्ट लाभावें ॥ २ ॥
जशि नंदिनी[2] वसिष्ठा,   दे धर्मा लोक[3]बांधव स्थाली[4] ॥
तीं चिंता हरि जैशी   शुद्ध ब्रह्मज्ञता[5] अवस्थाली[6] ॥ ४ ॥
धर्माश्रितासि रक्षी   श्री-हरिची जेंवि सर्वथा लीला ॥
हे ह्मणति 'अन्नपूर्णा[7]'   ते पांडव, विप्र, सर्व थाली[8]ला ॥५॥
अमृत-रसातें हांसति   ते ते सर्वहि पदार्थ, तीं जे वी[9] ॥
जोंवरि चतुर्विधा[10]ऽन्नें   प्रसवे तोंवरि न पार्षती[11] जेवी ॥६॥
स-ब्राह्मण-गण पांडव   बसले जाऊनि काम्यक-वनांत ॥
ग्राम्यालाप[12] त्यागुनि   जेंवि सुमति-रसिक काव्य[13]-कवनांत॥
धृतराष्ट्र स्वहित पुसे   त्याशि ह्मणे विदुर "खेद कां टाकीं
या खळ- सुताशि, करिता[14] हा केवळ ह्रदय-भेद कांटा कीं
अद्यापि तरी राया   ह्रदय तुझें पांडवांसि आपंगू[15] ॥
ते सुगति[16] सहाय बरे   तुज भव-मार्गांत काय हा पंगू[17]" ९॥
अंध ह्मणे" रे विदुरा,   खोटा हित-शत्रु तूं, न भाउ खरा

---

१ श्रीसूर्याच्या कृपेनें. २ कामधेनूची कन्या. ३ श्रीसूर्य. ४ अन्न शिजविण्याचें पात्र. ५ब्रह्मज्ञान. ६ जागृति, स्वप्न, सुषुप्ति ह्या अवस्थांची पंक्ति. ७ अन्न पुरविणारी देवी दुर्गा. ८ हा स्थाली याचा अपभ्रंश आहे. ९ प्रसवे. १० भक्ष्य, भोज्य, लेह्य, चोष्य अशीं चार प्रकारचीं. ११पार्षत राजाची कन्या द्रौपदी. १२ रिकाम्या गोष्टी. १३ सुंदर कवितेंत. १४ करणारा. १५ ममता-पूर्वक रक्षण करूं. १६ उत्तम गति ज्यांपासून ते. १७ पांगळा.

न सु-संगति-गुण लागे दुष्टा, कीं वृष्टि-गुण नभा उ[1]खरा,॥
औरस[2] पुत्र प्रौढ ज्येष्ठ त्यागार्ह काय हा निख[3]ळ ॥
कळलें स्पष्ट मला कीं करितो चित्तीं शिरोनि हानि खळ
आकारेंचि परेंगित[4] कळतें, बोलें न काय हो कळतें? ॥
असती[5] सुसांत्विता[6]ही साजती; जें तत्प्रियोक्त[7], पोकळ तें॥
जिकडे असे मन तुझें, आश्रय तुज युक्त तोचि, जा तिकडे
हंसीं हंस, बकीं बक, मिसळे; जन ओढतो स्व-जातिकडे”
दश-कंधरें[8] विभीषण- सा तो अपमानिला कवि क्षत्ता ॥
तत्ताप किति वदावा बसल्या तद्धृदयीं दुरुक्ति त्या लत्ता१४
रामाकडे विभीषण, गेला धर्माकडे तसाच कवी ॥
शास्त्राऽभ्यास खरा गुरु समयीं रक्षी, न मानसा चकवी॥
दूरुनि विदुर विलोकुनि धर्म ह्मणे “दृष्टि निववली वडिलें[10]
कुरु-कुळ[11]-कल्याणचि हें वरि विधिनें लोक-रीतिनें मढिलें[12]
जे न्यायामृत टाकुनि दाटुनि अन्याय-मद्य कु-नर पिते[13] ॥
जाणो करणार हरण शस्त्रांचें द्यूत करुनि पुनरपि ते”
धर्म ह्मणे त्यासि “ पित्या टाकुनि आलां किमर्थ अंधातें
जें स्वीकृतयष्टित्व[14] त्यजिलें त्वां केंवि सत्य-संधा[15] तें॥१८॥

१ डोंगराळ जमिनीला. २ स्वस्त्रीपासून स्ववीर्यानें उत्पन्न झालेला. ३ केवळ. ४ दुसऱ्याचा अभिप्राय. ५ जारिणी. ६ प्रीतिपूर्वक समाधान केलेली. ७ तिचें प्रियभाषण. ८ रावणानें. ९ मुळवी. १० वडिलानें. ११ विदुररूपी कुरुकुलाचें कल्याण. १२ मढविलें. १३ पिणारे. १४ काठीपणा. १५ सत्य-संधा ह्मο सत्य प्रतिज्ञा ज्याची तो.

विदुर ह्मणे "वा न रुचे जेंवि कुमारीस पळहि पति पिकला[1]
तेंवि नृपतिमतिला हा क्षत्ता न रुचे, सुनीति जरि शिकला
घालविलें मज रायें मानुनियां मद्वादितें[2] हितें अहितें ॥
ह्मणुनि तुजकडे आलों, कोण उपासील[3] कोपल्या अहितें[4]
प्रेमें काक-कुळासचि, संतर्पायासि आम्र पिकला जो ॥
त्याच्या गळां पडाया साहुनि अपमान कां न पिक लाजो"
धर्म विदुराशि विनवी घर्मद्वांता[5] शिखीस[6] घन जेवीं ॥
प्रार्थुनि ह्मणे "पित्या हो स्वस्थ, स्थिर करुनियां स्व-मन जेवीं[7]
राहुनि समीप शिकवी धर्माला त्या महर्षि-सुत[8] रीती ॥
विपदर्णवांत[9] होउनि नौका ज्या स्वाश्रितांसि उतरीती २३
धृतराष्ट्र ह्मणे "चुकलों विदुर न तो दवडिला कुशळ-विसर
करितो तळमळ गत-धन-जनसा न पडेचि एक-पळ विसर
भलतें वदलों भ्रात्या वदतो जैसें अबंधु अभ्रात्या ॥
पाहुनि होतील सुखी पांडव-चातक! मयूर अभ्रां[11] त्या ॥२५॥
पर-वृद्धि नसावी हा भाव प्रकटुनि न बोधें[12] मळवीला?" ॥
रडला पडला मूर्च्छित तळमळला विदुर-विरह कळवीला २६
नृप संजयासि धाडी भ्रात्या विदुरासि शीघ्र आणाया ॥
शिकवी पुनःपुन्हा कीं "वा ह्मण घालूनि त्यासि आणा[13] 'या'
सर्वस्व परित्यागुनि ज्याचें स्मरतात पाद-कंज[14] यमी[15] ॥

१ वृद्ध. २ माझीं भाषणें. ३ सेवील. ४ सर्पाला. ५ ग्रीष्मांतील वणव्यानें पीडिलेला. ६ मोराला. ७ भोजन कर. ८ व्यासपुत्र विदुर. ९ संकटसमुद्रांत. १० समूह. ११ मेघाला. १२ ज्ञान. १३ शपथा. १४ कमल. १५ जितेंद्रिय.

त्या हरिच्या आप्ता तो नमुनि ह्मणे"दास सूत संजय मी२८
आलों राजाज्ञेनें गुरुदास्यमहर्धि भविदुरापा हें ॥
जाणाशि,कवे पहा निज- गुरुलाचि, मुहूर्त न विदुरा पाहें॥
बहु ह्मणतो नृप अनुदिन गत-धन कृपणा जना परिस हाय
व्हावें मुझें बुडतां भलत्याहि निवारिलें परि सहाय"॥ ३०॥
भीम ह्मणे "बापाजी, जा समयीं,येधवांचे कां धाई ॥
तूं येथ नसावें, या भावें करितो बरीच कांघाई" ॥३१॥
धर्म ह्मणे " ताता तो तुजविण वर्तेल वृद्ध अंध कसा ॥
सत्संगे-शिवाविण त्या दुःसह भव, वासवांस अंधकसा" ३२
भेटे विदुर गजपुरीं असदाचरणोनितप्रभा वढिला ॥
ज्याचा झाला साधु- द्वेषें स्वाभाविक प्रभाव ढिला॥३३॥
जरि अप्रसन्न चित्तीं तरि दावी प्रेम बैसवी अंकीं ॥
अंध ह्मणे "हर्ष जसा मज, न तसा राज्य पावल्या रंकीं ३४
जें कांहीं मी वदलों वत्सा, तुझिया मनीं न राहो तें ॥
पुण्य यश प्राप्त सहन- शीलत्वें सज्जनीं नरा होतें"॥३५॥

---

१ गुरुसेवा हीच समृद्धि. २ संसारीजन. ३ दुर्लभ. ४आपल्या वडील बंधूला. ५ लांब असलेल्यास. ६दररोज. ७ निषेध केला. ८ मरणसमयीं. ही भीमाची क्रोधोक्ति आहे. ९ उद्देशानें. १०थोडें दुःख असून रडून ओरडून अधिक दाखविण्याचा प्रकार. ११सत्संगरूपी शंकरावांचून. १२ संसार. १३ इंद्रास. १४ अंधकासुरा सारखा. १५ असत्-आचरण-ऊनित-प्रभा ह्म० दुष्ट आरणानें कमी झाली मुखकान्ति ज्याची, त्यास. १६ समीपभागीं. १६दरिन्द्याचे ठायीं.

विदुर ह्मणे "दादाजी, परम-गुरु प्रभुहि तूं क्षमाकर गा॥
आह्मां पदाश्रितांची वृत्ति स्थिति कीर्तिही भवत्करगा ॥
हे, ते, मज सम, परि मन पाहुनि दीनां मुलांस कळकळतें
गुरु-जन-शील असेंचि प्रायः; प्रभुजी, तुला सकळ कळतें"
समजावुनि पांडवहित, विदुर पुरा आणितां पुन्हा तातें
दुर्योधन करि चिंता कल्पुनि चित्तीं निजाऽर्थघाततें ३८
स्वहित-कर-शकुनि-कर्ण- प्रमुखांशि ह्मणे "गृहांत अहितातें
हा आणिला दुखविला, सर्वांच्याही करील अहितातें ३९
मोहुनि वृद्ध-मतीतें दायादांतें फिरोनि आणवितो
हा सांहातां आह्मां बाळ-तरूंला समूळ खाणवितो॥४०॥
न पहावे न सहावे तें, मरतों, आजि भक्षितों विष मी ॥
एवंविधं-मरणीं सुख. न मला काळीं तशा महा-विषमीं"
शकुनि ह्मणे "प्राणांहुनि रक्षिति सत्यव्रताप्रति ज्ञाते ॥
शंका धरिशि वृथा कां त्यजितील कशी कृता प्रतिज्ञा ते
जरि आलेचि तरि पुन्हा योजूनि अपाय लक्षशा उडवूं॥
रंध्रान्वेषी आह्मी बहु त्यांतें व्यसन-सागरीं बुडवूं"॥४३॥
सांत्वन करि दुःशासन, कर्णहि, परि आग्रही न तो समजे
टाकूं पाहे पंच- प्राण प्रिय-बंधु तेहि त्यांसम जे ॥ ४४ ॥
कर्ण ह्मणे "हें नरुचे तरि अरि-करि-हरि असों अगा राया

१ क्षमेची खाण. २ तुझ्या हस्तगत. ३ नाशाला. ४ अशा प्रकारच्या ( विष खाऊन ) मरण्यांत. ५ महासंकट ज्यांत, अशा काळांत. ६ सदाचरणानें वागण्याच्या नियमाला. ७ छिद्र शोधून काढणारे. ८ शत्रुरूप गजांचे सिंह.

जें चित्तीं तेंचि करूं न उपेक्षा मूर्तिं[1]च्या अंगारा[2] यां[3] ४५॥
पडले व्यसनीं केवळ ते तेजोहीन दीन दायाद ॥
ग्रीष्माल्पसरीं[4] सोडुनि गेलें जैसें नदी-नदा यादं[5] ॥ ४६ ॥
बळें[6]पति गुहसा[7] मी, त्या अधिक बहुभुर्जा[8]स्य गात्र, आया[9] सां[10]
चाल, करूं शत्रु-क्षय, पळाहि न होशील पात्र आयासा" ॥
ऐसें अनुमोदन दे दुष्टाला जेंवि मद्य वेडसरा ॥
धांवे साधु-वरि श्वा[11] खवळविला जेंवि पाळकें डसरां[12] ॥४८॥
सबळ[13] सुयोधन पांडव- हननार्थ निघे, अशांत अयनांत[14] ॥
व्यास प्रकटे, ज्याच्या नांदे करुणा मनांत नयनांत ॥ ४९॥
वारुनि त्यास मुनि ह्मणे "धृतराष्ट्रा तनुज हा तुझा खळ गा
विनिपात[15]-हेतु मार्गा- मांजि रज[16]:पिहित-मुख जसा खळगा॥
हा हरुनि पांडवांचीं सर्वस्वें जीवितेंहि उर्वरितें[17] ॥
हरणार, कसें ह्मणशी तूं हितकर या अशाहि उर्वरितें[18]॥५१॥
देईल शोक बुडवुनि कुळ आपणही बुडोनि तुज राया ॥
सांग हित सुज्ञ गुरु तूं आहेशि समर्थ याशि उजरायें[19]॥५२

१ ऐश्वर्याच्या. २ गृहाला. ३ या दुर्योधनाला. ४ ग्रीष्मऋतूंतील लहान सरोवरांत. ५ जलजंतु. ६ शक्तिमान्. ७ कार्तिकस्वामी सारखा. ८ पुष्कळ, अर्थात् बारा भुजा व सहा मुखें ज्याला असें गात्र ह्म० शरीर. ९ माता. १० सहा. भुज, मुखें व आया एवढें कार्तिकस्वामीला अधिक आहे. ११ कुत्रा. १२ चावरा. १३ सैन्यसहित. १४ मार्गांत. १५ पाडण्यास कारण. १६ धूळीनें आच्छादित मुख ज्याचें. १७ उरलेलीं. १८ उरुअरितें ह्म० महाशत्रूला. १९ सरळ करण्यास.

श्रमदाहि अन्य-रोगा मानिति बहु, विटति साधु सुत-रोगा
किंवा हा धर्माचें दास्य करुनि दुर्गुणाऽब्धि उतरो गा॥५३
अथवा कशास हें ही सुगंध कर्पूरहि न करी लसुणा ॥
सिंह-गुण-स्वीकृतिला तत्संगें काय गा करील सुणा॥५४॥
स्व-पर-यशो-वृद्धि रुचे सुजनांस;स्व-पर-कीर्ति-हानि खळा॥
बैसविला भू-भूषण- पद-पदकीं काय काच,हा निखळा॥५५
मज वाटे हा कुरुचा वंश सुखें या जनांत नांदावा ॥
काय करूं खळ करितो साधूंशीं स्व-क्षयार्थ कां दावा"५६
धृतराष्ट्र ह्मणे " ताता, जें हें द्यूतादि, दैव-कृत सारें ॥
भावि कसें टाळावें लोकें प्रारब्ध-कर्म-हत-सारें ॥ ५७ ॥
दुष्ट-सुतोत्थाऽपयशें कर्पूर-विशुद्ध आत्म-कुळ मळतें ॥
कळतें तदपि स्नेहें मन टाकायास यास कळकळतें" ॥ ५८ ॥
व्यास ह्मणे " सत्य वदसि वत्सा, आत्माचि पुत्र वेद-मतें
ऐसेंचि चित्त माझें पुत्र-स्नेहें करूनियां श्रमतें ॥ ५९ ॥
एक कृषीवळ-पीडित दुर्बळ वृष पाहतांचि महिवर ती ॥
ख्याता सुरभी देवी स्नेहें झाली उदंड गहिवरती ॥ ६० ॥
तूं, पाण्डु, विदुर, मज सम; परि माझा पांडवांकडे ओढा

---

१ पुत्ररूप रोगाला. २ दुर्गुणांचा समुद्र. ३ लसणेला. ४ सिंहाच्या संगतीनें. ५ कुत्रा. ६ भूमीचा अलंकार जें पद ह्म० सिंहासन. हेंच पदक, त्यावर. ७ काढून टाका. ८ पूर्वजन्मीं केलेल्या कर्मानें हरण केलें सामर्थ्य ज्याचें, त्यानें. ९. दुष्ट पुत्रापासून उत्पन्न झालेल्या अपयशानें. १० शेतकरी. ११ कामधेनु.

निम्नांकडेचि धांवे नाटोपे जेंवि आद्रिचा ओढा ॥ ६१॥
कीं नाहीं जनक कनक; वन कदनै-करांशि सेवणें पडलें
वाटे बहु अवघड,जें न घडावें ज्यांस,त्यांस तें घडलें ६२॥
पुष्कळ मुख भोगावें ऐसें चित्तीं असेल तरि त्यातें ॥
हित सांग कळेल तसें साधुद्वेषें स्व-घात-करित्यातें"॥६३॥
राजा ह्मणे "करावें आजि तुह्मीं सुमति-धाम नातुंड ॥
शिकवा स्वहित, पुरवितें तुमचें कीं विश्व-कामना तुंड" ॥
व्यास ह्मणे "पाजी घन वन,खग असतो करोनि आ जो बा
बापाशि बाप न ह्मणे ऐशाला काय होय आजोबा॥६५॥
पांडव पाहुनि आतां मैत्रेय महर्षि येथ येईल ॥
बोधील ऐकल्यावर, नाहीं तरि उग्र-शाप देईल" ॥६६॥
ऐसें वदोनि सोडुनि दुर्मति-संसर्ग मुनि पळाला हो ॥
कीं ताप आपणाला दुःसह शापहि न त्या खळला हो६७
आला मैत्रेय-मुनि प्रार्थुनि शिकवावया हित ज्ञानी ॥
खळबोध-श्रम निष्फळ ऐसें कथिलें जरीहि तज्ज्ञांनीं॥६८॥
पूजुनि धृतराष्ट्र ह्मणे "माझा तापें न काय पळवा हो ॥
पळवा हो अघ,मजवरि तुमचा करुणाब्धि एक पळ वाहो॥
हे ते बंधु प्रेमें नांदोनि जगीं सुकीर्ति करितिल कीं ॥

१ उतरत्या प्रदेशा कडे. २ ओहोळ. ३ युद्ध करणारांस. अर्थात् शूरांस. ४ सुबुद्धीचें घर. ५ तुमचा नातु दुर्योधन. ६ जगाचें इच्छित. ७ मुख. ८ उदक. ९ चातक पक्षी. १० दुष्टास केलेल्या उपदेशाचें फल जाणणाऱ्यांनीं. ११ वाळलेला पाला.

व्यसनार्ती या दासीं करिल कृपा देव, जेंवि करि-तिलकीं[1]"
मैत्रेय ह्मणे "राया, आहे हातीं तुझ्याचि बापा हें ॥
त्यांच्या यांच्या ठायीं समतेस पुढें तरीहि वा, पाहें॥ ७२ ॥
तूं ज्या सभेंत, तेथें ती कुळजा तेंवि काय गांजावी ॥
कुरु-कुळ-कीर्ति श्रीमद्- भीष्महि असतां लयासि कां जावी
कां दंडिले न ते त्वां . स्व-सभेंतचि घालिते दरवडा जे ॥
हा हा तो साधु-मनीं अद्यापि असाधु-वाद-रव[2] डांजे[3]॥७३॥
झाली तस्कर-वसती, जी होती कुरुसभा जनक-शाला[4] ॥
अद्यापि इचें करिती भीष्म विदुर कवि सभाजन[5] कशाला?
आतां सर्व असो तें, वत्सा, दुर्योधना पहा हित रे ॥
सदतिक्रमकर[6] न तसा जेंवि गरुड-लंघनें महाहि[7] तरे ॥ ७५॥
संसार दों दिसांचा यश जोडी जो कुलीन तोचि वरे ॥
घ्यावें बरें ह्मणोनि स्व-पर-मुखें तें कुलीनवोचित[8] रे ॥ ७६॥
भ्राते साधु यशस्वी शस्त्राऽस्त्रज्ञ प्रसिद्ध वासवसे ॥
पद्माचि ते ज्यांत सदा श्री[9] गुण-गण-रस[10] यशःसुवास[11] वसे७७
भासति तसेचि सत्वें जैसे होते स-विप्र भवनांत[12] ॥

---

१ गजेंद्रावर. २ दुष्टभाषणाचा ध्वनि. ३ सलतो. ४ जनक-ब्रह्मदेव. त्याची शाला-शास्त्रादिकांची चर्चा करण्याची जागा. किंवा जनकनामक राजर्षीची ब्रह्मविचार करण्याची जागा. ५ पूजन-सेवन. ६ सज्जनांची अमर्यादा करणारा. ७ मोठा सर्प. ८ कुलीनतेला योग्य. ९ शोभा, पक्षी, लक्ष्मी. १० गुणसमुदाय हाच रस. ११ यश हाच सुवास. १२ घरांत.

अद्यापि वल्कलाऽजिन- वसनहि दिसती न विप्रभ वनांत॥
भीमें हिडिंब बक खळ वधिले मागें; जसे करी हरिनें ॥
किर्मीर· नाम राक्षस सांप्रत; ध्यावें मनीं जया हरिनें॥ ७९॥
ऐशां प्रबळांशीं तूं सख्यें जरि वर्तशील,तरशील ॥
सुख भोगिशील पुष्कळ नाहीं तरि हा वृथाचि मरशील"॥
ऐसें सत्य हित वदे परि न तयाला धरूनि तोखवळे ॥
शापाशि यत्न मांडी, मांडी ताडी, कुदैव तो खवळे ॥८१॥
ज्याच्या सुहित करावें अहित-कराऽनय-विषा दमुनि पानें
उपदेशाऽमृत थुकितां कां न धरावा विषाद मुनि-पानें ८२
मैत्रेय ह्मणे " पापा तापापह सदुपदेश परिसविता ॥
थुंका दृष्टीस नको सर्वजगत्तोषहेतु परि सविता ॥ ८३ ॥
दुर्योधना तुज जरि न शिक्षावें तरि ह्मणेल मत्तप हा ॥
खळ मल्लंघन करितो तूंहि-न हो क्षांति-भाग्य-मत्त पहा ॥८४
यास्तव घे शाप,तुझ्या भीम-गदा करिल चूर्ण मांड्यांतें ॥
खाइल काळा; बाळा जशि वाढी माय तूर्ण मांड्यांतें॥८५
पाय धरुनि अंध ह्मणे" फिरवा जी शाप" मुनि ह्मणे न रडें

१ वल्कलें व हरिणचर्में हींच वस्त्रें ज्यांचीं ते. २ तेजोहीन. ३ ज्या भीमाला. ४ इंद्रानें. विष्णूनें. ५ आनंद. ६ भूदेव-विप्र. ७ अहित करणारा जो अनय ह्म० अनीति हेंच विष, त्यास. ८ शमवून. ९ ऋषिश्रेष्ठानें. १० थुंकडाला. ११ सर्व जगाला संतोष दे णाम कारण. १२ सूर्य. १३ माझें तप. १४ सहनशीलतारूप ऐश्वर्यानें माजलेला. १५ मांडा हें एक पक्वान्न आहे. त्याला.

"वाक्[1] करिन" ह्मणो; स्वौषधि[2]- वदनाचें व्याघ्र न चघळी नरहें
धर्म-न्यायें वर्ता, तिळहि न करिजेल हानि शापानें ॥
तापद नव्हेचि, केला स्व-सुहृद् मैत्रेय हा निशापानें[3]" ॥८७॥
मुनि गेल्यावरि राजा विदुरासि ह्मणे "मया अद्भ्रा[4] त्या ॥
वत्स वृकोदर कैसा परिहरिता जाहला? वद भ्रात्या" ॥८८
विदुर ह्मणे "कथिलें जें धर्में किर्मीर- हनन-वृत्त मला ॥
तें फार काय सांगों त्या कर्मे[5] भीम भीमसा गमला ॥ ८९॥
निर्मी किर्मीर महा- माया, तो काळसा करी लमर्ट ॥
वन-देवतांसि वाटे सर्व प्राण्यांसि हा करील गट ॥ ९० ॥
तन्नाद कांपवी बहु कृष्णेतें जेंवि वायु कदलीतें ॥
पांचांही वीरां तीं, तेव्हां जें हाय हाय वदली तें ॥ ९१ ॥
कोण तुह्मी, सांगा रे वदत असें दुष्ट ये जवळ खाया ॥
धर्मोक्त[7] वृत्त कारण होय बकारातितेज[8] वळखाया ॥ ९२॥
दुष्ट ह्मणे "होउनि पर -लोकीं त्वद्भक्ततृप्त बक राहो ॥
भीमा स्वभ्रात्यांसह किर्मीर-व्याघ्र-भक्ष्य[9] बकरा हो" ॥९३॥
वारुनि धनंजयातें घालुनि दृढ कांस धरुनि नग[10] हातें ॥
भीम भिडे रक्षाशीं[11] प्रथम ह्मणे "हूं" रणांत मग, हा, तें[12] ९४

१ वचन. २ सु ह्म० उत्तम ( व्याघ्रास मारक ) अशी वनस्पति मुखीं ज्याच्या, त्याचें. ३ चंद्रानें. ४ बहु. ५ शंकरा सारखा. ६ निकट संबंध. ७ 'तुह्मी कोण' असें किर्मीरानें विचारिल्यावर धर्मानें जें आपलें वृत्त सांगितलें तें. ८ भीमाचें तेज. ९ किर्मीररूप व्याघ्राचें भक्ष्य. १० वृक्ष. ११ राक्षसाशीं. १२ तें रक्ष ह्म० तो राक्षस. रक्षशब्द संस्कृतांत नपुंसक आहे.

वधिलें भीमें जेव्हां इंद्रसिहि तें रक्ष नावरायाचें ॥
सुर वदले याचिपरी स्व-रिपु वधुनि रक्ष नांव राखीचें ९९
भीमाच्या विजयातें विदुर सविस्तर नृपासि आयकवी ॥
तें ग्रंथ-विस्तराला भ्याला जो तो वदेल काय कवी॥१८॥

# अध्याय २ रा.



## सारांश.

कौरवांनीं द्यूतांत पाण्डवांचें सर्वस्व हरण केलें. व त्यास वनवासास पाठविलें. ही वार्ता यादव व पांचाळ यांस कळली. तेव्हां ते पांडवांचें व द्रौपदीचें समाधान करण्यास आले. श्रीकृष्ण ह्मणाला "शत्रु आपल्या कर्मानें नाश पावतील. तुह्मी स्वस्थ असा. धृष्टद्युम्न ह्मणाला. कौरवांनीं कपटानें तुह्मांस दुःख दिलें. भीष्मद्रोणांनीं देखील त्यांचें निवारण केलें नाहीं. या करितां शिखंडी भीष्मास मारील. मी द्रोणास मारीन. भीम दुर्योधनास मारील. व अर्जुन कर्णास मारील. असें बोलून त्यानें द्रौपदीचें समाधान केलें.

नंतर कृष्ण ह्मणाला " शिशुपालाचा मित्र शाल्व हा यादवांचा मोठा शत्रु. यास मारण्यास मी गुंतलों होतों. ह्मणून हें दुःख तुह्मांस भोगावें लागत आहे. मी त्यावेळीं असतों तर द्यूत खेळूं दिलें नसतें. किंवा कौरवांचा निःपात केला असता. झाल्या गोष्टीस उपाय नाहीं. तुमची कष्टदशा लौकर नष्ट होईल. "

१. इंद्रासही. २ राक्षस.

असें बोलून त्यांचा निरोप घेऊन अभिमन्यु व सुभद्रा यांसह कृष्ण द्वारकेस निघून गेला. धृष्टद्युम्न प्रतिविंध्यादिकांस घे-ऊन पांचाळपुरास गेला. नकुलसहदेवांच्या स्त्रिया माहेरीं गे-ल्या. तसेंच दाया व इंद्रसेन हीं द्वारकेस गेलीं.

मग पांडव द्वैतवनांत गेले. तेथें मार्कंडेयऋषीनें रामानें वन-वास कसा अनुभविला तें सांगितलें. द्रौपदीनें व भीमानें वनवास-दुःख सहन न झाल्या मुळें धर्मास दोष दिला व कौरवांचा नाश करण्यास उत्तेजन दिलें. पण धर्मानें एकच उत्तर दिलें कीं, मी आपली प्रतिज्ञा मोडणार नाहीं. व क्षमा सोडणार नाहीं. व्यासानें धर्मास काम्यकवनांत प्रतिश्रुतिनामक विद्या शिकवि-ली; ती धर्मानें अर्जुनास शिकविली. मग अर्जुन इंद्रकील पर्वतावर तप करण्यास गेला. तेथें त्यास इंद्र भेटला. इंद्रानें त्यास अस्त्रप्राप्ती करितां शंकराची आराधना करण्यास सांगितलें. व मग आपण अंतर्धान पावला.

दुष्टांनीं नागविला कपट द्यूतांत धर्म हे वार्ता ॥
जातां झाल्या यादव- पांचाळ-मती महाधिनें आर्ता ॥
यादव पांचाळ वनीं आले भेटावयासि धर्मातें ॥
निंदिति धृतराष्ट्राच्या तत्तनयाच्याहि दुष्ट- कर्मातें ॥ २॥
पाहोनि पांडवांचीं रूपें तो विश्व-भावन वनीं तीं ॥

---

१ विश्वाच्या उत्पत्तीचें आदिकारण श्रीकृष्ण.

पावे सा भावातें जो तापें होय भाव नवनीतीं ॥ ३ ॥
कृष्ण ह्मणे "बा साधो स्व-कृत[1]-कुकृत आठवूनि रडतील
छळ करिते छळक रिते धनें यशें जीवनेंहि पडतील ॥४॥
दुर्योधन-दुःशासन- कर्ण-शकुनि-रक्त भूमि सेवील ॥
गृध्र-शिवा-संघ सुखें तन्मांसातें यथेष्ट जेवील ॥ ५ ॥
धर्मन्यायीं त्वत्सम पूर्वाऽभ्यासीं[2] रतें, नवा[3] न रते ॥
खळ आकारें[4] दिसती, परि नर न, विवेक-हीन वानर ते ॥
कां गेला विदुर पुन्हा ह्मणतो त्या आंधळ्यासि कां जी जी
ती प्यावी अमृतांधें[5] काय सजिली वमूनि कांजी जी ॥७॥
खळ हो बळें तुह्मीच व्यसनीं बुडवावया असुं[6] सका रे ॥
मोडाल आठवूनि स्वकृत दुरित दीर्घ उष्ण सुसकारे ८॥
सत्तापद[7] हो खदिरांऽ गारांनीं न्हाल, व्हाल पापडसे ॥
साप डसे एकासचि सद्वेष्ट्याच्या कुळाशि पाप डसे"॥९॥
जिष्णु ह्मणे "कृष्णा तूं भगवान् विश्वेश विष्णु मज कळलें
तत्व व्यासें कथिलें कीं हें मद्भाग्य सत्फळीं फळलें १०॥
सत्य तुझा संकल्प प्रभुजी जें कार्य तेंचि करिशील ॥
स्व-पदाश्रित[9]-जनताप त्रय- तम तूं तरणि तूर्ण हरिशील"॥
कृष्ण ह्मणे " त्वत्प्रिय ते मत्प्रिय, भवदहित[10] तेचि मदहित[11] रे

१ आपण केलेलें दुष्टकृत्य. २ पूर्वी केला अभ्यास ज्यांचा ते ( धर्मन्याय, ) ३ अथवा. ४ नरसे दिसती. ५ अमृत आहे अंध ह्म० भोजन ज्याचें तो देव, त्यानें. ६ समर्थ होतां. ७ सज्जनांस ताप देणारे. ८ खैराच्या निखाऱ्यांनीं. ९ आपल्या चरणाचे दास-जनांचें तापत्रय हेंच तम ह्म० अंधकार. १० तुझे शत्रु. ११ माझे शत्रु.

तुज मज जो न अनुसरे तो न भवाब्धींत एक पदहि तरे"॥
श्रीकृष्णा श्रीकृष्णा दाउनि खळ-पाणि-कृष्ट-केश वदे ॥
उक्ति कडे मन दे परि नयन तदास्याकडे न केशव दे १३॥
"हे केश धरुनि वोढुनि नेलें दुःशासनें सभेंत सख्या ॥
तेंव्हां मज आठवली त्वत्पदयुगली सखी, न अन्य सख्य॥
ईणेंचि राखिली वा लज्जा, उघडी पडों दिली न सती ॥
यदु-कुरु-कीर्ति न उरती जरि मज हे ठाउकी किली नसती
होते समीप पांचहि पति, अति-मति हे मनें उदासीनें ॥
ग्यां व्यसन साहिलें तें न असेल विलोकिलें कु-दासीनें १६
सोडी पुनःपुन्हा खळ न धरुनि लज्जा भया दया लुगड्या॥
उघडें पडतें वपु तरि तूं अंतरतासि वा दयालु-गड्या १७॥
जे पाप गरद अग्निद सर्वस्व-हर स्वदार-वस्त्र-हर ॥
तदुपेक्षा करिति कशी हे साक्षात् एकमुख स-शस्त्र हर १८
गुरुतात बंधु पतिसुत कोणीच मला नसे; जिला असती, ॥
तीस घडेल असें कां? हंसतील सती-जन-व्रता असती १९ ॥
स्त्री-लंघन करित्यातें प्राकृतहि न साहती, पहा, लावा ॥
हा! लावावा कर मज? वातें हि न पदर ही न हालावा २०

१ द्रौपदी. २ दुष्ट दुःशासनानें हातानें ओढिलेले केश. ३ तिच्या मुखाकडे. ४ तुझें पदद्वय. ५ मैत्रिणी. ६ युक्ति. ७ विशाल बुद्धीचे. ८ नीच बटकीनें. ९ पातकी-दुष्ट. १० विष देणारे. ११ लाक्षागृहांत जाळण्यास इच्छिणारे. १२ शंकर. १३ पतिव्रतेच्या आचरणाला. १४ जारिणी. १५ क्षुल्लक मनुष्य ही. १६ तुलना करून पहा.

यांचीं शस्त्रें अस्त्रें दोर्दंड-बळें खळें वृथा केलीं ॥
धिक्कष्टं सर्व-यशें सुज्ञानें एकदा लया गेलीं" २१ ॥
ऐसें वदोनि रडतां कृष्ण ह्मणे "अंब तूं नकोचि रडों ॥
कळवळतें मन्मन सखि, या शोकाऽचळ-भरें नको चिरडों २२
सखि अखिल-सती-पूज्ये मद्धैर्य तवाऽश्रुबिंदु-सह गळतें ॥
केवळ तुझेंचि न वदन अमृत-द्युति-गौर मद्यशहि मळतें २३
तुज गांजिलें जिहीं त्यां ज्यांत यशो-नाश अंग-नाश तशा
वरितील दशा, त्यांच्या शोकें रडतील अंगना शतशा २४
असली असीच धर्मी चित्तीं माझा धरूनि बोल टिकें ॥
झालें कधींच न मृषा होईल मदुक्त काय हो लटिकें २५॥
होइल मद्वच न मृषा केव्हांतरि, वारि-राशि आटेल, ॥
ग्रह-गण गळेल, हिमगिरि- राज खचेल, क्षिती हि फाटेल"
ऐसें ऐकुनि साध्वी मध्यम-पतिच्या मुखाकडे पाहे ॥
"जिष्णु ह्मणे या प्रभुच्या वचनीं विश्वास आमुचा आहे"
धृष्टद्युम्न ह्मणे "कुरु- गुरु-भीष्म-प्रभु जसा, तसा द्रोण ॥
खळ-काळ कां न झाले ? पाहेल कुकर्म सभ्य तें कोण ॥
वारावे मारावे खळ, तें केलें न कर्म दोघांनीं ॥
नय सोडुनि अघ जोडुनि वद वांचावें कशास मोघांनीं ॥

१ बाहुबळें. २ धिक्कार असो! हाय हाय. ३ हे माते.
राजपत्नी गुरोः पत्नी मित्रपत्नी तथा सती ॥
पत्नीमाता स्वमाताच सर्वास्ता मातरःस्मृताः ॥
४ चन्द्राप्रमाणें स्वच्छ. ५ ज्या दशांमध्यें. ६ समुद्र. ७ अर्जुनाच्या. ८ निष्फळ जीवित ज्यांचें, त्यांनीं.

द्रोणाशि मी, शिखंडी भीष्माशि वधील, काय हें खोटें?
मोठें यश यांत भगिनि, कां तूं कर्णांत घालिशी बोटें ? ॥
मारावा दुर्योधन भीमें, पार्थेंहि कर्ण, हा नियम ॥
न चुकेल, जसा न चुके निमिषाहि करितां प्रजासु-हानि[1] यम"
कृष्ण ह्मणे " शिशुपाळ-प्रियसख[2] यदु-शत्रु शाल्व माराया॥
जरि गुंतलों न असतों न श्रम हा पावतासि गा राया ॥
समयीं धांवत येतों; द्यूतातें कथुनि दोष राहवितों ॥
जरि न वळते विशृंखळ-[3] खळ खळखळ रक्तपूर वाहवितों॥
पाहोनि राजसूय- क्रतु जातां शाल्व- संकटीं शिरलों ॥
तें शमलें तों द्यूत- व्यसन परिसतां तसाचि मी फिरलों॥
आतां काय उपाय व्यसन न तुमच्याहि हें गळां पडलें, ॥
आह्मां सुहृदांच्याही, बा मत्पुर सर्व खळखळां रडलें ॥ ३५
सरतील क्षण लवसे लघुं,[4] केले अवधि अब्द[5] तेरा जे ॥
त्वत्सम साधु न लागों देती स्वयशासि शब्द ते राजे"॥
सांत्वन करूनि जातां प्रभु भिजवी स्वाश्रुनीं स्व सेला[6] हो
ने स्वरथीं वाहुनि कीं ताप न अभिमन्युला स्वसेला[7] हो ॥
धृष्टद्युम्नें नेले प्रतिविंध्य- प्रमुख सकल जे भाचे ॥
अति-तुच्छ त्यांपुढें दिग्- द्विरदांच्या[8] गतिविलास कलभांचे[9]॥

---

१ प्रजांचा नाश. २ शिशुपाळाचा प्रियमित्र शाल्वराजा. ३ ज्यांस कांहीं प्रतिबन्ध नाहीं ते. ४ लौकर. ५ वर्षें. ६ शेला. ७ भगिनी-सुभद्रेला. ८ अष्टदिशांच्या हत्तींच्या. ९ छाव्यांचे.

नकुलसहदेवभार्या माहेराला स्वबंधुनीं नेल्या ॥
तो इंद्रसेन सेवक धात्री दासीहि हरिकडे गेल्या ॥ ३९ ॥
द्वैतवनाप्रति धौम्य- द्रुपदसुता-युक्त पांडवहि गेले ॥
तेथें मार्कंडेयें दर्शन देऊनि धन्य ते केले ॥ ४० ॥
तो मुनि ह्मणे "विलोकुनि तुज, झालें स्मरण राम-रायाचें
आनंद-भरित चरित त्वरित करितसे सुपामरा ज्याचें ॥
द्वैतवनीं द्रुपदसुता पतिव्रता होऊनि तप्त-तनु गांजी ॥
वदली लेशहि न कधीं श्रुति-कटु अपराधियांहि अनुगां जी
"द्यूत महा-व्यसन असें नायकिलें काय नर-धरा कानीं ॥
सर्वस्व हरुनि सहसा केलासि अरण्य-चर वराकानीं ४३॥
श्रोतृ-श्रुति-हर कीं तूं वदता सुविचार-खनि कथा पिकसा
व्यसनांत बुडालास भ्रात्यांसह सुज्ञ जरि तथापि कसा ॥
ग्रामादीं नगरीं जे वसले ते तरुतळीं द्रवस्थानीं ॥
झाले विच्छवि रवि-कवि- पवि-धरसे बंधु असदवस्थानीं
यांसि पहातां कैसें व्याकुळ मानस नव्हे तुझें राया ॥
तुज काय दया यांची प्राणांसहि सिद्ध तूं अव्हेराया ४६
व्यसन-प्रसंग तुजही तेजस्वि-वरासि अंक हा रविला ॥
झालासि दीन, वाटे द्यूतीं तोहि प्रताप हारविला॥४७॥
या दुष्टाप्रति आलें सोडुनि मेल्या दशानना शील ॥

१ अति नीचाला. २ सन्तापयुक्त झालें शरीर जिचें ती. ३ कानांस कठोर लागणारें. ४ सेवकांना. ५ नीचांनी. ६ श्रोत्यांच्या कानांस गोड लागणारें. ७ खाण. ८ कोकिला सारखा. ९ वनप्रदेशांत. १० तेजोहीन. ११ वाईट ठिकाणीं. १२ कलंक.

ती कोणा धीराच्या धृतिला माझी दशा न नाशील ॥
ती स्पर्शली नसेलचि कोणाहि सभेंत दुर्दशा स्त्रीतें ॥
योग्य पहाया काय द्रोण, नदी-सुत, तुह्मीहि शास्त्री तें॥
सर्वत्र क्रोध जसा तैशी सर्वत्र न क्षमा साजे ॥
ते कैसे न वधावे तोडिति पर-घात-दक्ष मासा जे ॥ ५०॥
येऊं द्या कोप मनीं एकिकडे संप्रति क्षमा राहो ॥
कां गोष्पदांत बुडतां ? यश रक्षा, खळ विपक्ष मारा हो ॥
क्रोध असावा समयीं केवळ वश चित्त न क्षमेला हो ॥
कोप त्यजितां जरि जम- दग्नि धनुर्वेद-दक्ष मेला हो" ५२
धर्म ह्मणे "मति-मति साति यति-पति-गति अति-समर्थ जो हरितो
ह्मणतो क्षमाचि बरवी पर-वीर-यशें स्व-सद्गुणें हरितो ५३
व्यास द्रोण विदुर कृप भीष्म श्रीकृष्णनाथ हे सुकवी ॥
ह्मणती "क्षमा शिव-तरु- प्रति पोषी क्रोध सर्वथा सुकवी"

---

१ मला प्राप्त झाली ती दशा. २ क्षत्रियाचें शास्त्र ह्म० शस्त्र-विद्या होय. त्यांत निपुण. किंवा शस्त्रसम्बन्धी जें कर्म, तें शास्त्र. तें शास्त्र आहे ज्यांला, ते शास्त्री. ह्म० शस्त्रसम्बन्धी कर्मांत निपुण, ३ शत्रु. ४ जमदग्नि हा परशुरामाचा पिता. हा धनुर्वेदांत निपुण होता. पण क्षमाशील झाल्यामुळें सहस्त्रार्जुनानें त्यास मारिलें. ५ हे बुद्धिमति द्रौपदि. ६ श्रेष्ठ संन्यासिजनांस मुक्तिदायक. ७ कल्याणरूप वृक्षाप्रत.

व्याघ्र व्याळ क्रूर; क्रूरतर क्रोध, बोध-रोधक हा ॥
क्रोधवशासि विलोकुनि बहु ह्मणति स्वहित[2]-तत्व-शोधक हा
वरिली सुयोधनें ती भ्यांही भावुक-पद[3] क्षमा[4]; तींत ॥
नर जे हिला न सेविति, दवडिति हित ते अदक्ष मातींत
त्यजुनि तिला बहु तरले, एकहि न हिला[6] त्यजूनि तरला गे
कृष्णे क्षमा-सुधारस- रसिकां रस गोड कां इतर लागे ॥
श्रित-हित करिती हरिती सर्व-व्यसन क्षमा-भवानी हो ॥
आराधावी आह्मीं खल-महिषाऽपत्हृत-वैभवानीं हो" ॥
भीम ह्मणे "देवा त्वां जन्मापासूनि सेविला धर्म ॥
त्याचें हें फळ, नाहीं धन मान स्थान यश नसे शर्म ५९॥
ज्यांशीं जैसें त्यांशीं तैसें जरि वर्ततासि तरि अरि ते ॥
हरिते कां सर्वस्व व्यसनीं आह्मांसि मग्न कां करिते ६०॥
न क्षत्रिय तूं साधु ब्राह्मण अम्नायें पढविता पढता ॥
मान-धन क्षत्रिय या व्यसनें, ज्वलनें कटाहसा[10], कढता ॥
राज्योपद्रव गेला झाला अभिलषित लाभ अजिनाचा ॥
परमोत्सवीं उगे कां? अजि गा उडवा स्ववल्कें[11],अजि नाचा
काय ह्मणों तुज आर्या ब्राह्मण-वृत्तीस काय अनुसरसी ॥

---

१ ज्ञाननाशक. २ आत्महिताचीं तत्वें शोधणारे. ३ कल्याणाचें स्थान. ४ पृथ्वी, पक्षीं सहनशीलता. ५ पृथ्वीवाचक क्षमेला ६ क्षांतिवाचक क्षमेला. ७ क्षमारूप दुर्गादेवी. ८ दुष्ट दुर्योधनादि, हेचमहिषासुर, ह्यांनीं हरण केलें वैभव ज्यांचें, त्यांनीं. ९ वेद. १० तेलाच्या कढई सारखा. ११ आपलीं वल्कलें.

त्यजुनि जलधि-वसति कशी तिमिंगिलें[1] सेविजेल तनु-सरसी[2]
श्रेयस्कर स्वधर्म त्यागुनि घ्यावी न विपता पदरीं ॥
प्रकटी यशोऽर्थ, बुडवी न कधीं त्वत्समकवि प्रताप दरीं[3]
हे आर्या[4], हे भार्या हे आह्मी योग्य काय वन-वासा ॥
वल्काऽजिन-धर वससी स्वस्थ कसा या वनांत ननवासा[5]
देतील राज्य नसुखें धरिजे कितवोक्तिचा न विश्वास ॥
काळाचाहि भरवंसा नाहीं जो नित्य खाय विश्वास ६६॥
द्वादश वर्षें गहनीं[6] दुसरें अज्ञात वर्ष तेरावें ॥
लोटावें केंवि वरें दूरविचारें करून हेरावें ॥ ६७ ॥
वसवेल कथंकथमिति[7] आह्मां तप[8] एक सा जणां रानीं ॥
न कळत कसें वसावें तेजें विश्वांत साजणारानीं[9] ॥ ६८॥
रवि- वरि अभ्रें तैशीं वस्त्रें तवविग्रहाउपरि मळकीं ॥
गुप्ताहि मृगमदातें[10] प्रकट करितसे स्वयें सुपरिमळ कीं ६९
अज्ञातवास करितां जरि आह्मी अरिचरांसि[11] आढळलों
स्व-पद-चरम-सोपाना-[12] पासुनि देवा न काय गा ढळलों
चरम-दिनींहि[13] उमगतां व्हावें वन-वास-निष्ठ पुनरपि कीं

१ तिमि हा एक मासा आहे. ह्याची लांबी शंभर योजनें आहे असें ह्मणतात. तिमीला गिळणारा तो तिमिंगिल. २ अल्प सरोवर. ३ संकटांत. ४ हे धर्मराजा. ५ न-नवासा ह्म० जुनासा. बहुत दिवस वनांत वागलेल्या मनुष्या सारखा. ६ अरण्यांत. ७ कसें तरी मोठ्या कष्टानें. ८ बारा वर्षें. ९ शोभणारांनीं. १० कस्तूरीला. ११ शत्रूच्या गुप्तबातमीदारांस. १२ आपल्या पदाच्या शेवटच्या पायरी पासून. १३ शेवटच्या दिवशीं.

तो न द्रवेल सुजनीं; कल्पुनि काकत्व जेंवि कु-नर पिकीं
मरती वनांत पडतां बा जेंवि न पावतां नदा यादें ॥
आह्मीं तसें मरावें करिजेल न राज्य-दान दायादें ॥७२॥
सोडील कसा तीतें जी देती नित्य लाभ नव धरणी ॥
वध्याचि खळ, धर्मचि हा, चोराचा[1] दोषहेतु न वध रणीं
भणगापरि न वस वनीं, ह्मण गा, बापा, मनुष्य-देवा, हूं
दे बाहूंस यश रणीं खळ खळ खळ-रक्त-पूर दे वाहूं ७४॥
पुरुषाच्या शोभिला जें बळ खळ-विजय-दे न नग[2] दे तें॥
हित, सत्य, असें ह्मणतां देवा किति मी ह्मणों 'म न'गदे तें"
धर्म ह्मणे " भीमा बा, दुर्व्यसनीं मीच हेतु तापा तें ॥
दुःखीं साश्रितहि बुडे करितो जो मीलिताऽक्ष[3] पापातें ॥
तेव्हांचि क्षण निष्ठुर होउनि हे मूर्तिमंत पाप कर ॥
त्वां जरि केले असते भस्म, न होते तुह्मांसि ताप-कर ॥
द्यूताला युद्धाला जावेंचि बलाविल्या, प्रतिज्ञा ती ॥
रक्षूं जातां कपटें हरिता झाला पदाप्रति ज्ञाती[4] ॥ ७८ ॥
हे कृष्णा तरि[5] झाली तरलों त्या दुस्तराहि आवर्ता[6] ॥
बुडतोंचि या सतीचा महिमा जरि काय हात आवर्ता ॥
पूज्या मर्यादा परि भ्याला कांहींहि न शकुनी तीतें ॥
तो नावरेचि[7] घातक दुर्जन जो होय वश कुनीतीतें॥८०॥

१ त्या चोराचा ह्म० दुर्योधनाचा रणांत वध, दोषहेतु न. २ दागिने. ३ मिटले डोळे ज्यानें तो. ४ ज्ञातिबांधव. ५ नौका. ६ भोंवऱ्याला. ७ आटोपता.

दाटूनि अनुद्युतीं  आणुनि पण करविला पुनरपि तया ॥
लंघूं कैसें ? पाडी  नरकीं जो अनृत तो कुनर पितया ८१
प्राणास तुह्मांसहि मी  त्यजिन, न धर्मासि पळहि सोडीन
हें व्रत धर्मचि रक्षू,  बापा, न कदापि अयश जोडीन ८२
बा गा, धर्माच्या तों  कोणी सोडूं नयेचि कासेतें ॥
निष्फळ होती मेघें  त्यजिलीं आलींहि जीविकां सेतें॥८३॥
निज-हित-कर-धर्मातें  कुशलें विटवूं नयेचि मन कांहीं ॥
यांपरि पोषण पालन लालन करिजे न अन्यजनकांहीं॥८४॥
अंभोदास पहाती  जैशीं पसरूनि नित्य आ शेतें ॥
धर्मासि तसीं भूतें;  करि पूर्ण समर्थ हाचि आशेतें ॥८५॥
साधु ह्मणति "जो न करी  धर्माशीं नीतिशीं विरोधा, त्या
रक्षी व्यसनीं; तदितर  जन उदकीं लोष्टसा विरोधात्या
ह्मणऊनि अनुसरावें  सुज्ञें न क्रोध-लोभ-काम-मता ॥
पतनार्थ कां अहंता  पोषावी, गा तशीच कांममता ८७॥
तुमचे प्रताप जे जे  दिग्विजयीं प्रकटले न ते लटिके ॥
कुरु-गुरु-पुढें परि न गुरु, यज्ञांत घृतापुढें न तेल टिके ८८॥
भक्षुनि अन्न न समयीं  अंतर देती भले नय-ज्ञाते ॥
द्रोण कृप युद्ध-यज्ञा  वरितील तसे परा न यज्ञा ते॥८९॥

१ मागून केलेल्या द्यूतांत. २ जीविका आलेलीं शेतें ह्म० पिकास आलेलीं शेतें. ३ या धर्माप्रमाणें. ४ मेघास. ५ प्राणी (पाहात.) ६ धर्मच. ७ ढेकळा सारखा. ८ ब्रह्मदेवा. ९ क्रोधा दिकांच्या मताला. १० कुत्सित ममता. ११ मोठे.

आह्मी नियम त्यजितां न चुकेल नदीजही उगाराया ॥
त्या सर्वज्ञ- प्रमुला वा कोण ह्मणेल गा उगा राया९०॥
हे सर्व असोत, जया वीर-प्रवरा सुयोध नत सारे ॥
एकचि कर्णै पुरे, तो कार्य-पति जसा, सुयोधन तसा रे९१
यांसीं कलि करणें हें न ह्मणेल कधीं सुधी नर विहित रे
धर्म-न्याय त्यजितां तेजस्वीही तमीं न रविहि तरे"९२॥
भीम उगाचि वसे, तों ये भगवान् व्यास सु-प्रसन्न-मनें ॥
जाणों साक्षात् धर्मचि तो, ते झाले कृतार्थ तन्नमनें९३॥
दिव्याऽस्त्र-लाभ-कारण-सद्विद्या तो दयांऽबु-राशि कवी ॥
एकांतीं राज्य-यशः- कामा त्या श्रीयुधिष्ठिरा शिकवी॥
धर्मेहि मुनि गेल्यावरि त्याच्या आज्ञेवरूनि जिष्णूतें ॥
सद्विद्या उपदेशी जैसा कश्यप महर्षि विष्णूतें ॥ ९५ ॥
ती काम्यकीं प्रतिश्रुति-विद्या उपदेशिली तया विधिनें ॥
जी आपणासि जैसी दिधली द्वैपायनें दया-निधिनें॥९६॥
धर्म असें वदला कीं "जिष्णो सुतपें समस्त ताप सरे ॥
हो यास्तव आह्मां या व्यसनीं तारावयासि तापस रे ९७॥
या विद्या-सामर्थ्यें तप करितां सर्व विघ्न पळतील ॥
तुज दिव्याऽस्त्रें द्याया शक्रादिक लोक-पाळ वळतील ९८
ज्याचें भाषण सोडुनि बाळपणीं सुस्वरीं किमपि न रंतूं
त्या व्यासें कथिलें कीं नारायण-सख पुराण-ऋषि नर तूं

---

१ वामनरूपी विष्णूला. २ सुस्वर गाण्यांत. ३ रत होत नव्हतों.

करिशील महत्कर्में तूं नारायण-सहाय शुभशील ॥
त्वद्यश ह्मणेल किति सुर- धेनूधां सद्रसांसि दुभशील ॥
हो सिद्ध शीघ्र ये बा हे बाहु तुझे असोत जय-शाली ॥
हो वृष्टि तपोभ्राची बहु त्वत्क्षेत्रीं पिकोत नय-शाली" ॥
भ्रात्यांतें भार्येतें जिष्णु ह्मणे "जें अभीष्ट सत्वर तें ॥
होईल सिद्ध, न चिर- व्यसनीं बुडिजे कधींहि सत्व-रतें २
धौम्याच्या धर्माच्या क्षणहि चुकावें तुह्मीं न सेवेला ॥
गुरु-चरणा यश जैसें स्वर्गींच्याही तसें नसे वेला"१०३॥
मग जाय.तप कराया गुरु-पद वंदोनि इंद्रकील-नगा ॥
तद्विरहितां दिसे तम दिवसा नसतांहि नेत्र-मीलन गा ४॥
'एथेंचि रहा' ऐसें गगन ह्मणे त्या पुरातना ऋषितें ॥
माशी तपस्विवेष स्वर्नायक त्यासि दृग्द्वयें तृषितें ॥ ५ ॥
शक्र ह्मणे "कां धरिलें जें शस्त्र विरुद्ध तापस, त्वां तें॥
शांतें तेथ तपावें लेशहि द्यावा न ताप सत्वांतें ॥ ६ ॥
क्षत्रिय कीं ब्राह्मण तूं शस्त्र-परिग्रह किमर्थ सांग मला ॥
त्वच्चित्ताला तापस- विरुद्ध हा वेष योग्य कां गमला" ७॥
पार्थाचा निज निश्चय कळतां दर्शन तयासि वासव दे ॥
खेदानंदाऽश्रु-भरें भिजवुनियां उत्तरीय-वास वदे ॥ ८ ॥
" पुत्रा वर माग, तुला द्यावें म्यां काय गा यशोधीतें ॥

१ सुरधेनु-ऊध ह्म० कामधेनूच्या कांसेला. २ उत्तम दुग्धरूप रसाला. ३ नीतिरूप तांदूळ. ४ अर्जुनविरहितजे धर्मादि, त्यांला. ५ डोळे झांकणें. ६ तपस्व्याचा वेष घेतलेला इंद्र. ७ दोन डोळ्यांनीं. ८ पांघरावयाचें वस्त्र. ९ यशाच्या समुद्राला.

जाणसि, जें प्रेम, मुखें वत्साचा काय गाय शोधी, तें ॥
पार्थ ह्मणे "दिव्याऽस्त्रें जी वर मजलागिं हाचि शोभन द्या
तृषितासि यथाऽभिलषित जल देतीं न धरितीच लोभ नद्या
इंद्र ह्मणे "पुत्रा हें काशाला? दिव्य भोग माग मला ॥
तुज जो अनर्थ केवळ अर्थ तसा पंडितोत्तमा गमला"॥ ११.
पार्थ ह्मणे "दिव्यहि जे सुख-भोग नकोत बा दयाभ्रा ते
कैंचि वनीं टाकावे वांछिति माझ्या हितोदया भ्राते ॥१२॥
मज दिव्य-भोग रोगचि, तें सुख, जें काय दुःख शुद्ध-रणीं
तो शवचि बंधु-त्दृत शल्याच्या जो न योग्य उद्धरणीं"॥
शक्र ह्मणे "बा तुजसम तूंचि भला विश्व-महित-तर-शील॥
व्यसनातें बंधूंसह निर्दाळुनि सर्व अहित तरशील ॥ १४ ॥
शंभूप्रति आराधीं आधीं, साधीं प्रसाद या अगर्भी ॥
येईन लोकपाळां- सह सत्कारावया तुला मग मी"॥१५॥
ऐसें धनंजयाला उपदेशुनि गुप्त होय मघवा हो ॥
शिव-भक्ति-यशः- श्रवणें प्रेमाऽश्रु-भरासमेत अघ वाहो ॥

१ शरीर. २ चाटून स्वच्छ करी. ३ अजी इंद्र. ४ उत्तम. ५ यथेच्छ. ६ करुणाघना. ७ जगास अत्यंत मान्य स्वभाव ज्याचा तो. ८ या पर्वतावर. ९ इंद्र.

# अध्याय ३ रा.



## सारांश.

अस्त्रप्राप्तीस्तव अर्जुन इन्द्रकीलपर्वतावर तपस्या करीत असतां त्याच्या तपस्तेजानें तेथील तपस्वी फार त्रास पावले. त्यांनीं तें वर्तमान कैलासपर्वतावर जाऊन शंकरास निवेदन केलें. शंकरांनीं, त्यांस "तुह्मी स्वस्थ असा" असें सांगितलें. नन्तर शंकरानें किरातवेषानें अर्जुन तप करीत होता त्याच वनांत प्रवेश केला. इतक्यांत मूकनामक दैत्य तपस्विजनांचा नाश करण्याकरितां वराहरूप घेऊन त्याच वनांत शिरला. त्या वराहास किरात व अर्जुन यांनीं एकदांच पाहिलें. दोघांनींहि एकदम त्यावर बाण सोडिले. तेणें करून वराह तत्काल मेला.

मग त्या शिकारीबद्दल अर्जुन व किरात यांचा तंटा लागला. तेव्हां दोघांचें युद्ध झालें. शेवटीं शंकर प्रसन्न झाले व त्यांनीं अर्जुनास पाशुपतास्त्र दिलें. व शंकर निघून गेले. मग वरुण, कुबेर, यम व इन्द्र हे लोकपाल आले, त्यांनीं त्यास आपापलीं अस्त्रें दिलीं व ते स्वस्थानास निघून गेले.

नंतर इन्द्राचा सारथि मातलि रथ घेऊन आला. व त्यानें इंद्राचा निरोप त्यास सांगितला. त्यावरून अर्जुन रथांत बसून स्वर्गास गेला, तेथें तो पांच वर्षें होता. तो चित्रसेनाजवळ नृत्य, वाद्य, गीत ह्या कला शिकला. उर्वशीचा हेतु अर्जुनानें पुरविला नाहीं,

ह्मणून तिनें "तूं एकवर्ष नपुंसक होशील" असा शाप दिला. मग अर्जुन पित्याची आज्ञा घेऊन पृथ्वीवर आला.

---

तरली चांडाळीहि, न भावें वाहोनि शंकरा बेल ॥
हें जाणतां बुध न कां त्याच्या भजनीं विशंक रावेल ॥
जिष्णूग्रतपें भ्याले सर्व तपः श्री-विलास-सदन मुनी[1] ॥
कैलासाप्रति जाउनि कथिती श्री-शंकरासि पद नमुनी २
भगवान् ह्मणे "न भ्यावें त्याचा संकल्प शुद्ध, मी जाणें
स्वस्थ-मनें स्वस्थाना- प्रति टाकुनि भीतिला तुह्मीं जाणें
मुनि जातांचि किरात-त्वाच्छादन[2] मूर्ति-सम्पदेवरि[3] घे ॥
जेथें पार्थ तप करी त्याचि वनीं साऽनुकम्प देव[4] रिघे ॥
आला किरात-रूपी शिव जिष्णुसमीप तोंचि हननाश[5] ॥
दानव वराहरूपी मूकाहि करि जो तपस्वि-जन-नाश ॥
दुष्टांसि एकदांचि प्रेक्षिति ते वीर पार्थ भर्व दोघे ॥
ह्मणती "शर-प्रहारा, तापस-जन हाय हाय न वदो, घे[6]
खर-तर नर-हर-शर पर[7]- जीवन एकक्षणींच संहारिती ॥
मम देव भक्त ऐसें जाणो कळवावया असें करिती ॥७॥
अर्जुन ह्मणे "किराता त्वां मृगया-धर्म लंघिला दर्पें ॥
स्वांतार्थ[8] मजपुढें अघ केलें खग-पतिपुढें जसें सर्पें ॥ ८ ॥
हा प्रथम मत्परिग्रह[9] असतां त्वां ताडिलें कसें किंरितें[10] ॥

---

१ तपोलक्ष्मीचीं विलासमन्दिरें, असे ऋषि. २ किरातत्व हेंच आच्छादन. ३ शरीररूप संपत्तीवर. ४ शंकर. ५ मारण्याची इच्छा करणारा. ६ शरप्रहाराला घे, असें दुष्टास ह्मणाले. ७ शत्रूचे प्राण. ८ आपल्या नाशाकरितां. ९ माझी शिकार. १० दूकराचा.

पाथरवटें स्वटंकें भेदावें वज्र-पाणि-सह गिरितें" ॥ ९ ॥
त्यासि किरात ह्मणे "रे मद्वन हें, प्रथम म्यांचि हा पिटिला
म्यां वधिला असतां,तूं कोण शरें हाणणार या किटिला
खद्योतत्व सम असो, रवि कीं, तिमिरासि काजवा खाणी!
नवल रवि-पुढें कीट , स्वकृत तमो-नाश-काज वाखाणी ॥
मिरविसि मुज्ञत्व वृथा अन्याला स्वकृत ताप लाऊनी ॥
काय न दगड तपस्वी ' भिजला वृष्टींत तापला ऊनीं १२॥
जोडुनि पुण्य-वनीं तप बुडसी त्याच्या भरेंचि गर्व-तमीं
तूं मजपुढें किती रे कोण हरिपुढें ह्मणेल पर्वत मी ॥१३॥
हो सिद्ध, जरि असेल स्व-तपो-बल-गर्व,सज्ज्य चाप करीं
होशील विमद, पडला गरुडाच्या जेंवि मत्त साप करीं"
तें वाक्य अर्जुनाला गरळ जसें यामुनां ह्रदा कढवी ॥
पढवी जो चापश्रुति रामासि तयावरि स्वधनु चढवी१५॥
शर ते जाणो वाहे एकनिमेषांत एक लाखोली ॥
प्रभुची जाणेल कसा बाहुबळें तोचि एकला खोली १६॥
स्वरवें गिळों न दे ते कवलहि सिंहा विदारितेभा ते ॥
सरले शर, दोन्हीही झाले सहसा तदा रिते भाते ॥१७॥
भ्याला, परि धैर्य धरुनि ताडी त्या ईश्वरासि कोदण्डें ॥
देता विश्व कवळित्या उग्रा काळासि कम्प जो दण्डें१८

१ इंद्रासह. २ आकाशांत प्रकाशमान होणें. ३ यमुनेच्या डोहाला. ४ परशुरामाला. ५ त्या शंकरावर. ६ अन्त. ७ विदारिले हत्ती ज्यानें, त्या सिंहाला. ८ धनुष्यानें. ९ ठुकगाला.

जें युद्धांत ह्मणे हो भास्करजी, न करजाल[1] विकिरा[2] तें ॥
गांडीव धनुहि हरिलें कामाद्य[3]ऽरि-मद-तमो-रवि-किरातें॥
ज्याचा पाद ह्मणे "रे भक्तभवा[4] स्व-कुदशा[5] न कर, वाळ[6]
त्यावरि धनंजयाचा भंगे,पावे यशा न, करवाळ[7] ॥ २० ॥
प्रभुला जिंकूं पाहे भुजयुद्धीं जेंवि काजवा सविता ॥
परि तोपवी स्वधर्में आराधुनि भक्त-राज वासवि[8] त्या२१॥
"मृत्यु-भयासि तराया न जडमुधेचें धरा चिं[9]बुक"लीला॥
ज्याच्या असें सुरांसहि ह्मणती; तो प्रभु वेराचि बुकलीला
शोणितें[10] वमला, श्रमला, भ्रमला, गमला नुठेलसा, पडतां
परि उठला, मोह कसा राहेल? दयाकटाक्ष सापडतां ॥
न पहाते झाले हो पूर्वीं कौतुक कदापि नाकी तें ॥
विजयार्थ शरण गेला नर नत-कामदं[11]-पदा पिनाकीतें[12] ॥
वाहे पार्थिवलिंगीं भावें जें माल्य[13] तो प्रतापार्थ ॥
पाहे तेंचि पुरस्थ[14]-स्व-मद-घ्न-किरात-मस्तकीं पार्थ ॥२५ ॥

१ किरणसमूह. २ पसरा. ३ कामादिषड्रिपूंचा गर्व, हेंच तम, त्याचा सूर्य, अशा किरातानें. ४ भक्ताच्या संसाराला ह्म० जन्ममरणरूप दशेला. ५ आपणांमधील ह्म० संसारामधील दुर्दशा. ६ वाळून जा. ७ खड्ग. ८ इन्द्रपुत्र अर्जुन. ९ हनवटी. १० रक्त. अर्जुन ओकला. ११ शरणागतांचे मनोरथ पुरविणारें पद ज्याचें, त्या. १२ श्रीशंकराला. १३ पुष्प. १४ पुढें उभा, आपला गर्व हरणारा जो किरात, त्याच्या मस्तकावर.

प्रभुला प्रभु-प्रसादें त्या माल्येंकरुनि बोळखे दास ॥
तो पात्र होय गरुडाऽतिक्रम-कर जेंवि टोळ खेदास॥२६॥
पाय धरुनि पार्थ ह्मणे “ ब्रह्मांडीं अघ न माय, बा पाहें ॥
तूंचि हरीं पंक, हरिल अमृताचा न घन मायबापा, हें ॥
प्रभुजी, क्षमा करा जी' मागतसें पसरुनि स्वपदरा मी ॥
या दासींहि करो हें पदयुग, जैसें करी स्वपद रामीं”२८
त्यजुनि विचार, कराया इच्छित होता बळें परिभवातें ॥
लंघनें असह्य गुरुला; स्वसभाजन वाटलें परि भवातें२९॥
नमुनि ‘क्षमस्व’ ह्मणतां प्रकट करुनि रूप बाहुनीं कवळी
अधराप्रति स्मितानें स्वयशानें त्रिभुवनासही धवळी ३०॥
तो दीनबंधु उर्जरी देउनियां अभय पाशुपत नातें ॥
बोले असें, हरी जो स्वपद स्मरतांचि आशु पतनातें ३१
“ सर्वत्र रणीं विजयी तूं नारायणसखा नरा हो रे ॥
स्वप्नींहि अयश तुझिया अवलंबुनि पदनखा न राहो रे”
न कळताहि नाम घेतां पाप्यासही जो ह्मणोनि ‘ओ’ तारी
गेला संकल्पेंचि ब्रह्मांडें निर्मिणार ओतारी ॥ ३३ ॥
मग वरुण धनद पितृपति सुरपति हे लोकपाळवर आले॥

१. गरुडाची अमर्यादा करणारा. २ मावणार नाहीं. ३ परशुरामावर. ४ अमर्यादा. ५ आपली पूजा. ६ शंकराला. ७ क्षमा कर. ८ समर्थ करी. ९ त्वरित. १० अधोगतीला. ११ कुबेर. १२ यम. १३ इंद्र. १४ श्रेष्ठलोकपाळ १५. दीनबंधुरूप नातें.

इंद्रेतर[1] सर्वहि ते स्वाऽस्त्रें पार्थासि अर्पिते झाले ॥ ३४ ॥
शक्र ह्मणे " स्वर्गीं ये, रथ तुज आणावयासि धाडीन ॥
अस्त्रें देउनि पुत्रा तुजकरवीं स्वाऽहितांसि[2] नाडीन" ३५॥
ते लोकपाल गेले मग रथ घेऊनि मातली आला ॥
नमुनि ह्मणे " अर्जुनजी, तात बहाद्दो, बसा रथीं, चाला"
शुचि होउनि मातलिला दिव्यरथीं बैसवूनि मग चढला॥
सदतिक्रम[3] करिल कसा जो धर्मन्याय गुरुमुखें पढला ३७॥
निघतां गिरिसि[4] ह्मणे "बा, मी व्हावें आजि काय उतराई
भवदुपकाराद्रिपुढें[5] हा केवळ होय पाण्डुसुत राई[6] ॥ ३८ ॥
अमरावतीस[7] जाउनि गाहिवरवी तो गुणाढ्य मघव्याला[8] ॥
व्याला न साधुला जो, लाजो तो बाप मूर्त अघ व्याला
जातांचि पार्थ मोही स्वगुणें तत्काळ त्या सुर-सभेला[9] ॥
न पिपी[10]लिक-सेनेसहि सुसिते[11]चाही तसा सुरस भेला ४०॥
बसवुनि निजासनीं हरि करि पुत्र-स्नेह जें जसें करवी ॥
शिर हुंगी आलिंगी फिरवी तनुवरि सुधेसि जो कर[12]वी
देवां करवीं बरवी करवी नरवीर[13]-सूनुची अर्चा ॥
शोभे जसा स्वतेजें देवेंद्र तसाचि तो महावर्चा[14] ॥ ४२ ॥

---

१ इंद्रावांचून इतर. २ आपल्या शत्रूंस. ३ सज्जनाचा अपमान. ४ इंद्रकील पर्वताला. ५ तुझ्या उपकाररूप पर्वता पुढें. ६ मोहरी. ७ इंद्राची राजधानी. ८ इंद्राला. ९ सुधर्मानामक देवांच्या सभेला. १० मुंग्यांच्या पंक्तीला. ११ उत्तम शर्करेचा. १२ प्रसवे. १३ पाण्डुपुत्र अर्जुन, याची. १४ महातेजस्वी.

प्रेमें वज्राद्यस्त्रें हरि देता जाहला स्वतनया तें ॥
पात्रचि पितृ-सर्वस्वा-प्रति जो जाणे भला सुत नयातें ४३
मग पार्थ चित्रसेना- पासुनि अत्यंत आदरें सकळा ॥
इंद्राज्ञेनें शिकला निरुपम वादित्र-नृत्य-गीत-कळा ॥४४॥
जरि पार्थ पांच वर्षें वसला स्वर्गीं पित्याचिया भवनीं ॥
भ्रात्यांला न विसरला खिन्नचि होता तसा तदा, न वनीं
एकांतीं इंद्र ह्मणे " त्या गंधर्वेंद्र-चित्रसेनातें ॥
" स्वर्गींहि खिन्न सुत जरि हें वैभव काय?काय हें नातें ॥
गुणवत्-कलत्र-विरह- ज्वरिता सुख-हेतु शुचिरतांऽपचिती ॥
स्पष्ट तदन्या जी जी पूजा देणार सुचिर तापचि ती ४७
स्पर्शो शृंगार-सुधा- निधिची धृतमूर्ति उर्वशी लहरी ॥
सुत-विकळत्व हरो जसि सत्संगति सर्व उर्वशील हरी"४८
देखत होता सादर सुत जें स्मितपूर्व सांऽभिनय नाचे ॥
प्रकटी विलास नटतां बहु ती गंभीरनाभि नयनाचे ४९॥
तो तीस ह्मणे "सुंदरि जो तुज मागोनि दत्त सुख नेतों
माझ्या वदनें कांहीं प्रार्थितसे सु-गुण-रत्न-सुखने तो ॥
या स्वर्गीं मूर्तिमती तूंचि सुधा, जी प्रसिद्ध, असुधा ती

१ वाद्य. २ गुणवान् स्त्रीच्या विरहानें दुःख पावलेल्यास. ३ शृंगारसंबंधी जे विलास- नृत्यगायनादि-त्यांहीं करून सत्कार करणें. ४ धरिली मूर्ति जिनें ती. ५ उरु-अशील ह्म० अत्यंत दुष्टस्वभाव. ६ हावभावसहित. ७ खोल नाभि जिची ती. ८ चित्रसेन गंधर्व. ९ त्वां दिलेलें. १० ग्रहण करितो. ११ सद्गुण रूप रत्नांच्या उत्तम खाणी हे उर्वशी. १२ इंद्र.

न तिच्या पानें, जैसे त्वदधरपानें[3], क्षणांत असु घाती ॥
यास्तव या स्वर्गीं हा पुरुषोत्तम[1] पार्थ पात्र सुरसा[2] हो ॥
परि तृप्त येथ येउनि सेवुनियां याचि मात्र सुरसा[3] हो" ८२
देवी स्मित करुनि ह्मणे " गंधर्व-पते उदंड आजवर ॥
प्रभुनें काम पुरविले परि मज दिधला अनर्घ्य आज वर ॥
येऊं देईल मुखीं कां प्रवरप्रेमकाम[4] मन्मथ[5] न ॥
कोपें करील सोडुनि पांचांहि शिलीमुखांसि[6] मन्मथन ॥
गंधर्वपते जा तूं, हा जन बहु आजि सुखविला साचा ॥
भेटेन त्या प्रिया मी पाहुनियां समय सुख-विलासाचा" ॥
जीच्या सुरस-वपुपुढें खालें वदनासि अमृत[7]-सर घाली ॥
ती जाय त्याकडे, जसि सुमधुकडे वेग करुनि सरघाली[8]
शृंगार-मानसींच्या[9] पाहुनि तो पार्थ त्या मरालीला[10] ॥
उठला, तशीच पूज्या ती स्त्री शतमखमुखामरालीला[11] ॥
स्वकरें आसन देउनि नमुनि करी पार्थ तत्सभाजन[12] हो ॥
" मज आज्ञा काय" ह्मणे परिसा साधुत्व सत्सभाजन हो
ती उर्वशी ह्मणे "गा कीर्ति-श्रीच्या नृमूर्तिकरवीरा[13] ॥
शक्रोक्तें स्वरसें[14] ही आल्यें, मत्काम-पूर्ति कर वीरा॥८९॥

---

१ पुरुषश्रेष्ठ. २ देवसा. ३ अधरामृताला. ४ श्रेष्ठ पुरुषाविषयीं प्रेमेच्छा. ५ विचाराचें मथन करणारा काम. ६ बाणांस. ७ अमृताचें सरोवर. ८ मधुमक्षिकांची पंक्ति. ९ शृंगाररूप मानससरोवरांतील. १० हंसीला. ११ इंद्रादि देवाच्या पक्तीला. १२ [illegible]ना सत्कार. १३ मनुष्यमूर्तिरूप करवीरक्षेत्रा. १४ स्वप्रीतीनें.

करितां नृत्य मज कडे पाहन होतासि, त्या पहाण्यानें ॥
सूचविलें त्वदभिलषित हरिला मजलाहि त्या शहाण्यानें॥
जाणोनि त्वद्गुरुचें प्रिय हें त्वन्मित्र-चित्रसेन-मुखें ॥
अनुसरल्यें तुज सुजना नीरज- नयना, करीं विलास सुखें''
कर्णावरि कर ठेवूनि ,शिव शिव हर हर असें ह्मणे नर तो
'' माते, हा पुत्र रतो भजनीं, परि ह्मणसि तूं तसें न रतो
माद्री पृथा शची तूं मज तुल्या, योग्य हें नसे तूतें ॥
परि रक्षिति प्रयत्नें गुरुजन तों भंगिती न सेतूतें ॥ ६३॥
एसें पाहत होतों कीं हे नारायणोरुजा आर्या ॥
पूर्वज पुरूरव्याची श्रीपतिची श्री जसी तसी भार्या''६४
हांसोनि ह्मणे देवी ''आह्मां देवींस अघ असेना तें ॥
जाणत नव्हते रमले पौरव, तें काय तुज असे नातें॥६५॥
लावूं नयेचि मुझें भुक्तोच्छिष्टत्व अघ नव सुधेतें ॥
स्व जनक-भुक्ता माता ह्मणुनि त्यजिती सुधी न वसुधेतें॥
मांगों काय करिति जें आर्जव लोकेश सुर तसे जे तें ॥
घालिति आलि-तिरस्कृत- हीं इच्छुनि लेशसुरत सेजेतें६७॥
आल्यें स्वयें तुजकडे कामार्ता स्त्री, ह्मणोन कोमळ हो ॥
मद्भोगासि सुकृत-फळ ह्मणति सकळ; तूं ह्मणों नको मळ हो''
पावे न शुकापासुनि कर जोडुनि शरण जाय परि रंभा ॥

१ त्या चित्रसेनानें. २ तुझा पिता इंद्र, याच. ३ अर्जुन. ४ इंद्राणी. ५ धर्ममर्यादेला. ६ नारायण ऋषीच्या मांडी पासून उत्पन्न झालेली उर्वशी. ७ बुधाचा पुत्र, जो आमचा पूर्वज, त्याची. ८ भोगून शिल्लक राहिलेलें. ९ माझ्या सखींनीं झिडकार-लेल. १० पाप.

तद्वद् नारायण-सख- मुनिपा मुनि उर्वशीहि परिरंभा[१]६९ ॥
पार्थ ह्मणे "तूं माता, मी सुत, धर्मज्ञ नर न वानर कीं ॥
पडतां गळांहि गुरुनीं द्यावा जाया न वर नवा नरकीं ॥
हो सुप्रसन्न-मति, हा जननि जन निज न निमग्न नरकीं हो
अमर नव्हे पशुहि नव्हें मी त्वदुदरजान्वयोत्थ[२] नर कीं हो"
क्षोभे, प्रसन्न व्हावें, परि मन कामासि जें वश स्त्रीचें ॥
'हो क्लीब '.असें शापी उग्रत्व तिचें तसें न शस्त्रीचें[३] ७२
शक्र ह्मणे "बा साधो करिता तूं एक शुद्ध तप शुकसा ॥
तूंचि नर इतर वानर, इंद्रियविषयैकनिष्ठ न पशु कसा! ७३
दिव्य विषयार्णवीं तूं बोधनल-स्पृष्ट[४] साधु पर्वत रे ॥
छायाग्रहासि[५] कपिसा या विषया विरल जन, न सर्व, तरे
अज्ञातवासकाळीं हा बहु येईल शाप कामाला ॥
मातेचा अस्नेहहि होय यशोहेतु साधु-रामाला" ॥ ७५ ॥
लोमश मुनि पार्थातें हरिच्या अर्धासनीं स्वयें पाहे ॥
शक्रासि पुसे "याचें सुकृत असें सांग कोणतें आहे"७६
देवेंद्र ह्मणे "साक्षाद् नारायण-सख पुराणऋपि नर हा ॥
अवतरला भरत-कुळीं भू-भारातें ह्मणावया 'न रहा' ७७॥

१ आलिंगनाला. २ त्वदुदरज ह्म० तुझ्या उदरा पासून झालेला आयु, त्याच्या वंशांत उत्पन्न झालेला. आयूचा नहुष, नहुषाचा, ययाति, इ०. ३ शस्त्रधराचें. ४ बोधरूपी नलनामक वानरानें स्पर्शिलेला. ऋषीच्या शापामुळें, नलवानरानें समुद्रांत टाकिलेला दगड बुडत नसे. ५ सिंहिका राक्षसी. हिला सीताशुद्धीच्या वेळीं मारुतीनें मारिलें. ही समुद्रांत होती.

आला दिव्यास्त्रार्थ प्रेमें झाला प्रपन्न[1] भवचरणीं[2] ॥
मरणार याचिपासुनि वरदर्पित खळ निवातकवच रणीं[3] ७८
शिकला दिव्यास्त्रें हा शीघ्रचि साधूनि देवकार्यातें ॥
येईल सांग ऐसें धर्मातें साधुसेवकार्यातें[4] ॥ ७९ ॥

जा, त्यासि तीर्थ-यात्रा साङ्ग घडेसें स्वयेंचि तूं कर गा
पुण्याविणें जयश्री होईल कसी मुनीश्वरा करगा[5]'' ॥८०॥
हें स्वर्गीचें वृत्त व्यास स्वसुतासि[6] सर्व आयकवी ॥
तो[7] ममतेला, आपण करुणेला, वश, करील काय कवी ॥
जिष्णूत्कर्षश्रवणें व्याकुळ मति होय अंधराजाची ॥
दुर्मोच्य[8]-मोह-पाशें आळंपिली[9] घट्ट कंधरा[10] ज्याची ॥ ८२ ॥
नृप संजयाप्रति ह्मणे " जिष्णूचा शंभुशीं समागम तो ॥
प्रेमें स्व-विजयसाचि स्पष्ट मला तत्पित्यांसमा[11] गमतो ॥८३॥
पाशुपताद्यस्त्रांचा लाभ, स्वर्गीं वरासनाचा, हो ॥
हें बहु, ह्मणे हरि 'अहो उर्वशि, सुखवा वरास[12], नाचा, हो ॥
झाला प्रसन्न ज्यावरि भगवान् कल्पांत-काळनट[13] कलहें[14] ॥
त्याशीं विरुद्ध मत्सुत, दिसतें मज कर्म फार फटकळ हें'' ॥

१ शरणागत. २ शंकराच्या चरणीं. ३ हे हिरण्यपुरवासी असंख्यात दैत्य आहेत. ४ साधूपासकांत श्रेष्ठ, अशा धर्माला. ५ हस्तगत. ६ धृतराष्ट्राला. ७ धृतराष्ट्र, ममतेला वश; कवी व्यास, करुणेला वश होऊन काय करील? ८ सोडविण्यास कठीण. ९ दाबिली. १० मान. ११ तत्पित्या समा मला, प्रेमें स्वविजयसाचि स्पष्ट गमतो. असा अन्वय. १२ पुरुषश्रेष्ठाला. १३ प्रलयकालीं सर्व सृष्टीचा संहार करून नृत्य करणारा भगवान् शंकर. १४ युद्धानें.

संजय ह्मणे " धरावें हितकर मत हेंच" हा ! नच वदावें ॥
ध्यावें न वा, न व्हावें तें वर्ष अराज्यदान चवदावें ॥ ८६॥
वदला धर्म हरिप्रति, "मज द्या हें, येउ अब्द चवदावा ॥
पद न दिलें, तरि उरु कुरु गुरु- रक्तांची शरांसि चव दावा

# अध्याय ४ था.

## सारांश.

धर्मराजाकडे एके दिवशीं बृहदश्व ऋषि आला. त्यास धर्मानें विचारिलें कीं "आह्मांप्रमाणें कोणीं वनवासदुःख भोगिलें आहे काय" ? त्यावर बृहदश्व ह्मणाला " तूह्मांहून नलराजानें दुःख फार भोगिलें. त्याची गोष्ट अशीः-

विदर्भदेशचा राजा भीम, याची कन्या दमयंती. ही फार सुंदर व गुणवती होती. तिच्या रूपास व गुणास मोहित होऊन तिच्या स्वयंवरकालीं तिला वरण्या करितां इंद्रादि लोकपाल ही आले होते. पण त्यांस सोडून तिनें निषध देशाचा राजा नल, ह्यासच वरिलें. हें कलीला आवडलें नाहीं. त्यानें सूक्ष्मरूपानें नलाच्या शरीरांत प्रवेश केला. तेणेंकरून नलाच्या बुद्धीस भ्रंश झाला. तो आपला दायाद पुष्कर, ह्या बरोबर द्यूत खेळला. व त्यांत त्यानें आपलें सर्वस्व घालविलें. पुढें तो स्त्रीसह वनास निघून गेला. रात्रीं दमयंती निजली असतां, तिला सोडून आपण एकटाच वनांत भ्रमण करूं लागला. वणव्यांत कर्कोटक सर्प सांपडला होता. त्यास नलानें त्यांतून मुक्त केलें. कर्कोटकानें नलास दंश करून त्याचें स्वरूप बदलून टाकिलें. आणि ता-

१ पांडवांला, राज्यदान नाहीं ज्यांत, असें चवदावें वर्ष नव्हा-व. २ मोठी.

ह्मणाला कीं, " तुला कोणीं ओळखूं नये ह्मणून तुझें रूप मी बदलून टाकिलें. तूं अयोध्येमध्यें जाऊन बाहुक या नांवानें ऋतुपर्ण राजाजवळ रहा. तुला पूर्वरूप प्राप्त व्हावें असें वाटेल तेव्हां माझें नांव घेऊन मी देतों, हें वस्त्र परिधान कर ह्मणजे झालें. " असें बोलून तो सर्प गुप्त झाला. व नल ऋतुपर्णाकडे गेला.

इकडे दमयंती नलाचा शोक करीत व त्यास शोधीत चालली असतां, एका व्यापाऱ्याच्या काफल्या बरोबर ती सुबाहुराजाच्या नगरास गेली. त्याराजाची आई ही दमयंतीची मावशी होती. पण परस्परांची ओळख नव्हती. दमयंती तेथें सैरंध्री होऊन राहिली. दमयंतीच्या शोधास तिच्या पित्यानें देशोदेशीं ब्राह्मण पाठविले होते. त्यांत सुदेव ब्राह्मणानें तिला ओळखिलें व राजमातेला कळविलें. तिनें तिला विदर्भदेशास पाठविलें.

नलाच्या शोधास ब्राह्मण फिरतच होते. त्यांत पर्णाद ब्राह्मणास नलाचा कांहींसा शोध लागला. पण नलाचें रूप पालटलें होतें व त्यानें आपलें नांवही बदललें होतें. ह्मणून त्यास संशय आला. त्यानें तें दमयंतीस कळविल्यावर तिची खात्री झाली. तिनें नळास आणण्या करितां व त्यास ओळखण्या करितां अशी युक्ति योजिली, कीं, " दमयंतीचा उद्यां स्वयंवर आहे त्यास आपण त्वरित निघून यावें " असें आपल्या पित्याच्या नांवचें पत्र ऋतुपर्णास पाठविलें. पत्र पावतांच ऋतुपर्ण निघून आला. मार्गांत बाहुक ऋतुपर्णा पासून अक्षहृदय शिकला. व त्यास त्याबद्दल त्यानें अश्वहृदय शिकविलें. नलाशिवाय अश्वहृदय कोणास माहीत नव्हतें. तेव्हां इतक्या त्वरेनें ऋतुपर्णास घेऊन येणारा बाहुक हा नलच असला पाहिजे असें वाटून बाहुकाचा बारकाईनें शोध केल्यावर तोच नल अशी दमयंतीची खात्री

झाली. मग दमयंतीनें नलाची प्रार्थना केली. तेव्हां नलानें आपलें रूप प्रकट केलें. तेव्हां सर्वांस मोठा आनंद झाला. पुढें नलानें पुष्कराशीं द्यूत खेळून त्यापासून आपलें राज्य घेतलें व तो आनंदानें राज्य करूं लागला.

कुशल-प्रवृत्ति न कळे जिष्णूची, बहुत लोटलेअब्द ॥
धर्मासि भीम लावी "राज्य तुवां बुडविलें" असा शब्द १

बृहदश्व द्विजराज श्रीधर्माच्या समीप आला, जो ॥
ताप उरींचि न देता, त्यासि विधु न कां ह्मणोनि हा! लाजो?

पूजुनि त्यासि नृप ह्मणे " परिसावें स्वकृत, मी निवेदीन
पूज्यासि दुःख सांगुनि अमृत-नद-निमग्नसा निवेदीन ॥ ३ ॥

जरि धर्म-न्याय-द्विज- देव-सपर्या-पथीं सदा रत मी ॥
द्यूत करूनि बुडालों सांऽनुग साऽनुजसुहृत् सदार तमीं[४]

द्यूतपणीं हारविली वोढुनि नेली सभेंत मज्जाया ॥
काय वदों तें केलें म्यांचि व्यसनीं स्वराज्य मज्जाया ५॥

संप्रति हा दास असा स्वीकारुनियां अरण्यवास वसे ॥
झाली पहा कसी हे हेही जे तें सभाग्य वासवसे ॥ ६ ॥

दिव्याऽस्त्रें साधाया पाठविला तोहि वत्स न परतला ॥
वाटे मज कितवासि त्यजुनि मुनिजनीं करूनि तप रतला
वाटे दुःखी मत्सम मीच, वदा, जरि असेल आढळला ॥

१ धर्म, नीति, ब्राह्मण व देव यांची पूजा, या मार्गांत. २ सेवकांसकट. ३ बंधु व सुहृद् यांसह. ४ शोकांत. ५ द्यूतांतील पणामध्यें. ६ माझी स्त्री. ७ बुडण्या करितां. ८ द्रौपदी. ९ भीमादि. १० अर्जुन.

न असा अयशः[1]पद कीं भूपद्कपदीं[2] जडोनियां ढळला"॥
हांसोनि मुनि ह्मणे "बा नलभूप जसा दुजा न साधि तसा
न तुह्मी दीन न दुःखी,[3] साधावें तें वनींहि साधितसा॥९॥
आज्ञेंत बंधु चौघे धृतमूर्ति उपाय[4]से सुनय शस्त्री ॥
साक्षात् श्रीसीच सती होऊंदे म्लान न मुख न यश स्त्री॥
परिसा नलगाति, तुमची श्रुतिरति[5] हेही सती अनलसा हो
होता नल तेजस्वी भास्करसा इंदुसा अनलसा हो ॥११॥
श्री-वीरसेन-सुत नल निषधेश्वर सुगुणमणिकरंडक[6] हो ॥
ब्रह्मण्यप्रभु[7]·दुर्गत- दारिद्र्य-समुद्र-वर-तरंडक[8] हो ॥ १२ ॥
तो पुण्यश्लोक रणीं करितां रिपु-वीर-हानि वासवसा ॥
तत्कीर्ति ह्मणे "गी[13]:श्री- धी हो या योग्य हा निवास, वसा
वैदर्भ भीमराजा होता बहु खिन्न हीन संतानें ॥
तो भेटोनि सुखविला दमनानें[9] स्वपदलीनसंतानें[10] ॥ १४ ॥
नृप-दास्य-तुष्ट मुनिचें मन त्या मुनिला ह्मणे " सखे दमना
झाला शुद्ध, करावा संतति-सुख-पात्र हा सखेद[11]-मना १५॥
ब्रह्मर्षिवरें दमनें वर दिधला त्या नृपासि संततिचा ॥
झाले तीन सुत, सुता चवथी, गाती गुणौघ संत तिचा१६
ठेवी दम, दांत, दमन, दमयंती हीं अशीं तयां नावें ॥
ज्यां मुनि-वर-प्रसाद- प्रभावातें त्रिभुवनेंहि मानावें ॥ १७॥

१ अपयशाचें स्थान. २ भूमीला पदकरूपी पदावर. ३ दुःखी. ४ साम, दान, भेद दंड. ५ श्रवणेच्छा. ६ सद्गुणरूप रत्नांचा करंडा. ७ ब्राह्मणभक्तिमान्. ८ दरिद्री लोकांस दारिद्र्यसमुद्रांत तरण्याची उत्तम नौका. ९ दमन ऋषीनें. १० कल्पवृक्षानें. ११ खेदयुक्त मन ज्याचें तो. १३ सरस्वती.

भीम नृपति दुग्धोदधि, दमयन्ती श्रीच, वपु सुरुचिर तिचें
त्याहूनि देह दिवसो- दिवस दिसे दीन, जरि सुरुचि रतिचें
जाणों कळे भविष्यद्- दमयन्तींची स्मरा रुचिरतरता ॥
हरदृगनळीं जळाला, रतिच्या विटलाचि तो शुचिरत रता
ती पाहिल्यावरि गमे कोणासहि न स्वरूप सुन्दरसें ॥
श्रीवनमाळेहि पुढें मिरवील स्वमद काय कुन्द रसें २०॥
श्रीकृष्ण रुक्मिणीला श्रीकृष्णा रुक्मिणी जसी आतां ॥
दमयन्तीस नल, नला दमयन्ती, आयके, जनें गातां२१॥
नल नृप ह्मणे "शिवा, ती नवरी हो, मन दुजीस न वरी हो
भैमी ह्मणे " शिवे, तो नवरा हो, प्रेम नित्य नव राहो"
एकासमयीं धरिला हंस नळें तो ह्मणे " कृपा कर गा ॥
सोड मला जरि व्हावी ती दमयन्ती वधू नृपा करगा२३
करिन तुझें गुण-वर्णन जेणें होइल तुझीच नवरी ती" ॥
सत्य प्रिय हित वदती शुद्धात्मे न धरितीच नव रीती२४
राधा-प्राप्त्यर्थ जसा तो स्वकरगताऽमला यशा शिनळे ॥
सोडी दमयंत्यर्थ क्षिप्रचि अतिदुर्लभा तशाशि नळ॥२५॥
नल-मुक्त-राजहंसा- सह हंसांची नभःपथें आली ॥
आली प्रमदवनीं, तों भैमीही घेउनि प्रियां आली ॥२६॥
भैमी ह्मणे"मराळें- ग्रहणेच्छा मन्मनांत आली हो ॥

१ दमयंतीच्या वपूहून. २ पुढें होणाऱ्या दमयंतीची. ३ शंकराच्या तृतीय नेत्रांतील अग्नींत. ४ शृंगाररसांत निपुण. ५ श्रीकृष्ण. ६ आपल्या हातांतील शुभ्र यशाला. ७ जार-श्रीकृष्ण. ८ पंक्ति. ९ अंतःपुरोचित बाग. १० सख्या. ११ हंस. १२ श्रीकृष्णादिमयमांतविशेषनामें, ह्या क्रियेचे कर्ते.

एकासि तरि धरूंया विखरा मुक्ता वनांत आली हो" २७
इतरां हंसांनीं त्या नेल्या बहु लोभवूनि दूरवर ॥
भैमी त्यासि धरूं ये ज्या दे असुदान दान-शूर-वर॥२८॥
एकान्तीं तीपासीं स्तविला निषधेन्द्र तो खगानें हो ॥
जाणों राधेला दे खगभर्गवद्वेणु तोख गानें हो ॥
"काय द्विजें, तुला द्विज- राजेंही काय, मान वसु, तनये,
जो त्वत्करासि तो सुर- प-सुत-शत-प्रवर मानव-सुत न ये
पुण्यश्लोक निषध-पति नल खल-बल-जलधिवाडवानल गे
लोकां महोत्सव-प्रद तोचि सदा त्यांसि पाडवा नलगे ३१
"स्मरबुधदस्त्र रुचिर-तर" ऐसें ह्मणणार जे न ते लटिके
हैयंगवीन जैसें सुरसिक-रसनें पुढें न तेल टिके ॥ ३२ ॥
अनुपम अनुरूप अनघ जरि वरिला त्वां नृपात्मजे न नल
होइल केवळ तापद, कीं जो नर नळ न होय, तो अनल
नल-कस्तूरी टाकुनि कां तूं घेसील अन्य-नर माती ॥
जरि वरिती न हरिप्रति घेती ह्मणवूनि धन्य न रमा ती
नर-रत्न तोचि, तूंचि स्त्री-रत्न, उदंड आडनावांचीं ॥
न बुडविति न वा तारिति चित्रें बरवींहि आड-नावांचीं"
ती सुमति ह्मणे "आर्या, त्वां तिकडेही असेंचि कळवावें

१ पसरा २ मोत्यें. ३ सख्यांनी. ४ जीवदान, ५ दात्यांत श्रेष्ठ. ६ हंसरूप श्रीकृष्णाचा वेणु. ७ पक्ष्यानें. ८ सुरप ह्म० इंद्र. त्याचे शंभर पुत्रांहून श्रेष्ठ. ९ शत्रुसैन्यरूप समुद्रांतील वडवाग्नि. १० वर्षप्रतिपदा. ११ मदन, बुध, अश्विनीकुमार. १२ अतिसुंदर. १३ ताजें लोणी. १४ विहिरी व जहाजें यांचीं, चित्रें. १५ नळाकडे.

साधो हळु हळु मृदु मधु हित मित बोलोनि चित्त वळवावें"
'आज्ञा' ह्मणोनि येथुनि, कळवुनि हें प्रेम तेथुनि, उडाला
हंसप्रत्युपकारीं हर्षीं, कामज्वरीं, नळ बुडाला ॥ ३७ ॥
झाली स्मर-ज्वरार्ता, द्याया ही योग्य, हें पिता समजे ॥
जाणति न सांगतां सुख असुख परांचें जगीं सदा सम जे
योजी स्वयंवरोत्सव रायांसि सुख सकाम दे वार्ता ॥
आले नाहूतहिं, मति कोणाची तें न कामदेवार्ता ॥ ३९॥
देवर्षि-मुखें परिसुनि शक्र करी धरुनि हरिख गमनातें ॥
त्याच्या विमान येइल काय न येतांचि हरिखर्ग मनातें४०
जों निकट कुण्डिनाच्या आले यमवरुणभूभृदर्यनल ॥
तों तोहि सकल-सद्गुण- निधि पुण्यश्लोक वीर-वर्य नल ॥
ते सुर ह्मणति "अहाहा!नळचि सकल-पुरुष-मुकुट-हीर मणी
नवरी न वरील कसी याला पाहोनि सुमतिही रमणी४२
आह्मांलाचि न केवळ लावितसे व्यक्त लाज हा रविला
आह्मीं निज तेजोमद याचिपुढें सर्व आजि हारविला"॥
न सुचति जरि भलतैसी युक्ति प्रिय-कार्य-साधिका सुकते
त्या साधु-संगति-महा- लाभासहि सर्व साधि कामुक ते४४
मेथोनि त्यासि ह्मणती "कार्य-परें सर्वथा न लाजावें ॥
हो अस्मद्दूत, विमुख न जनें सत्यव्रता नला जावें"॥४५॥

१ दमयंतीपासून. २ नळाकडून. ३ उलट उपकार ज्यांत अशा हर्षांत. ४ अत्यंत. ५ न बोलाविलेले. ६ कामपीडित. ७ नारदाच्या मुखानें. ८ विष्णूचा पक्षी गरुड. ९ कुंडिनपुराच्या. १० भूभृद्-अरि-अनल ह्म० पर्वतांचा शत्रु इंद्र, व अग्नि. ११ मनोव्यथायुक्त. १२ कार्यतत्पर मनुष्यानें.

"होतों दूत" नल ह्मणे "कार्य वदा, कोण हो तुह्मी चवघे
ओळख देउनि ह्मणती "आह्मी भैमर्थ्य पातलों अवघे ४८
भैमी स्वयें वरू या आह्मां चौघां-जणांत अन्यतमा ॥
हें कार्य, दूत हो गा, जा गा बा, तिजकडेचि धन्यतमा
सस्मितवदन नल ह्मणे "प्रभुजी, जो हेतु सुर-वैरागमनीं ॥
माझ्याहि, तोचि सर्वां हि मृगाच्या तुल्य सु-रव-राग मनीं
दूत करुनि मज तिकडे कार्यास्तव पाठवूं नको, पावा ॥
कोणावरिहि सुनय न स्वातिक्रम आठवून कोपावा ॥४९॥
शक्र ह्मणे "वदलासि प्रथम तसें वचन, मग असें वदसी ॥
अचल, करींच असावा, व्यवहारीं शब्द, संगरीं सदसी॥
भूप ह्मणे "याकर्मीं पवनाहि होईल मज न सांगातीं ॥
अंतःपुर-प्रवेशीं जी प्रभुजी साधु युक्ति सांगा ती" ५१॥
शक्र ह्मणे "जा गा तूं चिंता आधींच करिसि कां गातीं
आह्मांसि हें कठिन जरि तरि सुज्ञ प्रभु ह्मणोनि कां गाती
शक्रवरें नळ गेला शिरला अंतःपुरीं सुखें सुरसा ॥
भैमीच्या हा, याच्या सेवी, ती, रूप-संपदा सुरसा ॥५३॥
भैमी हर्षे त्याच्या, विधुच्या तसि कुमुदिनी न, आगमनीं॥
सत्कारूनि ह्मणे "जी यावें मद्भाषणें न आगं मनीं ५४॥
सुंदर-वर कोण तुह्मी ? गुरुच्या वाटो न हें परागं मना॥

---

१ भीमकन्या दमयंती, इच्याकरितां. २ कोणाला तरी. ३ देवश्रेष्ठ जे आपण, त्या आपल्या येण्यांत. ४ मधुरध्वनिश्रवणाची प्रीति. ५ आपली, अर्थात् सुनयाची अमर्यादा. ६ उत्तम खड्ग. ७ सोबती. ८ क्रोध. ९ श्रेष्ठांच्या ( नलाच्या. ) १० मोठा अपराध. १२ हें विचारणें.

कीं जें जें अंतःपुर तें तेंहि विषय नव्हे परा गमना॥५५ ॥
आलां कमे अवारित! कार्यार्थ प्रकट आयकों, दावा, ॥
वाटे कर्णीं तुमचा वाङ्मय सौवर्ण-आय कोंदावा ॥ ५६ ॥
वाहों लागे गुरु-घन- रस-पूरित वीरसेनभू-पनळ ॥
" सुंदरि मी पाशि-पितृप- पावक-पुरुहूत-दूत भूप नळ ॥
सुमुखि प्रार्थिति बहु तुज ऐसें प्रभु लोक-पाल ते चवघे ॥
'अवघे उणेचि रस, तूं दिव्य-रसाचीच सर्वदा चव घे' ५८
सुज्ञे, तुवां वरावा आह्मां चौघांजणांत अन्यतम ॥
धन्यतमत्व तुला यो न शिवो पळ दयित-विरह-जन्य-तम"
हांसोनि ह्मणे भैमी " प्रणति-प्रिय देव गुरु" असें ह्मणती ॥
यांहीं क्षमा करावी स्वीकारावी यशोऽर्थ मत्प्रणती ६०॥
वरिले हेचि चरण म्यां त्यजितां ज्वलनांत काय होमीन
यज्जीवन जीवन तो दुग्धीं वांचेल काय हो मीन" ॥६१ ॥
नळ नृप ह्मणे "सुबुद्धे या दासावरि तिहीं न कोपावें ॥
मदधिक कोटिगुणें ते आग्रह कांहीं करूं नको पावें६२॥
मृत्यु असो, पर-वंचन करुनि सुधेच्या जिणें नको पानें" ॥
त्वत्पाणि-ग्रहणें मीं देवांच्या बहु शिणेन कोपानें ॥ ६३॥
विदुषी ह्मणे "ह्मणा जा कीं म्यां कथिलें परोपरी पण ती

१ ज्यांचें निवारण कोणीं केलें नाहीं ते. २ सुवर्णाचा आकार. ३ मोटा, व घनरस ह्म० उदक ह्यानें पूर्ण भरलेला, असा पनळ. नलाचें भाषण फार प्रौढ व सुरस असें होतें, असा भाव. ४ वीरसेनपुत्र नल, हाच पन्हळ. ५ वरुण. ६ यम. ७ इंद्र. ८ अमृतरसाची. ९ कोणीतरी. १० पतिवियोगानें उत्पन्न झालेला शोक. ११ नमन ज्यांस प्रिय, ते. ह्म० तुमच्या नमनानें च संतुष्ट होणार. १२ त्या इंद्रादिदेवांनीं. १३ शहाणी.

प्रणति प्रभूंसि करिती अनुकंप्यां मी स्वयंवरा ह्मणती ॥
मत्संमत-स्वयंवर- विधिनें वरितां तुह्मी न अपराधी ॥
काय करूं त्यजुनि तुह्मां माझी पळ अनुसरे न अपरां धी
होईल देह रंगीं सुर-पति-नर-पति-समक्ष नलै-गामी ॥
हा जन तुमच्याचि असे इतरा कोणाचियाहि न लगामीं"
होय अकृतकार्यहि नळ सुर-वर-संमत खरें निवेदून ॥
सत्यें जसा तसा न प्राज्येंहि सुधा-रसें निवे दून ॥६७ ॥
रंगीं सर्व मिळाले तेव्हां आली तयांत दमयंती ॥
जाणो चकोर ते, ती मूर्त-ज्योत्स्नाचि तापं-दमयंती ६८॥
साहे न परोत्कर्षा ज्याची मति सच्छळीं सदाऽनलसा ॥
बैसे तिघांजणांसह हरिहि अधिष्ठानि त्या सदा नलसा६९
रंगीं पाहों जातां दिसले चौघेहि ते धवासम जे ॥
भैमी देव-कृतच्छल ऐसें चित्तांत तेधवां समजे ॥ ७० ॥
पांचां नळांत जेव्हां काय दिसेनाच भेद लव तीस ॥
बुद्धि ह्मणे " कां भीशी?" गुरु-चरणीं त्यजुनि खेद लवतीस
कर जोडूनि ह्मणे ती " नल भर्ता भीम-कन्यकेला हो ॥
प्रभुजी, स्वप्नांतहि जरि संकल्प नसेल अन्य केला हो७२
नल पति,इतर पुरुष पितृ- बंधु जरि मनांत मानिले असती

१ दया करण्यास योग्य. २ स्वतः वर पसंत करणारी. ३ दुसऱ्याला. ४ नलराजास अनुसरणारा. ५ ज्यानें देवकार्य केलें नाहीं तो. ६ संतप्त. ७ चंद्रकान्ति. ८ ताप शमविणारी. ९ नेहमीं उद्युक्त अशी. १० आश्रय करून. ११ सभेला. १२ पतिसम. १३ नम्र होणारीला.

तारि ताराल इला हो, प्रभुजी, कैसी तरेल जी असती"॥
तीचा बलवान् निश्चय सुर-त्हत नल-रूप घे हिराऊनी ॥
बहु तेज प्रकट करी शुचि सत्व-गुण च्छळीं हिंरा ऊनीं॥
शुद्ध सर्वांग कुशं नलदं, परि उंपभोगोचितत्व नलदासी ॥
ऐसें मनांत आणुनि दमयंती सुमति होय नल-दासी॥७५॥
पतिरूप सोडवुनि ती लोकेशांचा प्रसाद साधूनी ॥
घाली नळासि माळा स्तविली प्रेम-प्रसन्न-साधूनीं ॥ ७६॥
नल तीस ह्मणे "कुलजे, त्वां जरि देवांसमक्ष मज वरिलें
जों साऽसु तों तुझा मी, होतांहि प्रेम ऊंन मजंवरिलें७६॥
प्रत्यक्ष दर्शन मखीं, सुगति, असे वर नलासि वासव दे ॥
प्रकटेन इच्छितां, मम- लोकीं येसील, हें हुताश वदे ॥७८॥
पाकीं पटुत्व, धर्मीं स्थिति, हे वर दोन धर्म दे यातें ॥
वरुण जल-लाभ, माल्या-ऽम्लानत्वहि, या प्रमोदं-देयातें ॥
गेले सुर-पति नर-पति पाहुनि तो साधुतोपकर जोडा ॥
बहु वदले या पुण्य- श्लोका जाया स्वदोष कर जोडा ८०
झाला विवाह गेला स्वपुरा मग नल तिसीं सदा रमला
भूमि ह्मणे "ताराया अवतरला विष्णु हा सदार मला ॥
कन्येसि 'इंद्रसेना, पुत्राला 'इंद्रसेन, हें नाम ॥

---

१ शुचि ह्म० शुद्ध हिरा, उन्हांत जास्त तेज प्रकट करितो. तसा शुचि सत्वगुण, छळ झाला असतां, जास्त सामर्थ्य प्रकट करितो. २ यज्ञाचा एक अवयव. ३ दर्भ. ४ वाळा. ५ उपभोगाला योग्य असणें. ६ सजीव. ७ उणें. ८संतोष देणाऱ्या नळाला.

ठेवी, प्रजांसि दे बहु सुख, पुण्य श्लोक तो असा राम॥
सद्वापरं-कलि मार्गी भेटे हरिला सलोक पाळाला ॥
कळतां वृत्त क्रोधें घे वहु बडवूनि तो कपाळाला ॥८३॥
त्यांसि ह्मणे "केंवि तुह्मीं प्रभुनींहि स्वाऽभिमान मोकलिला
नल गुरु काय तुह्मांहुनि, सोसे न स्वाऽपमान तो कलिला
देवांसमक्ष कैसा दमयंतीनें मनुष्य हा वरिला ॥
दंड्या ती, दंडाऽर्ही उठला प्रभुनीं न हात आवरिला८५
शक्र ह्मणे "गा पुंण्य- श्लोक नळ गुणाढ्य रामसाच कवी
दे सत्व सात्विका सुख सज्ज्ञानें, तमचि तामसा चकवी ॥
योग्या तीच तयाला, तोचि तिला योग्य, जेंवि काम रती
अनुरूप योग सन्मत, साधूत्कर्षे असाधु का मरती ८७॥
कामा, क्रोधा, लोभा अनुसरतां लोक फार वा ढकले ॥
न करावा सद्द्वेष स्वहिता देऊं नयेचि पाठ कले"॥ ८८॥
ऐसें शिकवुनि गेला स्वर्गाला शिष्यराय जीवाचा ॥
मलिन कलि न मान्य करी, ती त्यासि शिवेल काय जी, वाचा
रंध्रांऽन्वेषण केलें कलिनें वर्षे समग्र बारा हो ॥
खर्ले न विटेचि, जरि ह्मणे द्वापर 'हा दुष्प्रयत्न वा राहो,॥

१ द्वापर बरावर ज्याच्या असा कलि. २ अपराधी मनुष्याला शिक्षा करण्यास तयार झालेला हात देवांनीं कधीं आवरिला नाहीं. आणि आतांच कसा आवरिला, हा भावार्थ. ३ बृहस्पतीचा. ४ ती वाचा ह्म० लोकपालांनीं उच्चारिलेली, उपदेशरूप वाणी. ५ नलराजाच्या दोषाचा शोध. ६ दुष्टकलि.

नल भूप मूत्र-शौचीं करि,पद-धावन चुकोनि,संध्या हो॥
जाणों तो साधु ह्मणे " कलिचीहि प्रार्थना न वंध्या हो
त्या रंध्रीं शिरला तो श्रीच्या गेहीं हळूच कलि कवडा ॥
छेदाया श्रितसुखदा जेंवि भजे शस्त्रपाणि हलिक वडा ॥
आपण शिरे नळीं कलि शिरवी त्या द्वापरास पाशांत ॥
व्यसनीं भल्यासि पाडी खळ, हरिणा व्याध जेंवि पाशांत
'द्यूत कर' असें शिकवी मग नल-दायाद पुष्कराशि कली
न शिकावें परि तन्मति त्या दुर्मंत्रा सुदुष्करा शिकली॥
पुष्कर ह्मणे "करावें द्यूत" नल ह्मणे "अहा!भलें सुचलें॥
अमृतापरीस माझ्या कर्ण-युगाला त्वदुक्त हें रुचलें"॥९५
द्यूतीं आनंद जयें थोडा त्या पुष्करासि, अति कलिला
हानि नळाला नुमजे केली मलिनें शिरोनि मति कलिला
दुष्कर साधन जीचें त्या श्रीतें मेळवूनि पुष्करसा ॥
पुष्कर साजे, नल-तनु जसि सरसी ग्रीष्म-काळ-शुष्क-रसा
बहु मास भरीं भरला प्रिय सख सचिवांसि विसरला निपट
स्त्रीहि श्रीहि बहु रडे कलिनें दाटून पाडिलें विपट॥९८॥
सर्वस्व-नाश होतां सचिव-मतें ती करूनि यत्नातें ॥
धाडी माहेराला रथ-रत्नासह अपत्य- रत्नातें ॥ ९९ ॥
सर्वस्व हरूनि पुष्कर नलराजाला ह्मणे उदारपणें ॥

---

१ लघुशंका केल्यावर जी शरीरशुद्धि करावयाची, तींत. २ पाय धुणें. ३ आश्रया करितां येणारांस सुखदायक. ४ शेतकरी. ५ वटवृक्षाला. ६ फांशांत. ७ फांसांत. ८ मलिन. ९ कमला सारखा. १० सरोवर. ११ ग्रीष्मऋतूंत सुकून गेलें उदक जीचें ती. १२ वांकडें

शेवट गोड-करावा द्यूत-रसाचा तुवां स्त्रै-दार-पणें॥१००
गरळ-रसाच्या अब्दें या तच्छब्दें अतीव तळमळला ॥
परि न दुरुक्तें आपण तो पुण्य-श्लोक-धीर-नळ मळला॥
जाय विभूषण दारा- ऽनुगत नल त्यागुनि स्वनगरातें ॥
बहु लाजवी ह्मणति वैं जें हा हा पौर तो स्वन गरातें २
त्या पुण्यश्लोकाला आश्रय देती न दिन पुरोपवनें ॥
नल जठराऽग्नीस ह्मणे "जळें कीं तुज तृप्तिला पुरो पवन॥
पुष्कर-भयें न पुसती कोणीही आप्त त्या नळाला हो ॥
हिंडे वनोवनीं तो अन्नावांचूनि बहु गळाला हो ॥ ४ ॥
यत्पाद-तल-मृदुत्वें लाजावें कामधेनुनवनीतें ॥
वर मिथुन पादचारें हिंडे पावे फळेंहि न वनीं तें ॥ ५ ॥
हेमच्छद खग पाहुनि कल्पी आहार हेमलाभ वनीं ॥
वस्त्रें धरी, ह्मणे हा प्राप्त न झालेंचि हें मला भवनीं ॥ ६
वस्त्रीं धरितां गेले वस्त्र हरुनि ते उडोनि खग नीच ॥
वस्त्र हर 'अक्ष'ऐसें कळवुनि झाले अदृश्य गगनींच ॥ ७
वनदेवता न पाहों सकती लज्जानता नलास्याला ॥
करिति न रोमंथाला हरिण मयूरहि तदा न लास्याला ८
साध्वीनें स्वपटाऽर्धें स्वतनु तसी झांकिली स्वपति-तनु ती
वेदहि अशा सतीची करिति सदा, परि न पळहि पतित नुती

१ स्त्रीच्या पणानें. २ मेघानें. ३ फार. ४ भूषणरहित. ५ स्त्री-सह. ६ शब्द. ७ नगर आणि बाग. ८ उदक. ९ स्वर्णाच्या पंखांचा, १० नलमुखाला. ११ रवंथाला. १२ नृत्याला.

वर्णी नदी-नगांतें, दावूनि तिला विंदर्भ-देश-पथ ॥
त्याग समजोनि रडतां, समजावुनि नल सतीस दे शपथ ॥
एका सभेंत रात्रौ निजला मग आठवूनि निज-लीला ॥
कलि-मलिन-बुद्धि नल तो सोडूं पाहे श्रमोनि निजलीला
जावें कसें न कळतां मज पाशांचि,दार-संग हा निपट ॥
आपण असोनि अक्षत होऊं देइल न संगहानि पट १२ ॥
फाडावा स्वकरें तरि आतां पट जागवील निजलीला ॥
होता मदर्थ जरि हरि असि, असि ह्मणता दुजी न निजलीला
शोधुनि सभा पहावी ऐसी आर्धी दिली नळास मती ॥
मग खड्ग-लता कलिनें वाटे त्या सुकृत-सत्फळा-सम ती
कलि-योगें जें धरिलें रायें तीक्ष्णत्व कापितां वस्त्र ॥
न धरील कधींहि तसें शाण-शितें गरळे-लेपनें वस्त्रें १५
खड्गें पट कापविला न, तिचा अर्धा गळाचि तो कलिनें
न मळावेंचि कधीं तें प्रेम कसें मळविलें खळें मलिनें १६॥
जाय,पुन्हा नल परते, पाहे येउनि तिच्या मुखाला हो॥
साऽश्रु नल ह्मणे "देवा, हे वामाऽक्षी सती सुखा लाहो"
जाय पुढें ये मागें परतोनि सवेंचि, जेंवि दोलों हो ॥

१ विदर्भदेशाचा मार्ग. दमयंतीनें अशासमयीं विदर्भदेशास आपल्या पित्याकडे जावें, हा नलाचा भाव. २ धर्मशाळेंत. ३ न फाटलेला ( पट ) ४ हरि, मदर्थ जरि असि ह्म० खड्ग होता, तरि असि दुजी निजलीला ( हरिलीला ) न, असें नल ह्मणता. ५ त्या नळाला. ६ पुण्याच्या उत्तम फळासारखी. ७ ती खड्गलता. ८ सहाणेवर घासण्यानें. ९ विषाचा लेप केल्यानें. १० वस्तरा. ११ सुंदर नेत्र जिचे ती. १२ झोंपाळा.

तो लाहो भेटीचा घे कीं न पुढें स्वदृष्टि लोला हो ॥१८॥
विश्वंभरे क्षमे ह्या साध्वीला रक्ष, म्यां निरविली हो ॥
सर्वंसहे तुज-पुढें न स्वाऽधिकता इणें मिरविली हो॥१९॥
बापा सती-व्रता हे तुज बहु जपली, न जीवितासि सती
तूंहि इला बहु जप,गा त्वां त्यजिल्या न स्त्रिया बऱ्या दिसती
कलि दमयन्ती-प्रेमा ' हे दोघे वोढिती नळाला हो ॥
प्रेम्याला त्याचें मन सांपडलें, देह त्या खळाला हो २१॥
सत्याश्रित गुण-मय शुचि कापुनि घे,परि न द्रेचि हाक पट
पुण्यश्लोकीं राहुनि उघडिल साचेंचि केंवि हा कपट२२
नल गेल्यांवरि कलिनें जागविली, कीं तिचे असु खपावे॥
पति न दिसतां ह्मणे 'हा' राज्य-भ्रंशें न ती असुख पावे
"अजि नाथ, अहो नर-वर, अजि इकडे एकवेळ हेरा हो
एकाकी जाल कसे दासी सेवा करील, हे राहो ॥ २४॥
चुकल्यें क्षमा करा जी न चुकेन पुढें कदापि सत्कार्या ॥
त्यजिली दया अकस्मात् त्यागाऽर्हा काय तीहि सत्कार्या
माझें मन बहु तुमचा चिंतूनि असाधु-वाद तळमळतें ॥
अजि पुण्यश्लोक पहा मत्त्यागें कीर्ति-पाद तळ मळतें २६
व्याघ्रालाही रडवी भ्रमतां गहनीं तदा विलाप तिचा ॥
पद-मुद्रित पथहि तिला कलि-वश-दैवें न दाविला पतिचा
ज्याच्या चरणाचें गुरु ह्मणुनि धरावें शिरीं रज गरांनें ॥

---

१ चंचल. २ विश्वाला धारण करणाऱ्ये. ३ हे पृथ्वी. ४ सर्वापराध सहन करणाऱ्ये. ५ हे पातिव्रत्या. ६ सतीचा आश्रित, पक्षीं सत्याचा आश्रित. ७ सूत्रमय, पक्षीं सद्गुणप्रचुर. ८अरण्यांत. ९ ज्या शोकाच्या. १० विषानें.

त्या शोकें[1] गिळिलीला गिळिलें विजनीं वनीं अजगरानें॥
त्यासमयींचा तीचा गणिला दवसांचि पळ विलाप वनें ॥
व्याधासि आर्त रव तो कर्णीं लागोनि कळविला पवनें ॥
तो व्याध\अजगरातें खर-शस्त्रेंकरुनि होय हो चिरिता ॥
कुतुकें ह्मणे शिखि-शिखा[2] न जिरेल, इला वमूनि होचिरिता
त्यासहि ती कीर्ति-सुधा[3] न पचे कीं योग्य तो न राहु तिला
देवी-कोपा[4]ऽनल घे निज-धर्षण-काम-पामराहुतिला[5] ३१॥
मग तीन अहोरात्रें पति-विरहाऽर्ता[6] वनीं वनीं भ्रमली ॥
वृक[7]-सन्त्रस्ता यूथ-भ्रष्टा[8] बाळा मृगी तसी भ्रमली ॥३२॥
पाहे रम्याऽश्रम-पद सीतासी, सांत ती निवे कांहीं ॥
पूजूनि सांत्विली बहु मुनि-वर्यांहीं महाविवेकांहीं ॥ ३३॥
"होईल भेटि पतिची, कलिचें हें कृत्य, नल न दे विपदा
लागेल तिळप्रायहि तुमच्या अपवाद-मळ न देवि पदा ॥
शीघ्रचि राज्य-पदीं पति- सह बहु सुख भोगिशील शीलवती
लवती श्री सत्व-रता अन्याला दे न एकही लव ती" ॥
सांत्वन करितां झालें भैमीचें स्वस्थ चित्त कांहींसें ॥
तद्दुःख तसें अद्भुत. तें आश्रमपदाहि, होय नाहींसें ॥
विस्मित होउनि तेथुनि पुनरपि शोधी तया शरण्यातें[9] ॥
पाहे न कंटक-क्षत- वपुतें ती पाहतां अरण्यातें ॥ ३७ ॥

१ वणव्यासारखा. २ अग्निज्वाला. ३ दमयन्तीलाअजग-रापासून सोडविलें ही कीर्तिसुधा. ४ दमयन्तीचा क्रोधाग्नि. ५ आपल्यावर बलात्कार करण्यास इच्छिणाऱ्या नीचाच्या आहुतीला. ६ निविड. ७ लांडग्याला भ्यालेली. ८ कळपांतून चुकले-ली. ९ शरण जाण्यास योग्य अशा नळाला.

अग नग खग मृग पाहुनि त्यांसि "ह्मणे नळ विलोकिला बोला
त्या शोक-गर-रसाच्या    पानीं मुनि-शंभुचीच मति लोला ॥
सार्थ वनीं अढळतां    जवळ करी ती मृगीच कळपा त्या ॥
नल-कृष्णसार-विरहें    जीच्या न पडेचि पळहि कळ पात्या
निज-वृत्त सार्थवाहा    कथुनि पुसे जो मनांत देव नळ ॥
सार्थप ह्मणे "मनुष्य न    आढळले, बहु वनांत देवनळ" ॥४०
पुसतां सांगे सार्थप "जाणें    चेदिप-सुबाहु-देशाला" ॥
तत्सहवासें चाले    धरुनि मनीं निषधजनपदेशाला ॥ ४१ ॥
रात्रौ निद्रा-व्रश तो    सार्थ वनीं विजन-दावनग-जांनीं ॥
सार्थ-गज-दान गंध-    क्षुब्धांनीं मर्दिला वन-गजांनीं ॥ ४२ ॥
पामर ह्मणती "आली    जी शोध करीत बायको पतिचा ॥
ती कृत्या न पिशाची    ऐसा अत्युग्र काय कोप तिचा॥४३
दिसतांचि तीस मारूं" ऐसें ह्मणती स्वकार्य-पटु वाणी ॥
ती कांपवी बहु गज-    त्रस्ता भैमीस कर्ण-कटु वाणी ॥ ४४॥
तेथुनि पळोनि शिरली    गहनीं भैमी, मनांत कांप तिच्या ॥
स्वकृतांसि बोल लावी, लावील मनीं पदांसि कां पतिच्या
ब्राह्मणसमागमें ती    चेदिपति-पुरासि पावली सांजे ॥
टाकित होत्या उतरुनि    जीवरुनि गृहागमीं मरुया सांजे

१ व्यापाऱ्यांचा समूह, काफला. २ विश्रांति. ३ आपला वृत्तांत. ४ काफल्याच्या नायकाला. ५ राजा. ६ चेदिदेशाचा राजा सुबाहु-याच्या देशाला. ७ निषधदेशाचा स्वामी नळ, याला. ८ निर्मनुष्य अरण्यांतील पर्वतांवर जन्मलेल्या वनगजांनीं. ९ व्यापाऱ्यांच्या हत्तींच्या मदोदकाच्या वासानें खवळलेल्या. १० स्वकर्माला.

शच्यांद्यमरी ह्मणती आह्मी योग्या इच्या नसों गतिला ॥
परि चेष्टिति पौरांचीं   पोरें मानुनि मनांत सोंग तिला ॥४७
प्रासादावरुनि तिला   पाहे प्राज्ञा सुबाहु-जननी ती ॥
धात्री धाडुनि धामीं   ने कीं ठावी तिला सुजननीती॥४८॥
तीच्या लावण्य-गुणें   द्रवली दावी स्व-मातृ-सम रीती ॥
गमली तिला सुकृत-लय-नाक-भ्रष्टा सुमूर्ति अमरी ती॥४९॥
पुसतां स्ववृत्त सर्वहि   सांगे पति-रीतिची कथी थोरी ॥
सैरंध्री ह्मणउनि घे   पति-नाम स्वात्मनामही चोरी॥ १५०॥
"उच्छिष्टाऽशन पाद-   क्षालन परपुरुष-भाषण स्पष्ट ॥
न घडोंद्याल तरी निज   पति-शोधाऽवधि करीन मी कष्ट५०
बोलेन प्राणप्रिय-   शोधार्थ ब्राह्मणासवें मात्र ॥
मदधीन असावें हें   व्रत माझें देवि आणि हें गात्र"॥ ५२॥
राज-प्रसू ह्मणे "मज   मान्य असे सर्व हें असेंचि रहा ॥
हो मत्सुता-प्रियसखी   विरहाऽनल उपरमो नसो चिर हा५३
सुख नृप-सुता-सुनंदा-   ज्योत्स्ना-सख्यें सती-व्रता पाहे ॥
पावे भवार्तमतिसी   सत्संगतिनें न तीव्रतापा हे ॥ १५४ ॥
स्त्रीपट चोरूनि पळे   तेव्हां कैंचीं नळासि पायतणें ॥
सिंहासनीं मिरवले   ते चिरले हो वनांत पाय तणें ॥ ५५ ॥
जातां वनांत ऐके   ऐशी दुरूनि हाक वणव्याला ॥

---

१ इंद्राणी आदिकरून देवस्त्रिया. २ पदवीला. ३ पुण्यक्षय होऊन स्वर्गातून पृथ्वीवर आलेली. ४ राजमाता. ५ राजकन्या सुनंदा हीच चन्द्रिका, तिच्या सख्यानें. ६ पतिव्रता. ७ संसार-दुःखानें पीडित बुद्धि. ८ वहाणा. ९ गवतानें.

"झालों पुण्यश्लोका रक्ष तुज्या अभयदा कवण त्याला ॥
धांवोनि जाय नळ कीं न विपत्पूरीं पद-प्रवण वाहो ॥
पाहे तों अहि आहे आलासे त्या समीप वणवा हो ॥ ५७॥
पुसतां नळासि सांगे "घडलें मज गुर्वऽतिक्रमें पाप"॥
'स्थावरसा हो जों नळ नुचली तों' हा सुरर्षि दे शाप ॥५९
त्वद्धित करुनि यशातें हा नाग सखा नवा नळा, लाहो ॥
यातें रक्षुनि तुजला तोष न भक्षुनि दवाऽनळाला हो॥६०॥
अंगुष्ठमात्र झाला तो कर्कोटक असें वदोनि हित ॥
दाव-विवर्जित देशीं त्यातें नळ भूप ने करी विहित ॥६०॥
सोडावा भूवरि तों राहे अवलंब धरुनि तो खातें ॥
मग बोले क्षण द्याया रोखातें मग अनंत तोखातें ॥ १६१ ॥
"करितों हित कांहीं वा स्वपदें मोजीत सज्जना चाल ॥
साधु तुह्मीं कां न नतो- द्धारीं होऊनि सज्ज नाचाल॥६२॥
एकद्वित्रीणि असें मोजी नळ लांघितां धरा-भाग ॥
दशमीं पदीं ह्मणे 'दंश' तों चावे कलिपताज्ञ तो नाग॥१६३
तत्काळ विकृत झाला नळ यातें नाग तो ह्मणे "देवा ॥
सेवा हे वा माझी किति पचवाया कृतघ्नपण केवा ॥ ६४॥

---

१ अभयवचन देणाऱ्या पुत्राला. २ विपत्तीच्या प्रवाहांत. ३ पदाचे ठायीं नम्र झालेला. ४ गुरूच्या ह्म० नारदाच्या अमर्यादेनें ५ जाग्यावरून न हालणारा. ६ उचलणार नाहीं. ७ नारद. ८आकाशाला. ९ रोषाला. १० संतोषाला. ११ नम्र झालेल्याचा उद्धार करण्यांत. १२ दहा, पक्षीं दंश कर. हें दंश् धातूचें आज्ञार्थी द्वि०पु०ए०. १३ 'दश' ह्या शब्दावरून मानिली आहे आज्ञा ज्यानें तो. १४ विरूप. १५ सामर्थ्य.

डमलों यास्तव कीं या कुदशेंत तुला जनें न वळखावें ॥
त्वद्गत कळिचें राघव- नामेंसें मद्विषेंहि बळ खावें ॥ ६५ ॥
माझें बहुहित-कर तव देहीं न गमोचि विष मरणद मनीं ॥
लेवविलें कैवच तुला हें सुख-जय-हेतु विषम-रण-दमनीं ॥
शीघ्र अयोध्येप्रति तूं ऋतुपर्ण-नृपा-समीप जा गा तो ॥
जागा तोषाचा बहु जन त्याचा गुण जसा तुझा गातो ॥
'मी बाहुक सूत' असें सांग रहा तत्समीप सेवकसा ॥
या व्यसनीं सेव्य नव्हे रवि-वंशज तो मनुष्य-देव कसा ॥
सत्संगीं न शिरे वा लव-मात्रहि ताप जेंवि न दवं सरीं ॥
दावावा हय-त्हृदय- ज्ञान-चमत्कर त्यासि सदवसरीं ॥६९
देइल अक्ष-त्हृदय तुज द्यावें त्वां अश्वत्हृदय ऋतुपर्णा ॥
द्याया नवधि राहों देनाचि नगीं वसंत-ऋतु पर्णा ॥७० ॥
तसें जें गेलें तें सर्व-स्व पुन्हा अनंत देणार ॥
स्वस्थ स्व-सत्व-जीवन- मात्र असो, फार भाग्य येणार॥
निज रूप प्रकटावें त्हृदयीं जेव्हां उठेल हा काम ॥
हें दिव्यांऽबर देहीं घे, " कर्कोटक " असें मुखीं नाम "

१ तुझ्या शरीरांत शिरलेल्या कळीचें. २ मृत्युदायक. ३ सुख हाच जय, त्याच्या प्राप्तीस कारण. ४ संकटकाळ हेंच रण, त्याच्या नाशाविषयीं. ५ वणवा. ६ सरोवरांत. ७ योग्य प्रसंगीं. ८ द्यूतक्रीडाज्ञान. ९ अश्वपरीक्षेची विद्या. १० नवीन समृद्धि. ११ वृक्षावर. वृक्षाला नवीन पर्णादि समृद्धि देण्याकरितां, पूर्वींचीं पानें वसंत ऋतु त्या वृक्षावर राहूं देत नाहीं. १२ आपले धैर्यादि-गुण व जीवन. हें मात्र स्वस्थ असावें एवढ्याच पुरतें तूं ऋतुर्णा-पासून द्रव्य घे. जास्ती घेऊं नको, असा भाव.

गेला नळासि सुखवुनि दुखवुनि तच्छळकरासभा सदही
मद्धित-कर कर्कोटक मात्र, न तो जिष्णुचा सभासदही॥
नैषध ऋतुपर्णाला भेटोनि ह्मणे " निजाश्रयीं देवा ॥
देवा, बाहुकनामा सारथि आहें, करीन मी सेवा ॥ ७४॥
आज्ञा कराल तरि हय, घटिकेंतहि चालवीन शतगावें ॥
पाक करीन, असा कीं अमृतें वासापुढेंहि न तगावें ७५॥
जाणें कविता, गायन, मुख्य कळा याचि दोन, येरा ज्या
त्याही ठाव्या, ह्मणती "स्वगुण स्वमुखें वदों नये"राजा ॥
पंक्तिसहस्र सुवर्ण प्रतिमासीं करुनि वेतन स्थापी ॥
वरिली वृत्ति नळें ती जसि हंसें मानस-च्युतें वापी ॥ ७७॥
तेथें असतां नित्यहि निद्रा-समयींच उत्तम श्लोक ॥
आठवुनि स्वमनांत स्त्रीस ह्मणे एक उत्तम श्लोक ॥ ७८॥
" कोठें असेल, मंदें त्यजिली, क्षुत्तट्समाकुळा बाळा ॥
मागेल अन्न कोणा? वांचेल कसी वनांत हा भाळा॥७९॥
जीवन सखा पुसे "ही कोण तुझी? जीस नित्य शोचिशि रे॥
बाहुक ह्मणे भल्याच्या हृदयीं पर-शोक-वह्नि-शोचि शिरे
आठवत्ये कोणीही मंदें त्यजिली वनांत हे बाळा॥
सीतेसि राक्षसीशा बहु चिंता जीस ह्मणति हेबाळा ८१॥

१ त्या नळाचा छल करणाऱ्या गादवाला ह्म. कलीला. २ देदीप्यमान असा सर्प कर्कोटक. ३ इंद्राचा सभासद् बृहस्पति. ४ शंभर योजनें. ५ इतर. ६ दहाहजार. ७ एक तोळा सोन्याचें नाणें. ८ मानससरोवरापासून भ्रष्ट झालेल्या. ९ विहीर. १० पुण्यकारक कीर्ति ज्याची तो नळराज. ११ क्षुधा व तृषा यांनीं व्याकूळ झालेली. १२ हे दैवा. १३ जीवन ह्या नांवाचा मित्र.

कितवें मंदें पापें देउनि विश्वास कापिलाच गळा ॥
देउनि गेला चिंता- वृद्ध-व्याघ्रीस, कीं इला चगळा८२॥
अज्ञात- वास-काळीं भीमें शोधासि धाडिले विप्र ॥
ते साधु वहु यशोधन- लोभें सर्वत्र धांवले क्षिप्र ॥ ८३ ॥
त्यांत सुदेव ब्राह्मण होय यशस्वी कपींद्रसा सुकृती ॥
जो व्यसनीं थोरांच्या कामा ये तोचि धन्य सासु कृती
पुण्याहवाचनीं तो चेदि-पतिगृहांत जाय सन्महित ॥
दूरुनि दमयन्तीतें वळखे मानी मनीं स्व-जन्म-हित ॥८५॥
भेटे हळूचि आर्धी प्रार्थुनि तो आप्तराज साश्रु तिला ॥
वर्णे वळखे, कलिनें मळविलियाही सुधी जसा श्रुतिला
दम-दांत-दमनसख मी कुंडिनवासी सुदेव आइकसी ? ॥
वाइ कशी गे व्यसनीं पडलीस ?न ती रडेल आइ कसी!
गहिंवरली वोळखितां बंधु-सखा वाडवा सुदेवातें ॥
जेंवि मुमुक्षु-मति जगीं वसत्या त्या आड वासुदेवातें ८६॥
तें मातेसि सुनंदा सांगे ती त्या द्विजासि बाहूनी ॥
भाव पुसे "रडली कां सैरंध्री आज तूज पाहूनी" ॥८७॥
विप्र ह्मणे "नळ-महिषी भीम-सुता हे विलोकितां कळली ॥
भ्रूमध्यग पिप्लु पहा व्यक्त न तद्रुचि दिसे, मळें मळली "
मळ धूतांचि अविप्लुत पिप्लु तमविमुक्त भानुसा साजे ॥

१ चितारूप वृद्ध वाघिणीला. २ मारुतीसारखा. ३ जीवंत. ४ रंगावरून, पक्षीं अकारादि वर्णावरून. ५ ब्राह्मणास ६ तिलक. ७ त्या तिलकाची कांति. ८ स्पष्ट. ९ तम १० राहु, त्या पासून मुक्त. 'तम' असा अकारान्त शब्द कोशांत आढळतो.

लाजे सुबाहु-माता विषसें स्वाज्ञान तन्मनीं डाजे ॥ ९१ ॥
प्रेमें भेटोनि ह्मणे " वत्से केलें असें तुवां कां गे ॥
त्वन्माता मद्भगिनी' ऐसें नातें रडोनि ती सांगे ॥९२॥
भैमी ह्मणे"सुनंदा तसि हेहि, असोंचि पाहिलें कीं तें ॥
कोटि गमे प्रीतिपुढें तुच्छा अमृत-प्रपाहि लेंकीतें ॥ ९३॥
जाणोनि दया केली ते तों तुच्छाचि मावशी, हेमीं ॥
रत्नींहि न रुचि, शीलीं' घाल्यें तेणेंचि मावशी हे मी ॥
होतां पति-प्रवृत्ति' द्यूतीं जाणोनि भावि-बाधा मी ॥
पाठविलीं स्वापत्यें रडतो पाहोनि सांसि वा धामीं" ॥
भैमीस मायसी जें सत्कारी फार मावसी ते तें ॥
वाटे श्रीअनसूया पूजी सप्रेम-भाव सीतेतें ॥ ९६ ॥
भैमी ह्मणे पितृ-गृहा पाठवितां देउनि स्वसेनेला ॥
"मावशि, उगी; लया त्वां ताप सुनंदे सये स्वसे नेला"॥
येतां भैमी, आधीं धाडुनि आनंद हेर माहेरा ॥
दृष्टींसि ह्मणति कन्याँ "धन्या व्हा, सत्य हे रमा हेरा ॥
माता तात भ्राते स्वापत्यें पुर विदर्भ मात्र न ती ॥
सुखवी,विश्वासहि, परि एक मलिन कलि न नहोय तुष्ट-मती
भैमी मातेसि ह्मणे " गांजी साधूंसि, दे वियोगा धी ॥
स्नेहचि विश्वामित्र, न पर, एतन्नामका वियो गाधी ॥

१ कोटि लेंकीतें, प्रीतिपुढें अमृतप्रपाहि तुच्छा गमे, कीं तें पाहिलें असोंचि. २ अमृताची पाणपोई. ३ कपटरूप. अशी. ४ पौरकन्या. ५ गाधी, विश्वामित्रनामक पुत्राला व्याला. पण तो विश्वामित्र नव्हे. तर स्नेह हाच विश्वामित्र. येथें विश्वामित्रशब्दें करून 'अति छळ करणारा' असा अर्थ व्यक्त होतो.

दयिताचि मुजना-करवीं, स्वमुखा-करवींच आणवा हूं न ॥
हूं न करितां मरेनचि सांगावें काय आण वाहून ॥ १ ॥
राज्ञी ह्मणे पतिस, "जरि भुजगीं ग्रायासि मृत्युभी डसती,
नच गडवडेती वत्सा, न असें वदती त्यजूनि भीड सती २॥
भीमें नळ शोधाया केले जे विप्र सिद्ध, त्यांसि कवी ॥
नळ उमगाया, भैमी, सर्वत्र असें वदा, असें सिकवी ॥ ३॥
"पुण्यश्लोका त्यजिली निजली आतां वनीं कशी भार्या
नसतां दोष सतीचा योग्य परित्याग काय गा आर्या ४॥
येउनि असेंचि सांगति नळ-विरहें जीस पितृ-भुवन कारा
आलों पाहुनि देवा, साकारा मात्र, त्या न अनकारा ॥
पर्णाद द्विज सांगे एकचि ऋतुपर्ण-पुरुष साकेतीं ॥
त्वां शिकविलीं वचें जीं श्रवणीं पडतां सखेद ठाके तीं ॥
तो ह्रस्व-बाहु वाहुक पुरुष ह्मणे "त्यागिजे स्वतनु,न सती॥
करिता बळ जरि विधिनें विधिची धरिली यशोर्थ हनु नसती
व्यसनें-विलुप्तविवेक न पावेचि उपेक्षितां स्वतनु कंपा ॥
ऐशा दैव-हतावरि साध्वी न विटो त्यजूनि अनुकंपा ८॥
वदला असें पुरुष तो आहे केवळ विरूप परि पाक ॥

१ मुजना करवीं दयित ( नल ) आणवा; स्वमुखाकरवीं हू ( रोदन ) न आणवा. २ बंदिशाळा. ३ अकारसहिताला ह्म० अनलाला. ४ अकाररहिताला ह्म० नळाला. ५ ऋतुपर्णाचा सेवक. ६ अयोध्येंत. ७ आखूड भुजांचा ८ विधिनें, ( ब्रह्मदेवानें ) विधिची ( दैवाची ) यशोर्थ हनु धरिली नसती तर विधि बळ करिता. सारांश, दैव बदलल्या मुळें तनुत्याग केला नाहीं. ९ संकटांनीं नष्ट झाला विचार ज्याचा, तो.

कीं शीघ्रयान, येथें नळसा; अवितर्क्य कर्म-परिपाक[1]"९॥
पूजुनि पर्णादातें भैमी घेउनि मतीं स्वमातेतें ॥
योजी जें काम कुतुक- कीर्ति-कर सरस्वतीसमा ते तें १०
त्याचि सुदेवासि ह्मणे " द्यावें त्वां एक दान दादानें ॥
हें शुष्यज्जीवन[2] सर पूर्ण असो एकदा नदादानें ॥ ११ ॥
ऋतुपर्णाला ह्मण कीं " नळ नुमगे, तो नसेल या भावें ॥
होतो पुन्हा स्वयंवर दमयन्तीचा; प्रभो तुह्मीं जावें॥१२॥
गेले पुष्कळ राजे राज-कुमार स्वयंवरासि अहा ॥
परि तो उद्यांचि कीं हो, जा,जरि जाणें घडेल, शक्ति पहा"
तद्वाक्यज्ञ द्विज तो साकेतीं शिकविलें तसेंच वदे ॥
ऋतुपर्णा श्रवणीं तें वृत्त जसें अमृतहि न तसें षव दे॥१४
तें वृत्त बाहुकाला सांगोनि करूनि फुल्ल गाल वदे ॥
माधो, मित्रत्वें द्विज- राजीं[3] पद काय गा न गालव[4] दे ॥
मी कुंडिन-गमनो त्सुक, जाणशि तूं शीघ्र-यान, ने मातें॥
'हूं' ह्मण उद्यां स्वयंवर, व्हावा प्रत्यूह[5] या न नेमातें॥१६

१ परिणाम. २ शुष्क झालें उदक ज्यांतील तें. ३ पक्ष्यांचा राजा गरुड, ह्यावर. ४ गालवाच्या आग्रहावरून विश्वामित्रानें त्याजवळ आठशें श्यामकर्ण गुरुदक्षिणार्थ मागीतले. तेव्हां गालव, ते अश्व मिळविण्या करितां, आपला मित्र गरुड, ह्याच्या पाठीवर असून चार दिशा फिरला. व त्यानें ८०० श्यामकर्ण विश्वामित्रास दिले. ( महाभारत- उद्योगपर्व- गालवचरित-अध्याय १०६-११८ ) सारांश--मित्रभावानें गरुडानें गालवाचें कार्य केलें तसें तूंही मित्र-भावानें माझें हें कार्य कर; असा राजाच्या बोलण्याचा भाव. ५ विघ्न.

नळ वारि ह्मणे 'बहु बरें' स्वमनीं "हा लामला खरखरा हो
प्रथम गमे सुज्ञ-मतें खरं योपिद्भाव तो खर खरा हो" १७
मग पुण्यश्लोक ह्मणे "न सतीचा दोप हा नियतिचा कीं॥
भ्रमवी बळें भ्रमाच्या करुनि स्थिरनियमहानि यति चाकीं
पुत्र असोनि असें कां? हा! म्यां वरिली वनांत विटलीला
नाम न रुचेल, मग सुत मानेल कसा मनांत विटलीला॥
न बुडालों या मागें, आजिहि आहें, उद्यां बुडेन नमीं ॥
वतं मीन-केतन कथं घटितं ते" काय तुज नसें नत मी ॥
विटली न वामनातें श्री, अन्याही सती न हीनातें ॥
मुकतां सिंधु सराशीं लावील कसें महा-नदी नातें ॥२१॥
न्यावाचि हा बहूत्सुक, वदलों या सूर्य-वंशभूपा ' हूं ' ॥
ज्याला वरील भैमी तो सुकृती भगवदंशभू पाहूं" ॥२२॥
योजी ऋतुपर्णरथीं स्वाद्भुत-विद्या-बळें हयां सजुनी ॥
स्वजना दारिद्र्यंगीं स्मरवूंहि न दे गतें तयांस जुनीं२३॥
विद्याप्यायित वाहुक- बाहु-कलित-रश्मि ते चपळ वाजी
फुरफुरति ह्मणों जाणो आह्मां, रवि-हय-मदाहि, पळवा जी

१ चटपट. २ कठिण. ३ स्त्रीस्वभाव. ४ दैवाचा. ५ नियति, यति स्थिरनियमहानि करुनि भ्रमाच्या चाकीं बळें भ्रमवी; असा अन्वय. ६ जाराची कृति. ७ हायहाय. ८ हे मदना. ९ कसें. १० केलें. ११ त्वां. १२ पुण्यवान्. १३ ईश्वरांशापासून जन्मलेला. १४ गमनें. १५ हयांस. १६ बाहुकाच्या अश्वविद्येनें संतोष पावलेले. १७ बाहुकाच्या भुजांनीं धरिल्या दोऱ्या ज्यांच्या ते. १८ ह्मणण्याकरितां.

ऋतुपर्ण आपणासहि धन्य ह्मणे, होय सव्यथरथ रवी ॥
क्षिति-त्हृदयातें बाहुक दावुनि रथ-वेग भव्य थरथरवी ॥
ऋतुपर्णाचा सारथि वार्ष्णेय ह्मणे मनीं " असा मान्य ॥
होता नळ, कीं संप्रति या लोकीं एक हा असामान्य२८
"हा! पुण्यश्लोका बा, होतों मी सारथी तुझा पहिला ॥
काय तुझी गति झाली कां त्वां दिधला वियोग या महिला
रूपें न, गुणें शुचि कवि, दाता सकरुण अनुग्र हा नलसा॥
तीच गति दृष्टि रीति स्थिति आर्ती जी अनुग्रहानलसा"
त्या नृप वार्ष्णेयांचे दाटति पाहोनियां जवास गळे ॥
तों स्यंदनावरूनि भू- पृष्ठीं साकेत-राज-वास गळे॥ २९ ॥
भूप ह्मणे "पडला गा भूपृष्ठीं उत्तरीय-पट थांब"॥
बाहुक ह्मणे "पडोंद्या तो योजन एक राहिला लांब" ॥
पाहुनि बिभीतक-द्रुम भूप ह्मणे"बाहुका प्रसंख्यानीं ॥
मत्समहि पटु न कोणी मजला कर जोडिले असंख्यानीं" ॥
एस ह्मणोनि सांग ता त्या तरुचा फळ दळ गणुनां ॥
बाहुक ह्मणे"पहातों मोजुनि संदेह वाटतो ह्मणुनां"३२
"संख्यान अक्ष-त्हृदयाहि जाणें मी सत्य, तुज नमो, जावें॥
सूर्यास्तापूर्वीं, कीं लागेल विलंब बहु, न मोजावें"॥३३
बाहुक ह्मणे"असें तरि जा भो वार्ष्णेय, सूत, रथ हाकीं

१ दुःखाकुल रथ ज्याचा तो. येथें रथशब्दाचा लाक्षणिक अर्थ 'रथाचे घोडे' असा आहे. २ अनुपम.३ सौम्य. ४ दुःखित जनावर. ५ अनुग्रह करण्या विषयीं आळस्यरहित. ६ वेगाला. ७ अयोध्यापति ऋतुपर्ण, त्याचें वस्त्र. ८ बिबव्याचें झाड. ९ बहुसंख्या करण्या विषयीं.

काय कठिन हो जातो कुंडिन-नगरासि नीट पथ हा कीं"
राजा ह्मणे "शरण तुज आलों ने क्षिप्र कार्य तें साधो"
बाहुक ह्मणे"मुहूर्त स्थिर हो, मोजीन तूर्ण मी साधो ॥३६
नेऊं, परि पाहोंद्या, बहु कौतुक वाटतें मना ह्मणुनी " ॥
भूप ह्मणे "तरि इतुकीं या शाखेचींच तूं पहा गणुनी" ॥
शाखा छेदुनि मोजी प्रथम फळें, मग तशींच नळ पानें ॥
भरतां होय गत-श्रम विहिरा उकरूनि जेंवि जळ पानें ॥
"अश्व-त्हदय मी देतों द्या मज संख्यान अक्ष-त्हदयहि तें"
ऐसें मागितलें त्या दातृ-वरें सर्व-दक्ष-त्हदय-हितें ॥२३८॥
द्रुत कुंडिन-गमनाऽर्थी शिकवी त्या बाहुकासि तो कवि तें
जाणो दिव्यौषध दे अंतर्गत-कलि-विषास ओकवितें ॥३९
विद्या दुष्टीं भय दे जशि रघुची पर-मनीं चमू, ढकली ॥
कीं स्वःस्था नहुषा मुनि- हुंकृति, भी परम नीच मूढ कली
वर्णिति कवि तें प्याले गुरु-करुणाऽमृत-महा-रसाला जे ॥
स्पर्शोनि कलि नळाला श्रोत्रिय-मुनिला महारसा लाजे ॥
नळ-शक्तिपुढें-कलिची शक्तिहि सिंहीपुढें जसी कुतरी ॥
चाले न लंघनीं गुरु- च्या, माया जेंवि सिंधुच्या, कुंतरी
शापूं पाहे नळ परि सुचलें जें वज्र-कवच कलिला तें ॥

१ सिद्धि पावो. २ त्वरित. ३ नद्यादिकांचे तीरीं खणितात तो डुरा, तो. ४ सर्व चतुरांच्या त्हदयानें धारण केलेला. ५ शरीरांतील कलिरूप विषाला. ६ कलीच्या ठायीं. ७ स्वर्गस्थाला. ८ अगस्तीचा क्रोधशब्द. ९ वेदवेत्ता. १० ड्यागसारखा. ११ फुटकी नौका. १२ वज्राप्रमाणें दृढ असें कवच.

सद्गीतें नमनातें, दव-भीतें सेविजे सु-सलिलातें ॥ ४३ ॥
नमुनि ह्मणे कलि "देवा, पुण्यश्लोका महा यशा पात्रें ॥
दे अभय मुखीं यायों स्तोत्र, न यायास हाय शापार्वें ४४
दुष्कर न शिखि-निषेवण हाला-हल नाम-गर-निषेवण वा॥
शिरला या तनु-कक्षीं भैमी-शापाहि-वर-मिषें वणवा ४५
पूजिति अतापदा बहु, ' देवाहि न तापदा अरण्यनळा ॥
सत्पदचि, न हरि हरि! हरि! हरिचेंहि नताऽपदा अरण्य नळा
स्मरणें त्वद्भावातें पाहेन जनीं लवेंहि अनलें-समीं ॥
अनल-समीरचि तूं तों मज कक्षीं; यदि असेन अनलेंस मी
कोपासि आवरी नळ सन्मति केवळ न रुक्षता सिकली॥
आधीं दूषी याचक- सुरतरुला मग बिभीतकासि कली ॥
तें स्वमुखें प्रकट करुनि दत्ताऽभयदान,धर्म न विटाळी ॥
खळ-कृत-सच्छळ-कथन प्रस्तावातें कुलीन कवि टाळी ॥

---

१ सज्जनाला भ्यालेल्यानें. २ येण्याकरितां. ३ अग्निसेवन. ४ हालाहलनामक विषभक्षण. ५ शरीररूप गवतांत. ६ दमयंतीचा शाप हाच महासर्प, त्याच्या रूपानें. ७ अरण्यवासी नळाला, पक्षीं अरणीच्या अग्नीला. अतापदा अरण्यनळा बहु पूजिती. तापदा देवाहि अरण्यनळा न. ८ इंद्राचें. ९ शरणागताचें संकट. १० नंदनवन. हे नळा, सत्पदचि नतापदा हरि. हरिचें अरण्य न. ११ अनलसमीं ( अग्निसदृश ) जनीं लवेंही स्मरणें त्वद्भावातें पाहेन. तुझें अल्पस्मरण करणाऱ्यांस मी नलरूप समजून पीडा करणार नाहीं. असा कलीचा भाव. १२ गवताला. १३ आलस्यरहित. १४ याचकाचा कल्पवृक्ष, नलराज, यास. १५ दिलेलें अभयदान हाच धर्म. १६ दुष्टानें केलेला सज्जनाचा छळ, त्याच्या सांगण्याच्या प्रसंगाला.

बैसोनि रथीं पुनरपि अश्वांतें तो प्रियं-वद पिटाळी ॥
कुंडिनपुर दावुनि भय ऋतुपर्ण-मनांत जें तदापि टाळी५० ॥
कळतां ऋतुपर्णाला भीमें भेटावयासि आणविलें ॥
भैमीस रथ-रवें नळ आला हें नळ-हयांहि जागविलें५१ ॥
वळखे वार्ष्णेयाला त्याही रवि-वंश-भवन-दीपा हे ॥
नळ-सिंधुप्रतिच न ती भीम-मुकुंदांऽघ्रि-भव-नदी पाहे५२
जो ह्रस्व-बाहु सारथि, तिमरा, चवथा नसे रथीं नळ कीं
हा, कीं भ्रमलीं नेत्रें अश्रु-भरें सर्वकाळही मळकीं ॥५३॥
ऋतुपर्णाची सत्कृति करुनि ह्मणे भीम भूप वासवसा ॥
" गोड करा हंस तुह्मी हा स्वीकारूनि कूप-वास वसा ॥
वार्ता स्वयंवराची स्वप्नींहि नसे, कथील तो आर्य !॥
आगमन-हेतु पुसतां " नमनावांचूनि कोणतें कार्य ॥५५॥
भैमी दूतीस ह्मणे " मद्धृदयीं तर्क हा असा वागे ॥
ऋतुपर्णाचा सारथि बाहुक जो तोचि नळ असावा गे५६॥
केशिनि, जा शोध करीं, मळलें विमळ स्वरूप बहुधा सा
मलिन-कलि-नयन-पातें; जाणों सद्हिताचि मान्य बहु धासा
जाउनि रथ-शाळेंत प्रार्थुनि बहु बाहुकासि ती वदवी ॥

१ "नलहयांहीं" यावरून " नलाच्या अश्वविद्यासामर्थ्यानें त्वरित आलेल्या हयांनीं " असा अर्थ स्पष्ट होतो २ भीम हाच विष्णु. त्याच्या पदापासून उत्पन्न झालेली नदी. अर्थात् दमयंती, नलसिंधुप्रति नपाहे. ३ सत्कार. ४ दासीविशेष. ५ दुष्टकलीच्या दृष्टिपातानें. याचा, मळलें, याकडे संबंध. ६ सज्जनाचा शत्रु. ७ ब्रह्मदेवाला.

शोधुनि पाहे भैमी- त्हृदयाच्या कार्य-सिद्धिची पदवी५८॥
पर्णादाजवळि जसें वदला तैसेंचि केशिनीजवळ ॥
धवल मधुर ते वर्ण श्रुतिला गमले तिच्या सुधा-कवळ५९
ती भैमीस ह्मणे "जी येइल भलत्या जनासि न गहिवर ॥
दिसतें सत्व असें कीं 'पडतां न चळेल हेम-नगहि वर ६०
गहिवरला जी बाई परि आवरिला बळेंचि गहिवर तो ॥
योगें रूप फिरविलें, सूत नव्हे हा, समर्थ महिवर तो ६१॥
पुनरपि पाठविली ती, येउनि सांगे हकूच ती, " अनळा॥
जळहि घटांत निघालें, बाइ, ह्मणावें कसें तया न नळ६२॥
चुरलींहि फुलें झालीं पूर्वाऽधिक, अग्निहि न करा पोळी ॥
खिडकीहि होय मोठी येइल तसि एकहि न करा पोळी"
"तत्कृत पदार्थ कांहीं आण, कर तदर्थ जा मिपाला गे" ॥
ऐसें ह्मणतां आणी चाखाया त्याचि आमिपा लागे॥६४॥
लागे स्वमंग पल, परि तनुचें स्तोकाऽवशिष्टहि मग रसें ॥
तें सर्व भान पळवी, पळ वीर्यें पीत मिष्ट हिम गरसें ॥६५॥
सावध होऊनि ह्मणे " वोळखिला तोचि सुरस मासाचा ॥
झांकूनि रूप होसी कां लटिका?होचि सुर-समा साचा"६६॥
मग बाहुका कडे ती स्वाऽपत्यें न्यावया तिला शिकवी ॥

१ स्थान. अर्थात नल. २ अमृताचे ग्रास. ३ धैर्य. ४ मेरु पर्वतही. ५ करावयास. ६ निमित्ताला. ७ मांसाला. ८ थोडें शिल्लक राहिलेलें. ९ माधुर्यानें. १० प्यालेलें. ११ थंड. १२ विष. १३ उत्तम. रुचि. १४ हे देवतुल्या नळा. १५ सत्यरूप. याचा " होचि" याकडे अन्वय.

तीं पाहतांचि धांवे धरुनि उराशीं रडे विलासि कवी६७॥
"स्वाऽपत्य-स्मृतिनें मी झालों ऐसा" असें ह्मणे सुकवी ॥
त्या सुहृद्-प्रेम-महा- पाशांतहि सांपडोनि तो चुकवी॥६८॥
हें ऐकुनि साध्वीनें मातेकरवीं पित्यासि जाणविलें ॥
तदनुमतेंचि तया बहु विनवुनि अंतःपुरांत आणविलें॥६९
ती पाहतां धृति-मृगी- कर्णीं कटु-शोक-सिंह-हाक शिरे ॥
स्व-मनीं नळ कलिस ह्मणे"केली वर-कांति-हानि हा!कशिरे
अन्योन्य दृष्टि मिळतां शोकभरें तीहि साधि तोहि रडे ॥
विधि-हृतमति जन हरवुनि करगं अमृतफळहि साधितो हिरडे
दुःसह-निज-विरह-व्रत- कृश-तनुला देखतांचि कळवळला ॥
तीवरि शुष्यत्-सस्य- क्षितिवर घनसा दयाळु नळ वळला७२
जीनें पति-पद-पंकज- रेणु-पुढें तुच्छ लेखिला काय ॥
ती त्यासि पुसे "सुप्त- स्त्रीत्यागी पुरुष देखिला काय७३॥
पायीं भ्रमली श्रमली निजली भिजली निजाऽश्रु-नीरानी॥
धार्मिक न पाहिला तो, जो जाय असीस टाकुनी रानीं७४॥
पति निजला मग निजली तेव्हांचि प्रथम न उठली चुकली
आगं त्यागंविहित हें ? सुज्ञ मरेतोंहि फळ-हरा बुकली ॥

१ धृति (धैर्य) हीच मृगी, तिच्या कर्णांत. २ तीव्रशोक-रूपी सिंहाची हाक. ३ सुंदर कांतीचा नाश. ४ दुःखी. ५ दुर्दैवानें नष्ट झाली बुद्धि ज्याची तो. ६ हस्तगत. ७ मिळवितो. ८ असह्य अशा आपल्या वियोगांतील आचरणानें कृश झालें शरीर जिचें, तिला. ९ शुष्क झालें धान्य जीचें अशा पृथ्वीवर. १० अपराध. ११ त्याग करण्याजोगें. १२ एखादें फळ चोरणारास मृत्यूची शिक्षा योग्य काय ? असा बोलण्याचा भाव.

विटला जाणो प्रभु, कीं वरिला नर, सुरवरास न बघूनी
हें अघ, तरि न वरावें काय सुगुणगण-वरास न वघूनीं !
जळ-विरहें मत्स्यीसी मरती, कीं प्रेम दाविती बोलीं, ॥
पाहो बरी परीक्षा, नेत्रें करिती क्षणक्षणीं वोलीं ॥ ७७॥
पुण्यश्लोकें रामें सीतासी हेहि अग्निच्या कुंडीं ॥
टाकूनि पाहिली तों रागें शुकीच्या तसा इच्या तुंडीं ॥
" बहुधा या भावें ही त्यजिली स्त्री पंडितें जसी असती ॥
काळेंहि न कीं पुंण्य- श्लोक त्यजिता, जरी बरी असती'
पुण्यश्लोक ह्मणे " गे राज्य-श्री-स्त्री-वियोग-हेतु कली ॥
शत-मरण-विपत्तीसीं मतिंमति सति अति विपत्ति हे तुकली
देवि, कलि,तुझ्या शापें, बहु"कर्कोटक"विषेंहि,तळमळला
गेला पळोनि,जेणें विधुंतुदें विधु तसाचि नळ मळला८१
आलों तुजकरितांचि श्रीमति साध्वि प्रसन्न हो महिते ॥
न सती-प्रसाद-सम सुख- दायक सत्तीर्थ-वास होमहि ते ॥
दुःखांत पाडिले ऋजुं- मति दुःसंगें तुझे असु स्वर्गानें ॥
व्याधाच्या मधुरेंही हरिणाला शेवटीं असुख गानें ॥८३॥
कैंचें सुख दहनासीं स्वच्छ करो सख्य वा रण करो कै॥
तेंवि कलत्रास कितव- संग न सुख-हेतु वारणकंरोरू८४॥
जरि तूं स्वयंवरीं वर- णार परीक्षूनि गुण-सुख-निधीतें ॥

१ अनुकूळ होऊन. २ रक्तिमा. ३ कालांतरींही. ४ हे बुद्धिमति. ५ साम्य पावली. ६ राहूनें. ७ निष्कपट बुद्धिजिची, अशा हे दमयंती. ८ हंसपक्ष्यानें. ९ कापूस. १० हस्तिशुंडादंडाप्रमाणें मांड्या जिच्या ती.

युक्तचि कवि गातीलचि तुझिया निर्दोष-गुण-सु-खनि-धीतें
प्रेमें जरि खळ वरिला तरि लावी मानसीं खरखरा मे ॥
लोपविला.न अकारचि, आकारहि,नळ न हा,खर खरा गे
ऋतुपर्ण पावता म्यां केला समर्यी, न देवि मी चुकलों ॥
कळत चुकेन कसा हो? नकळत चुकतां महा-सुखा मुकलों"
भैमी थरथर कांपे, नमुनि ह्मणे, " हा उपाय आगमनीं,
वाहीन शपथ-शत मी, न धरावें यावरून आगं मनीं ८८
त्यजुनि सुर, चरण वरिले हे, कीं सौंदर्य पद-नखा परतें
चंद्रींही न, पराचें सादर पाहें न वदन खापर तें ॥ ८९॥
उत्तर तुह्मीं दिलें तें पर्णादें कळवितांचि मातेतें ॥
कथुनि असें केलें जी -सत्पदरतचित्त जें न मातें तें९० ॥
ऋतुपर्णाजवळि तुह्मी सूत-पणें जरि असाल तरि त्यातें॥
एक-दिनीं शत-योजन आणाल्चि आत्म-पोष-करित्यातें
मम शुद्ध भाव सोडुनि मति अनुसरली असेल विषमातें
तरि हेंचि दर्शनाऽमृत मारू होऊनि उग्र विष मातें ॥
प्राण्याच्या प्राणांचे पोषक वाताऽर्क-चंद्र हे असती ॥

१ दोषरहित गुणांची उत्तम खाण, अशा बुद्धीला. २ ' अ' हावर्ण लोपविला ह्म० ' अनळ' होता, तो नळ, अर्थात् तेजोहीन झाला, इतकेंच नाहीं तर तो तेजोहीन असा आकार ( आकृति ) ही लोपविला. ३ गर्दभ अविचारी. किंवा ' र, ल ' यांच्या सावर्ण्यास्तव खर ह्म० खल, असाही अर्थ होईल. ४ याच अध्यायाची ९९ वी आर्या पहा. ५ अपराध. ६ आपलें पोषण करणाराला.

आतांचि प्राणांतें सोडूतचि जरि असेल हे असती" ९३
आकाशीं वायु वदे " पुण्यश्लोका नळा, न गांजावें ॥
ऐसेंहि होय समयीं कीं स्थैर्ये[1] त्यजुनियां नगां जावें॥९४॥
परि शीलें कोण्याही व्यसनीं क्षणभरिहि सोडिली न सती
तरताशि कसा स्त्रीनें ' जरि शील-समृद्धि जोडिली नसती
असतीस सतीत्व जसें त्या श्रीमद्रामपाद्‌तामरसें[2] ॥
देवा[3], इच्याहि घ्यावें दमयंतीच्या[4] विशुद्ध-नाम-रसें"९६॥
गर्जति नभीं न केवळ भाती त्या सुर-पुरांत न नगारे॥
पुष्प-घन पडे ह्मणती गंधर्वा सुर पुरातनें न गा रे॥९७॥
दिव्यांऽबरें स्व तनुला झांकुनि, कर्कोटकासि नळ भूप॥
स्मरला जों, स्मर लाजों लागेसें प्रकटलें रुचिर रूप ९८
स्वपति-गळां पहिली श्री जों,साध्वी स्त्रीहि तों,बळेंचि पडे
ते दंपती न, डोळे, व्यर्थ विना प्रेमबोंबळें चिपडे ॥९९॥
आलिंगुनि अंकावरि घेउनि नेत्रें पुसोनि तो हातें ॥
बाष्पभररुद्ध-गळ नळ समजावी हरुनि शोक-मोहातें ॥
हर्ष इला नळ-लाभें बहु, न तसा कुमुदिनीस शशि-लाभें ॥
पुण्यश्लोक-पदें[11] हे[12] किंवा ते[13] धरि मनांत न शिला भें॥१ ॥

१ पर्वताला. २ प्रभुरामचंद्राच्या चरणकमलानें. ३ हे नळ-राजा. ४ या शब्दाचा " दमयंतीच्या " या शब्दाकडे अन्वय. ५ प्रीतीनें. ६ मावतात. ७ वृद्ध. ८ स्वरूपशोभा. ९ प्रेमरूप बुबळें. १० ज्याच्या नेत्रांतून प्रेमाश्रु वाहताहेत. व ज्याचा कंठ भरून आला आहे, तो. ११ पुण्यश्लोक नलाच्या किंवा श्रीरामचंद्राच्या पदाच्या योगानें. १२ दमयंती. १३ अहल्या.

हळु हळुचि रडत होत्या दमयंतीच्या दयाळु ज्या माता ॥
त्या मोठ्यानें रडल्या होतांचि प्रकट साधु जामाता २॥
भीम रडे, न प्रकटी पूर्वीं जो वेपमान साऽऽधि रडे ॥
केलें होतें चिंता- वाळविनें जरिहि मानसा घिरडें ३०३॥
ऋतुपर्णहि सुख पावे स्वार्थाग्रह लेशमात्र न कुलीनीं ॥
साधु-मतींनीं धरिजे पर-भोगीं द्वेष काम न कुलीनीं ३०४
नळ-दत्ताऽश्व-त्हृदय-वर-विद्येनें तोहिं सुखविला साचा ॥
झाला लाभ नळा-सम ज्यास सुगति-भोग-सुख-विलासचा
चार घटिकाहि दुःसह ज्यां, त्यांसि वियोग चार हायनें हो
हाय न होरपळविला मीन, ह्मणे अरिहि, न विरहायन हो
आधीं लीलेनें श्री- हर भैमी-ताप जिंकिला भूपें ॥
मग तो पुष्करहि, कसें हरवावें वारिराशिला कूपें ॥ ७ ॥
पुण्यश्लोकानें कीं श्रोतॄ-दुरित-तूळ-संपदनळानें ॥
गौरविला अहित-करहि पुष्कर कलि-त्हृदय-कंपद-नळानें
केलें राज्य बहु दिवस पुण्य श्लोकें नळें जसें रामें ॥

१ जांवई. २ कंपायमान. ३ हें एक पक्वान्न आहे. याला छिद्रें फार असतात. ४ पृथ्वीच्या ठिकाणीं अर्थात् सर्वांच्या ठिकाणीं लीन झालेल्यांचे ठायीं. ५ नलानें दिलेली, अश्वत्हृदयरूप श्रेष्ठ विद्या, तिच्या योगानें. ६ ऋतुपर्णही. ७ वर्षें. ८ विरहस्थान. ९ तेज हरण करणारा. १० समुद्राला. ११ श्रोत्यांचीं पापें हीच तूळसंपत् ( कापसाचे ढीग ) तिला अग्निरूप अशा नळानें. १२ कलीच्या त्हृदयास कंप देणाऱ्या नळानें.

कलि कांपतो थरथरा ज्याच्या कवि-कोटि-कीर्तितें नामें
नळ पुण्य श्लोक, तसा तूंहि; कलि, तसा सुयोधनहि; खोटा
धूर्तें पद-च्युति समा, परि या तापापरीस तो मोटा१०॥
अनुकूळा स्त्री भ्राते ब्राह्मण शतशःसमागमें वसती ॥
धर्मा, तुझी वनींची प्रमदवन-वसति-समा गमे वसती११॥
करुनि खळपराभव तूं निष्कंटक राज्य सुचिर करिसील
घे अक्षत्हृदय, पडल्या योग तसा दुष्टगर्व हरिसील"१२॥
बृहदश्व अक्षत्हृदया देउनि संध्या करावया गेला ॥
केला प्रमुदित पुण्य- श्लोक यशें धर्म चित्रसा ठेला॥३१३॥

# अध्याय ५ वा.



## सारांश.

अर्जुनाला इंद्राकडे जाऊन बरेच दिवस झाले. तितक्या दिवसांत त्याचा वृत्तांत समजला नाहीं. या मुळें धर्मराज चिंता करीत होता, तों त्याकडे लोमशऋषि आला. तो ह्मणाला, अर्जुन स्वर्गीं सुखरूप आहे. इंद्रानें तुला निरोप सांगितला आहे कीं, अर्जुन कृतार्थ झाला. त्याबद्दल तूं कांहीं काळजी करूं नको. लौकरच अर्जुनास पाठवून देतों. जयप्राप्ति होण्यास लोम ऋषि सांगेल त्याप्र-

१ कोट्यवधिकवींनीं गाइलेल्या नांवानें. २ तुल्य. ३ तुला प्राप्त झालेल्या.

माणें तीर्थयात्रा कर. अर्जुनानें ही असेंच सांगितलें आहे. मग धर्म तीर्थयात्रेस निघाला. तो प्रथम प्रभासादि तीर्थें संपादून गन्धमादनपर्वतावर गेला. तेथून नारायणाश्रमास गेला. तेथें एके दिवशीं द्रौपदीपुढें एक कमल वाऱ्याच्या योगानें येऊन पडलें. तें पाहून द्रौपदीनें भीमास तसलीं कमळें आणून देण्यास सांगितलें. भीम तीं आणण्यास निघाला. कदलीवनांत त्यास मारुति भेटला. तो वृद्ध वानराचें लहान रूप धरून भीमाच्या वाटेंत बसला होता. त्यास एकीकडे होण्यास भीमानें सांगितलें. वानर ह्मणाला, मी जराग्रस्त आहें. मला हालण्यास शक्ति नाहीं. तूं मला एकीकडे उचलून ठेवून जा. मग भीमानें त्यास उचलण्याचा यत्न केला. पण तो त्यास उचलला नाहीं. तेव्हां हा मारुतीच असें समजून भीम त्यास शरण गेला. मग मारुतीनें त्यास आपलें दर्शन देऊन अभयवचन दिलें व कमलवनाचा मार्ग सांगून तो अदृश्य झाला. तें कमलवन कैलासपर्वताजवळ होतें. तेथें भीम गेला. कुबेराचे सेवक त्या वनाचें रक्षण करीत होते. त्यांनीं भीमास प्रतिबन्ध केला. तेव्हां भीमानें त्यांशीं युद्ध करून त्यांस मारून टाकिलें. भीम कमळें आणण्यास गेल्यावर धर्माकडे कांहीं उत्पात झाले. त्यामुळें धर्मास भीमाविषयीं चिंता उत्पन्न होऊन तो सपरिवार तेथें आला. कुबेरवनाचा नाश केल्याबद्दल धर्मानें भीमास दोष दिला. मग तो पुढें जाणार, तों आकाशांत वायु बोलला, धर्मा, पुढें जाण्यास मनुष्यास अधिकार नाहीं. यास्तव तूं मागें जा. तें ऐकून धर्म पुनः नारायणाश्रमीं आला. तेथें जटासुर, ऋषिरूपानें राहत होता.

त्याचा भीमानें वध केला. मग धर्म आर्ष्टिषेण ऋषीच्या आश्रमास आला. तेथें त्यास कुबेर भेटला. तो ह्मणाला, माझा मित्र मणिमान् गर्वानें अगस्तिऋषीवर थुंकला. तेणें करून मणिमान् तत्काल नाश पावला व त्याच्याच शापानें हे रक्षक मेले. यांत भीमाचा कांहीं अपराध नाहीं. तुह्मी येथें स्वस्थ रहा. येथेंच अर्जुन तुह्मांस भेटेल. असें बोलून कुबेर निघून गेला. तसाच इंद्रही धर्मास दर्शन देऊन निघून गेला. कांहीं दिवसांनीं अर्जुन धर्मास येऊन भेटला. अर्जुनानें, अस्त्रप्राप्ति, निवातकवचवध, पौलोमादिकांचा वध इत्यादि आत्मवृत्त धर्मास सांगितलें. तेणें करून धर्म समाधान पावला.

---

ऋषि-कथित परम-दुष्कर जिष्णुतपःश्रवण करुनियां धर्म
सानुज सदार चिन्ता पावे, पावेचि ना मनीं शर्म ॥ १ ॥
द्वापि तीर्थयात्रा- फळ ज गंगात्मजा पुलस्त्य वद ॥
नें आपणही सांगुनि धर्माला धर्मसंग्रहोत्सव दे ॥ २ ॥
धौम्यहि विचार पुसतां सांगे धर्मास तीर्थयात्रा सा ॥
कवि विस्तर-भय न हरिति जरिहि हरिति भक्त भवं-भयात्रासा
तो येउनि सांगे सित- वाहचरित हरिनियुक्त लोमश तें ॥
प्रत्युत्थान जयाला द्यावें सच्छ्रोतृकर्णलोमशतें ॥ ४ ॥

---

१ व्यासानें सांगीतलेलें. २ सुख. ३ नारद. ४ भीष्माला. ५ संसार भयापासून. ६ तारक ईश्वराला. ७ अर्जुनाचें वृत्त. ८ इंद्र, प्रेरित. ९ रसिक श्रोत्यांच्या शतशः कर्णांनीं व केशांनीं. आनंदातिशयानें शरीरावर केश उभे राहतात, हें प्रसिद्ध आहे.

" धर्मा, दिव्याऽस्त्रज्ञ त्रिदशवराऽर्द्धासनस्थ वासवसा ॥
अर्जुन विलोकिला म्यां स्वस्थ तुह्मी करुनि वन-निवास वसा
शक्रें तुज कथिलें कीं "अर्जुन झाला कृतार्थ, पाठवितों॥
त्वद्धृद्गतराधासुत- भय-शल्योद्धार-यत्न आठवितों ॥६ ॥
विजयार्थ तीर्थयात्रा लोमश-कथिता, अतामसी कर गा ॥
करगा होईल श्री- कृष्णाऽमृत-सिन्धु-नाम-सीकर गा॥७॥
मज पार्थेंहि प्रार्थुनि कथिलें गा पार्थिवोत्तमा धर्मा ॥
करवीन तीर्थयात्रा चाल असें मी सहाय या कर्मा"॥८॥
चित्तांत तीर्थ-यात्रा- काम तया पुरविता प्रभुहि आला ॥
जैसा अंभोद तृषित चातक खग पसरितांचि वरि आला
सेवी पांडव सिद्धा- श्रम-तीर्थांतें तदीय-महिम्यांतें ॥
विस्तर-भयें न लिहिलें रमिकाऽनुमतें मनोरमहि म्यां तें
तीर्थें करीत गेला कीर्ति बहू ऐकुनि प्रभासाची ॥
तेणें भेटविली हो पुण्यर्द्धि नवांबुद-प्रभा साची ॥ ११ ॥
मुनि सर्व तीर्थयात्रा करवुनि ने गन्धमादन-नगातें ॥
यातें मन्मति ह्मणत्ये मानवतिल साधुपाद न, न गा तें ॥

---

१ देवश्रेष्ठ इंद्राच्या अर्ध्यासनावर बसलेला. २ इंद्रासारखा. ३ तुझ्या ह्रदयांतील कर्णभयरूप शल्य उपटून काढण्याचा उपाय, ४ सत्वगुणयुक्त. ५ कृष्णरूप अमृतसमुद्र, त्याचें नाम, हाच सीकर ( तुषार.) ६ मेघ. ७ मुखद्वाराला. ८ नवीन मेघाची कांति. पुण्यसमृद्धीला संतोषजनकत्वामुळें नवमेघकांति ह्मटलें आहे.

कठिन पुढिल पथ ह्मणउनि धर्म ह्मणे "सद्गुण-भ्रमर-बकुळा[1]
भीमा, गंगाद्वारीं वस, एका मात्र येउंदे नकुळा ॥ १३ ॥
रक्षुनि पांचाळीला सहदेवाला सहर्षि-धौम्याला[2] ॥
स्वस्थ रहा. नेतों मी त्वदनुमतें करुनि याचि सौम्याला"
भीम ह्मणे "हें गुरुला विनवा, आह्मां तिघांस न वदावें॥
अर्जुनविरह-ग्रीष्मीं[3] न जळावें त्वद्वियोगनवदावें[4] ॥ १५ ॥
चौघांसहि वाहेन त्यजितां दाटूनि कां नर-विमाना[5] ॥
शिरतां पाताळ-बिळीं दीपहि पावेल कां न रवि-माना[6]"॥
कृष्णा हांसोनि ह्मणे "छायेला[7] काय जी महायास ॥
चाला, चालेल, पहा योग्या नोहेचि हे रहायास" ॥१७॥
भेटे साधु कुलिंद-[8] क्षितिनाथ सुबाहु त्या अनन्यास ॥
परमाप्तास प्रभुवर धर्म ह्मणे 'रक्ष हा जन-न्यास[9]' ॥१८ ॥
घेउनि जाय तयाला लोमश पाजूनि पुण्य-पुंज-रसा[10] ॥
सुर-सत्कृत-बीभत्सु- प्रेक्षोत्साहहि[11] पतत्रि-कुंजरसा[12] ॥ १९ ॥

१ सद्गुणरूप भ्रमरांना बकुलपुष्प. २ ऋषीसहित. ३ अर्जुनाचा विरह हाच उष्मा, त्यांत. ४ तुझा वियोग हाच नवा वणवा, तेणेंकरून. ५ नररूप विमानाला. ६ पाताळांत निबिड अंधकार आहे. सूर्यदर्शन नाहीं. ह्मणून तेथील जनास दीप हाच सूर्य भासेल. ७ येथें द्रौपदीनें अपणाला धर्मराजाची सांवली ह्मटलें आहे. ८ कुलिंद देशाचा राजा. ९ मनुष्यरूप ठेव. १० पुण्यसमूह हाच रस. ११ देवांनीं सत्कारिलेल्या अर्जुनास पाहण्याचा उत्साह. १२ पक्षिश्रेष्ठगरुड, या सारखा.

जातां दुर्गममार्गें अश्रुतचि पदार्थ नित्य नव दावी ॥
मांगे कथा अशा मुनि गोष्टि सुधेचीहि ज्यांत न वदावी
वातें वर्षें पावे कृष्णेची गिरि-पथांत तनु कंपा ॥
रंभासी[1] पडतां ती व्याकुळ करि पांडवांसि अनुकंपा २१॥
वीजी[2] वल्कें[3] वायुजें[4] अंकीं शिर धर्म तो दयाघन घे ॥
धौम्य मुखीं जल घाली देवर्षि ह्मणे "शमोस्तु[5] ते[6] अनघे"[7]
तच्चरण अजिन-शयनीं चुरिती, ह्मणती बरी न यम तीतें
साधूंच्या दुःखित-जन-[8] हित-कृत्याऽन्य न वरी नय मतीतें
धर्म ह्मणे "बा भीमा, घे स्कंधीं, योग्य ही न गमनातें॥
निष्ठुरसा गमला हा सत्संश्रययोग्यही[9] नग मनातें ॥२४॥
भीम ह्मणे " मी ईसाहि तुजहि यमांसहि सुखेंचि वाहीन ॥
अथवा होइल आज्ञा तरि आजि घटोत्कचासि वाहीन ॥
धर्माऽनुमतें स्मरतां धाया गुरु-दास्य-पुण्य[10] जनकानें ॥
ऐके घरीं घ, टोत्कच नमनीं, तो मत्स पुण्यजेंन[11] कानें २६
धर्म नकुळ सहदेव द्रुपदसुता धौम्य भीमसेन मुनी ॥
प्रेमाऽस्त्राशी-वर्षी[12] घनसे केले घटोत्कचें नमुनी ॥ २७ ॥
भीम ह्मणे "पुत्र सुखें पावुनि गुरु[13]-दास्य-पुण्य-पर्व तरे ॥

१ केळी सारखी. २ वारा घाली. ३ वल्कलानें. ४ भीम. ५ शांति असो. ६ तुला. ७ पापरहिते. ८ दुःखित जनास हितकारक अशा कृत्यावांचून दुसरें. ९ साधुजनांस राहण्यास योग्य. १० पितृसेवेचें पुण्य. ११ राक्षस-घटोत्कच किती जलद आला हें या पद्यांत दाखविलें आहे. १२ प्रेमाश्रूंचा वर्षाव करणारे. १३ पितृसेवारूप पुण्याचा पर्वकाल.

आह्मांसि गंधमादन- नामा हो सुगम पुण्यपर्वत रे॥ २८॥
हे कृष्णा त्वन्माता चालों न शके पथीं, इला वाहें ॥
तारक तुल्य स्कंधगं गुरुमूर्ती, गंडकीशिला, बा हें''॥२९॥
पुत्र ह्मणे "भिन्न असति पंचायतनांशि काय संपुष्ट ॥
वाहो सर्वा माझा आहे नीरोग काय संपुष्ट ॥ ३० ॥
पांच तुह्मी धौम्यहि गुरु दुर्लभ मज दास्य अन्यदा साचें॥
वाहेन तुह्मां, हे मुनि 'जनु सफळ करूत अन्य-दासाचें ॥
अथवा सा देवीतें विंध्य, तसा मी इलाचि वाहेन ॥
स्वाश्रित-रक्षः कृत-भव- दुद्वहनज-सुकृतभाग लाहेन" ३२
रक्षः स्कंधीं धौम्य- प्रमुख ऋषी प्रथम बसविले, पावे ॥
शिवसा सत्संग न कां ? गरुडसखें गरळरस विलेपावे ? ॥
चक्षुर्विष अहि रक्षी अमृत-घटातें मुखीं न ओतुनि घे ॥
हारि तेजें, हेंहि तसें, शिव-शुक-सेवेशि कां न ओतु निघे॥

---

१ खांद्यावर असलेली. २ शालिग्रामशिला. ३ हें द्रय. ४ पांच देवताविशेषांचा समूह, त्यास. ५ रोगरहित. ६ पुष्ट. ७ दुसऱ्या वेळीं. ८ जन्म. मी तुह्मां पांचास वाहेन, आणि ह्या ऋषींना दुसरा कोणी वाहील, असें घटोत्कचाचें ह्मणणें. ९ त्या महिषासुरमर्थिनी देवीला. १० आपला आश्रित जो राक्षस, त्यानें केलेलें जें आपलें उद्वहन, ( स्कंधावर घेणें ) त्या पासून उत्पन्न झलेला पुण्यांश. ११ गरुडाचा सखा इंद्र, यानें ( आ०प० अ० ४ आ० ६० पहा.) १२ विषरस.१३ आंगास लावावे. इंद्रसख्यानें अमृतप्राप्तीच व्हावयाची,हें तात्पर्य. १४ चक्षुर्विष या नांवाचा सर्प. ( आ० प. अ० ४ आ. ४८ पहा. ) १५ मांजर.

कपिच्या सीता, हरिच्या की विंध्यमहाद्रिच्याहि आदिमती
देवी घटोत्कचाच्या स्कंधीं तसि होय त्या जना दिसती
शोभति घटोत्कचाश्रित- रक्षःस्कंधीं चढोनि कुरुवर ते ॥
जाणो नभीं घनाच्या साक्षाद् रवि चंद्र शुक्र गुरु वरते ॥
योगारूढ श्रीमुनि लोमश चाले पुढें, जसा अर्क ॥
अर्कद्वय अद्भुत हें हा क्षण खेचरमनीं उठे तर्क ॥ ३७ ॥
दावूनि दुरूनि हरगिरि मंदर, नारायणाश्रमीं उतरी ॥
तेथ सदा सन्निहिता गंगा भव-सिंधु-पारदा सुतरी ॥ ३८॥
अर्काभ सहस्र-च्छद सौगंधिक पद्म मारुतानीत ॥
कृष्णेपुढेंचि पडलें होय जणों तन्मुखाब्जभाभीत ॥ ३९ ॥
"ऐशींच मदर्थ तुम्ही आणा सौगंधिकें" म्हणे पतितें ॥
भीम निघे श्रुतिचेंसें मान्य तिचें सांगणें तया अति तें ४०
एकाकीही शिरतां जो जेंवि महार्णवीं न भी मकर ॥
सिंहादिकांसि भासे यम-दंडाहुनि उणा न भीमकर ॥४१॥
ज्याच्या रामयशासह सुयशासि सदा सहर्ष नाक पितो ॥
कदली-वनांत मार्गी भीमाला दे स्वदर्शना कपि तो ४२॥

१ सिंहाच्या. २ दुर्गादेवी. ३ घटोत्कचाचे सेवक राक्षस, ह्यांच्या स्कंधांवर. ४ या शब्दाचा 'स्कंधीं, या पदाकडे अन्वय. ५ योगसिद्धि ज्यास झाली तो. ६ देवांच्या मनांत. ७ कैलास. ८ समीपवर्तिनी. ९ संसारसमुद्राच्या पलीकडे नेणारी. १० उत्तम नौका. ११ सूर्यसदृश कांतीचें. १२ सहस्र पत्रांचें. १३ अति-सुगंधी. १४ वायूनें आणिलेलें. १५ द्रौपदीच्या मुखकमलाच्या कांतीस भ्यालेलें. १६ अगाध जलांत. १७ मारुति.

रुचिरहि रूप कपित्वें प्रथमचि नयनां न गोड वाटे तें ॥
पांडव सावज्ञ ह्मणे " जाऊंदे ऊठ सोड वाटेतें" ॥ ४३ ॥
वानर ह्मणे "न पथ मी देइन, जावें तुवां न या वाटे ॥
होईल घात जातां यास्तव मजला तुझी दया वाटे ॥४४॥
भीम ह्मणे " हो कांहीं पुसतो तुज कोण हात जोडून ॥
होशील व्यथित वृथा हो प्लवगा दूर मार्ग सोडून ॥ ४५॥
वानर ह्मणे "उठाया .शक्ति नसे मज जरा-व्यथा-वश मी
जाणें तरि लंघुनि जा पथ सोडाया शके न.हा दशमी"॥
भीम ह्मणे " परमात्मा व्यापक सर्वां घटीं, असें जाणें ॥
मग लंघन करुनि तुझें प्लवगा माझें घडे कसें जाणें ४७ ॥
नमतें असें तरि जसा हनुमान् लंघूनि जाय जलधीतें ॥
जातों या गिरिसहि मी लंघुनि वहु लाजवूनि खलधीतें"४८
प्लवग ह्मणे "गा साधो, हनुमान् तो कोण सांग, जलधीतें॥
लंघुनि गेला कां गा? होय कशी काय लाज खलधीतें"४९
भीम ह्मणे "तो हनुमान् मद्बंधु, तुला न ज्या,न कीशां तें
तेज, श्रुत तुजही, ज्या जग गातें जेंवि जानकीशातें॥५०॥
राम-वधू शोधाया तो अब्धि उडोनि जाय शतं-गावें ॥
जाळी लंका, न तिच्या यशापुढें सुर-पुरी-यश तगावें॥५१॥
तो एक वीर मारुति मनुजांत सुराऽसुरांत, बळकट कीं ॥
मी भीम, मज पहातां क्षणहि खळांच्या उरे न बळ कटकीं॥
कथिलें हें कळलें कीं रोंधूं ये काय सिंधु-वाट सरें ॥

---

१ धिक्कारपूर्वक. २ मर्कटा. ३ ह्मातारा. ४ तुलना. ५ वानराला. ६ श्रीरामचंद्राला. ७ शंभर योजनें. ८ अमरावतीचें यश. ९ सैन्यांत. १० बंद करण्यास. ११ सरोवरानें. १२ जाणतों.

हो दूर, मर्दिजेतो पथ-कंटक सुज्ञसदयवाटसरें ॥ ५३ ॥
चित्तीं हांसोनि ह्मणे "भीमा भय दाखवूं नको पावें ॥
मत्पुच्छ दूर सारुनि जा, साधो, दुर्बळीं न कोपावें ॥ ५४ ॥
दूर ह्मणारूं पाहे वामकरें पुच्छ धरुनि सावज्ञ ॥
गरिम-गुणें सुर-गिरि-गुरु होय भवांश-भव भीम-भाव-ज्ञ ॥
भीमबळें, विघ्नें, रघु- पतिपादांऽब्जस्थ चित्तसें, पुच्छ ॥
तिळहि न ढळे, गुरुपुढें भावबळ श्रेष्ठ, बाहु-बळ तुच्छ ५६
दोन्हीहि भागले भुज वर्षें घनसाच भीम धामातें ॥
चित्तांत ह्मणे " आली कोठुन न्हतीच भी मधा-मातें"५७
जाय शरण होउनियां तो गत-मद-गद अदभ्रदयकपिला
ज्याची लीला प्रणतांऽ खिल-वांछित-सिद्धिदा महाकपिला
जाणावया स्वरूप प्रार्थी मोक्षेच्छु-जन वृषाकपितें ॥
भीम तसा त्या हरिसा स्वयशः श्रवणेच्छु-जनतृषा कीपिंत ॥
भीमासि असें सांगे कीं " मारुति आंजनेय वीरा, भी ॥
आहें राम-गुण-रसीं, पूर्वीं होतों निबद्धधी रामीं ॥ ६० ॥

१ मार्गांतील कांटा. २ पाहिजे तितकें जड होणें, ह्या गुणानें. ३ मेरुपर्वताहून जड. ४ रुद्रांशापासून झालेला मारुति. ५ भीमाचा अभिप्राय जाणणारा. ६ श्रीरामपदीं स्थिर झालेलें. ७ भक्तिबळ. ८ यापूर्वी. ९ गेला आहे गर्वरूप रोग ज्याचा, तो. १० परम दयालु अशा मारुतीला. ११ शरणागतांला सर्व इष्टसिद्धि देणारी. १२ कामधेनु. १३ शंकराला. १४ आपलें यश ऐकण्यास इच्छिणाऱ्या जनाची तृषा. १५ अंजनेचा पुत्र. १६ अत्यंत दृढ बांधिली आहे बुद्धि ज्यानें, तो.

"यावत् स्वकथा तावत् जीव'असा पावला सुवरं दास ॥
हा रामायण सेवुनि आहे तृप्त स्मरोनि वरदास"॥ ६१ ॥
भीम ह्मणे "ज्या रूपें शत-योजन सिंधु लंघिला,गा तें ॥
दावावें आजि मला, ज्याला अद्यापि विश्व हें गातें"॥ ६२
मारुति ह्मणे "असोंदे, अत्युग्र न पाहवेल भीमा तें" ॥
भीम ह्मणे " पाहोंद्या स्पर्शेल,दया करा,न भी मातें"६३
वाढों लागे सहसा कदळी-खंडीं नभीं महाकाय ॥
त्यातें पाहुनि पात्रे काळहि भय, मग न भीम हा काय?६४
लोकांत राम-महिमा, कीं प्रेमा आपला जसा रामीं, ॥
वाढे तसाचि, योजूं दृष्टांता कां परा असारा मी? ॥ ६५ ॥
पावे जेंवि पहातां क्षय-रुद्रा रत्नसानु,कंपातें ॥
अटोपाया न पुन्हा तें लागे यत्न सानुकंपातें ॥ ६६ ॥
भीम ह्मणे"दादाजी, केली दुर्योधनें दया, वाटे ॥
हे पाय पाहतों मी कैसे?जरि लागतों न या वाटे" ॥६७॥
देवं ह्मणे "रे वत्सा, हूं, ह्मण, जैसें वधूनि अहि, तातें ॥
गरुडें पृथुकाशि, अभय द्यावें तुज म्यां, मथूनि अहितातें"
भीम ह्मणे" गज-गंड- श्रीचा हरि-नखर-तेज नवरा कीं ॥
आर्या, वहु तेजस्वी जे होती न खर ते जन वराकीं ॥६०

१ जों पर्यंत पृथ्वीवर रामकथा राहील तोंपर्यंत जीवंत रहा. २ उत्तम वर. ३ वर दात्या रामाला. ४ विशाल शरीराचा. ५ दुसऱ्या. ६ खोटया. ७ मलयकालच्या शंकराला. ८ रत्नें आहेत शिखराचे ठायीं ज्याच्या तो मेरु. ९ तें शरीर. १० सदय मारुतीला. ११ मारुती. १२ या पदाचा 'गरुडें याशीं अन्वय. १३ मुलाला. १४ शत्रूला. १५ कठोर. १६ क्षुद्र प्राण्यांवर.

तूळीं तेजस्वि-कराऽनुगृहीत द्युमणिकांतसा आर्या ॥
हा त्या तुच्छीं मिरवू तेज, प्रभु तूं न योग्य या कार्या"७०
आलिंगुनि ह्मणे " बा, हो दुःसह तूं नराऽमरा जा गा ॥
शब्दें साह्य करिन मी परि चित्तांतून रामराजा गा" ७१
सांगुनि सौगंधिक-वन-पुष्करिणीच्या सुनीतिच्याहि पथा
आटोपी मूर्तिमाति मारुति, हा कविहि तद्विशाल-कथा७२
सौगंधिक-पुष्करिणी कैलासाच्या समीप पाहूनी ॥
हर्षे पांडव, तीही, नेला गुण दाखवूनि ग्राहूनी ॥ ७३ ॥
तद्रक्षक धनदाऽनुग राक्षस धर्माऽनुजासि पाहूनी ॥
"तूं कोण"असें पुसती तत्कृत-धर्षण मनीं न साहूनी॥७४
" सौगंधिकार्थ आलों धर्म-नृपति-बंधु भीम मी आहें ॥
व्हा दूर, पळा, तोंडें झांका, करितां कशास रे आ हें"
राक्षस ह्मणति " पहातां काय ?अरे या खळा न राखावें
क्षणभरहि मेहदतिक्रम करित्या सुविशृंखळा नरा खावें"॥
"आधीं क्रोध-वशांला युद्धीं उत्साह, परम भी मग, दे ॥
ऐसें करीं ह्मणे श्री-काळीहि मनांत,'साधु भीम गदे, ॥
आधीं हरिसा क्रीडा अरि- हरिण-चमूंत भीमसेन करी ॥
मग त्या नलिनींत रमे एकहि जैसा सभीमसेन करी॥७८॥

१ कापसावर. २ सूर्यकिरणांनीं ज्यावर अनुग्रह केला तो. ३ सूर्यकांतमणीसारखा. ४ हा भीम. ५ मनुष्यांस व देवांस. ६ कमलवन उत्पन्न होण्याचें स्थल. ७ कुबेरसेवक. ८ त्यानें केलेला उपमर्द. ९ थोरांची अमर्यादा. १० अमर्याद मनुष्याला. ११ क्रोधांध राक्षसांना. १२ भयंकर सेनेसहित.

जरि पावले बहु करुनि भीमाशीं आंहवा[1] निधन[2] दास ॥
हत-शेष-मुखें[3] कळतां न गमे प्रभु-भाव-हानि[4] धनदास ॥७८॥
इकडे धर्म ह्मणे "हे कथिती उत्पात भावि[5] मी मातें ॥
नकुळा सहदेवा व्हा सिद्ध, करा सावधान भीमातें ॥८०॥
मज तद्दर्शन तैसें वृद्धां पितरांसि जेंवि तोकवच[6] ॥
वद देवि[7] दर्षित कोठें ? केला काय स्वकरग[8] तो कवच"॥
कृष्णा सांगे "उडवुनि सैगंधिक-पद्म आणिलें वातें ॥
व्हावीं असीं असें मी वदल्यें दावूनि यांशि देवा तें, ८२
त्या वरि न देखिले ते, दाखविलें म्यां कशास अगई! तें॥
अतिकाठिना हे वाटे हीरांचाही[9] नमील[10] अगं[11] ईतें[12]" ॥८३
धर्म ह्मणे "रक्षील त्वद्व्रत, झालीस घाबरी कां गे ॥
हें वृत्त लोमशाला, तैसेंचि घटोत्कचाशि, तो सांगे॥८४॥
हे मुक्तिची विशाला[13] न रुचे आह्मांशि साविना[14] शाला[15] ॥
याच्या नाशा भीतों, भ्यालों न तशाहि त्याविनाशाला[16]
भीम-ह्रदाभवि अह्मां यादां[17] घायासि तृप्ति परमा न्या ॥
मान्या उपकृति[18] न परा, सिद्धि बुधा, जेंवि हरिस[19] न रमान्या[20]

१ युद्धाला. २ मृत्यु. ३ मरून राहिलेल्या सेवकांच्या मुखानें. ४ प्रभुत्वाचा नाश. ५ पुढें येणारें. ६ बालभाषण. ७ हे द्रौपदी. ८ आपल्या हस्तगत असलेला. ९ हिऱ्यांचा. १० नमस्कार करील. ११ पर्वत. १२ ह्या द्रौपदीला. १३ मोठी. १४ भीमा वांचून. १५ गृह. १६ द्यूतांतील सर्वस्वनाशाला. १७ जलचरांना. १८ उपकार. १९ श्रीविष्णूला. २० लक्ष्मी-वांचून इतर.

नेला बंधु जवळि नृप, जाणो होता नसेचि तो नेला ॥
मुनिसिद्धिला न दुष्कर किमपि न त्या यातुधान-सेनेला[1] ॥
धर्म ह्मणे "भीमा हें ईश्वर-सख-सैन्य-हनन[2] अनुचित रे ॥
न तरेल महल्लंघनें- कर्ता[3] तो एक वायुजनुचि[4] तरे ॥८८ ॥
श्री-रामायण-कृतिसी ती दिव्या अमृत-रसवती नलिनी ॥
बहु दिवस सेविली हो त्या धर्म-प्रमुख-सर्वसाध्वऽलिनीं[5] ॥
धर्म ह्मणे "भीमा ज्यां राज्यश्री स्पष्ट लेखिली असती[6] ॥
निवती बहु दृष्टि सख्या अलका[7] जरि काय देखिली असती"
तों गगनीं वात वदे " धर्मा, येथूनि वर्त्म[8] जें पर[9] तें ॥
न नरोचित, मर्यादा न विलंघीं, चित्त आवरीं, परतें[10]९१
जा आर्ष्टिषेण-मुनिच्या स्थानीं तूं गंधमादनीं आधीं ॥
तेथूनि धनद-फाल्गुन- दर्शन-सुख-कार्य-सिद्धिला[11] साधीं"९२
परतोनि धर्म आला त्या श्रीनारायणाश्रमीं[12] राहे ॥
तेथेंहि विघ्न बाधे सादर गावें असेंचि तें आहे ॥ ९३ ॥
आश्रय करूनि होता दुष्ट जटासुर धरूनि ऋषितेतें[13] ॥
जाणे न धर्मराजा, न घटोत्कचही न अन्यऋषि ते तें९४ ॥
भीमघटोत्कच नसतां कृष्णा-सहदेव-नकुळ-धर्मांतें[14] ॥

१ राक्षसांच्या सैन्याला. २ शंकराचा मित्र कुबेर, त्याच्या सैन्याचा नाश. ३ थोरांची अमर्यादा करणारा. ४ वायूपासून जन्म ज्याचें तो, मारुति. ५ धर्मादि सर्व साधुरूप भ्रमरांनीं. ६ व्यभिचारिणी. ७ कुबेरनगरी. ८ मार्ग. ९ अन्य. १० मागें फीर. ११ कुबेर व अर्जुन यांचें दर्शनसुख, हीच कार्यसिद्धि, तिला. १२ बदरिकाश्रमांत. १३ ऋषिपणाला. १४ द्रौपदी-इत्यादिकांना.

पळवी करी दशमुखा- द्यखिल-कपटि-मर्त्यऽशक्य-कर्मातें
त्यासि ह्मणे धर्म " पळ, प्रेक्षक मार्गी न भीम हो तूतें ॥
तो वांचेल कसा रे जो खळ-मूषक न भी महोतूतें "९६ ॥
भीमाच्या, मन ठेवी धर्म, जसें त्रिष्णुच्या, इभ स्मरणीं॥
प्राणव्यसनीं पावे दे.अभय खळा करूनि भस्म रणीं ९७
वायूक्तपथें गेला त्याचि मुनिवराश्रमासि मग धर्म ॥
दे आर्ष्टिषेण आश्रय तेथें निःसीम पावला शर्म ॥ ९८ ॥
तेथेंहि भीम कृष्णा- वचनें त्या गिरिशिरीं बळें चढला ॥
मथिलें धनदबळ रणीं कळतां कोपें कुबेर बहु कढला ९९
जाय पुन्हा त्र्यंबर्क-सख- भट-मथनें करूनि आर्वे रायाचा
योजी सामोपाय द्रुत जाउनि त्यासि आवरायाचा१००॥
इतक्यांत श्रीदहि ये फार निवे देखतांचि चवघांस ॥
दृष्टिसि संतचि देती अमृताचे न रसनेसि चव घांस ॥१॥
नमिला पाण्डुसुतांनीं झाला श्रीद प्रसन्न सुजनकसा ॥
मदय-प्रभु-प्रसादा पात्र न होईल मर्त्य सुजन कसा ॥ २॥
धर्मासि ह्मणे " साधो, संकोच धरूं नको मनीं कांहीं ॥
फळ भोगिलें महा-मुनि- शापाचें आमुच्या अनीकांहीं॥३॥

---

१ रावणादि सर्व कपट्यांच्या बुद्धीला अशक्य अशा कर्माला. २ दुष्ट उंदीर. ३ मोठ्या बोकोबाला. ४ गजेंद्र. ५ वायूनें सांगीतलेल्या मार्गानें. ६ आर्ष्टिषेणाच्या आश्रमाला. ७ सुख. ८ शंकराचा मित्र कुबेर, याचे वीरांच्या नाशानें. ९ धैर्य. १० लौकर. ११ कुबेर. १२ जिभेला. १३ सज्जन पित्या सारखा. १४सैन्यांनीं.

भीमा, अगस्त्यमुनिवरिं मत्सरखमणिमान् महामदें शुकला
मुकला स्वजीवना तो संसर्गी परहि जन, जरि न चुकला
आला स्व-पितृ-गृहाला, स्वस्थ रहा, जन्म धन्य लेखाल
येथेंचि अर्जुनाला, तज्जनका जिष्णुलाहि, देखाल॥ ५ ॥
धर्मा, भजेल पुनरपि तुजचि त्वदय-वल्लभा विशंक रसा"
ऐसें वदोनि गेला जो जाणे भूत भावि शंकरसा॥१०६॥
स्व-सदार-बंधुलोचन- चिर-तृषित-चकोर-पारणा व्हाया॥
प्रकटे नरचंद्र ह्मणति मुनि अरि-धैर्याब्जवारणाह्वा या॥ ७ ॥
त्या तद्दर्शन-लाभें सुख तें अधना न रत्न-निधि-लाभें ॥
सद्दर्शनलाभाला न खळाचें, फार रत्ननिधिला भें ॥ ८॥
शक्राहि दर्शन देउनि धर्म-नृपाला ह्मणे"अगा साधो"॥
स्थैर्यें श्री कीर्ति तुज,न तसि सुर-मणि-संश्रया अगा साधो
स्वरतासि तामसी धृति, दे,तसिच निकाम राजसी,ताप॥
जो सात्विकीय विजयी तो साक्षाद् रामराज सीताप१०
आलापा शिकवितसे तोष, इतर साधुच्या विलापा हें ॥
जाणुनि दिव्यास्त्र-कर त्वद्दासा अर्जुना दिला पाहें"११

१ इंद्राला. २ पृथ्वी. ३ आपले स्त्रीसहित बंधूंचे नेत्ररूप तृषित चकोर, त्यांस भोजन. ४ अर्जुनरूप चंद्र. ५ शत्रूचे धैर्यरूप कमलाचा गज, हें नांव ज्याचें, अशा अर्जुना. ६ देव आणि रत्नें यांना आश्रय ज्याचा, त्या. ७ मेरुपर्वताला. ८ आत्मकार्यतत्पर मनुष्याला. ९ तामसी धृति ह्म० अज्ञानमूलक धैर्य. १० अत्यंत. ११ राजसी धृति ह्म० विषयप्रीतिमूलक धैर्य. राजस व तामस धैर्यापासून दुःख होतें. १२ तोषाहून इतर, दुःख. १३ दिव्यास्त्ररूप हस्त.

करुनि समाधान असें हरि जाय, तयावरि स्व भावांतें ॥
धर्म पुसे वृत्त, कथी तो सकळहि त्या शुचि-स्वभावांतें ॥
सांगे स्वतप, किरात- प्रभुदर्शन, खळ-वराहवध-युद्ध ॥
भगवंत्प्रसाद, सद्वर, पाशुपताऽस्त्रादि-लाभ, जो शुद्ध॥१३॥
लोकप-दत्ताऽस्त्र-कथा सांगुनि त्यांचीं विशुद्धतुरग मनें ॥
गीतें हरिण-कुळेंशीं, मोही, कथितें महेंद्र-पुर-गमनें॥१४॥
स्वमुखें अर्जुन कथितां हरि-दत्ताऽर्धासनादि बहुमान ॥
खालीं घाली केवळ न परांची, आपुलीहि बहु मान १५॥
वर-दर्पित कोटित्रय सुर-रिपु वधिले निवातकवच रणीं ॥
पार्थ ह्मणे "या विजयीं न मन परम-मुदित, आजि तव चरणीं
पौलोमकाल केय स्वरहित कामगं-हिरण्य-पुर-वासी ॥
वधिले पाशुपताऽस्त्रें भ्यालों तद्दार-शोक-कुरवासी ॥१७॥
भ्यां या विजयें न मनीं, त्वदहित-विजयेंचि फार हरिखावें
स्वागस्करगजमौक्तिक कीं मलसाचें ह्मणेल हरि खावें१८
त्वद्विरहें शक्रार्धा- संनगाहि नव्हताचि हा बरा नाकीं ॥
बाटे क्षणक्षण असें कीं चिंतुनि ताप घाबराना कीं॥१९॥

१ मूकदैत्य-वराहरूपी-त्याचा वध. २ शंकराची कृपा. ३ दिक्पालांनीं दिलेल्या अस्त्रांची कथा. ४ शुभ्रवर्ण अश्व ज्याचे तो अर्जुन. ५ सांगितलेलें. ६ अमरावतीप्रत गमनानें. ७ इंद्रानें. दिलेले अर्धासन इ. ८ स्वर्गाचे शत्रु. ९ इच्छे प्रमाणें गमन करणारे. १० त्यांच्या स्त्रियांच्या कुत्सित शब्दाला. ११ आपला अपराध करणाऱ्या गजाचें मौक्तिक. १२ इंद्राच्या अर्धासनावर बसणारही. १३ घाबरत नाहीं ना.

ह्मणवित होते स्वर्गी- ही पांचहि हाय!वत्सर मला हो ॥
सुरभीचा तत्स्तन्ये- तरसुरसीं काय वत्स रमला हो"॥२०
धर्म ह्मणे "बा वत्सा, झालों कृतकृत्य साधिली महि म्यां
मी श्रीचतुर्भुजाच्या विजयिंचतुर्बंधु पावलों महिम्या२१॥
गुरुदत्ताही सिद्धि- द्वारीं त्या प्रभुविना किलीं लाजे ॥
ऐसें ते साधु ह्मणति जाणति वरदा पिनाकि-लीला जे ॥
या नेत्रांनीं कीं ती श्रीमूर्ति विलोकिली अहोभाग्यम् ॥
स्पष्टः सतबत् नियुद्धे ब्रुवते श्रुतयो महन्महोभाग्यम्२३॥
काळाधीन शतक्रतु, शिव-सेवक सत्य,' पांडवा, सवते ॥
किति शक्राऽर्धासन तें, सतत अमितसत्यपांडवासवें ते॥
जे लाख रुंद माया- मय वेदसुरांऽरि लाख वावें गा ॥
तमाशकास्त्र-कौतुक मजला त्वां आजि दाखवावें गा" ॥
अर्जुन करी उपक्रमें तों पावे रत्नसानु कंपातें ॥
वारिति सुरवर त्यातें त्रस्ताऽखिल-सत्व-साऽनुकंपातें ॥
तेथुनि धर्म फिरे कीं बंधुकथित हित अमान्य न करावें॥
वनवासीं दश गेलीं, तें त्या बारांत वर्ष अकरावें ॥ २७ ॥

---

१ तिच्या दुग्धावांचून इतर मधुर रसांत. २ पृथ्वी. ३ श्रीविष्णूच्या. ४ प्रतापी चार बन्धु ज्याचे तो. ५ गुरुदत्ताही किली त्या प्रभुविना सिद्धिद्वारीं लाजे. ह्म० गुरुनें मोक्षप्राप्तीची युक्ति सांगितली, तरी हृदयांत प्रभुमूर्ति असल्यावांचून सिद्धि होत नाहीं. ६ श्रीशिवमूर्ति. ७ अहा हा! केवढें सुदैव हें!! ८ यं श्रुतयो ब्रुवते, स महन्महोभाग्, नियुद्धे स्पष्टः जात बतः-ज्याला वेद वर्णितात, तो ब्रह्मानंदानुभव घेणारा, बाहुयुद्धांत प्रकट झाला; अहा हा! ९ नश्वर. १० शाश्वत. ११ अनंत ब्रह्मांडांचे इंद्र. १२ वेद व देव यांचे शत्रु. १३ आरंभ.

# अध्याय ६ वा.



## सारांश.

पाण्डव गन्धमादन पर्वतावरून परत येऊन हिमालयांतील यामुन पर्वतावर राहिले. तेथें भीम वनांत शिकारीस गेला असतां, त्यास एका मोठ्या अजगरानें धरिलें. त्यास भीमानें "तूं कोण" असें विचारिलें असतां, त्यानें सांगितलें कीं, मी नहुष आहें. मी अगस्तिशापानें अजगर झालों. "तुझ्या प्रश्नांचीं उत्तरें देणारा तुला भेटेल तेव्हां तूं या शापापासून मुक्त होशील" असा अगस्तीनें मला उच्छाप दिला आहे.

भीमास वनांतून येण्यास वेळ लागला. व कांहीं उत्पातही झाले, ह्मणून धर्मास फार चिंता उत्पन्न होऊन तो भीमाचा शोध करीत तेथें आला. अजगरानें विचारिलेल्या प्रश्नांचीं उत्तरें धर्मानें दिल्यावर नहुष शापमुक्त झाला व तो स्वर्गास निघून गेला. धर्मही भीमासह आपल्या आश्रमास परत आला.

मग धर्मराज सपरिवार काम्यकवनांत आला. तेथें श्रीकृष्ण सत्यभामेसह त्यास भेटावयास आला. कुशलप्रश्न झाल्यावर श्रीकृष्ण धर्मास ह्मणाला. तुह्मीं उत्तम प्रकारें तीर्थयात्रा केल्या. अर्जुनही शस्त्रास्त्रविद्येंत प्रवीण झाला. आतां तुमच्या सारखे पुण्यवान व पराक्रमी कोण आहेत? तुमचे शत्रु नष्ट झाले असें

तुह्मी समजा. मग श्रीकृष्ण द्रौपदीस भेटला. तिला कुशल पुसलें. व तुझे प्रतिविंध्यादिपुत्र खुशाल आहेत. ते प्रद्युम्नाजवळ शस्त्रास्त्रविद्या शिकत आहेत असें सांगितलें.

त्याच समयीं तेथें मार्कण्डेय व नारद हे दोघे आले. मार्कण्डेयानें ब्राह्मण व क्षत्रिय यांचें माहात्म्य तसेंच पतिव्रतामाहात्म्य व दुसऱ्या कांहीं कथा सांगितल्या. तेणें करून सर्वांस फार सन्तोष झाला

मग सत्यभामा द्रौपदीस भेटली. ती ह्मणाली, मला एका पतीला वश करितां येत नाहीं. आणि तुला हे पांच पति कसे वश करितां आले हें सांग. द्रौपदी हांसून ह्मणाली. पति हा परमेश्वर समजून त्यास कधींही राग येणार नाहीं• अशा रीतीनें वाग व मदमत्सरादि विकारांस वश न होतां अनन्यभावें पतिसेवा कर. ह्मणजे पति तुला वश होईल.

मग श्रीकृष्ण पांडवांचा व द्रौपदीचा निरोप घेऊन द्वारकेसनिघून गेला.

**गेल्या पथेंचि होउनि रक्षः स्कंधाऽधिरूढ ते आले ॥**
**हिमगिरि-वरप्रदेशीं वसतां यामुन-नगीं सुखी झाले ॥१॥**
**तेथें भीमासि धरी बळवान् नग-कुहर-गत महाऽजगर ॥**
**भय-विकळ तद्वपु गमे दववहनें जेंवि वेष्टिलें नगर ॥ २ ॥**
**भीम तयासि पुसे "तूं कोण बळी करिशि काय हा कवळ**
**मद्गति हे. अन्याचें येथें मारील काय हाक बळ ॥ ३ ॥**
**सर्प ह्मणे "भीमा म्यां बहुधा स्वयशें सलज्ज शिंबि केला॥**
**परि वाहविता झालों विप्रांकरवीं बळें स्वशिबिकेला॥ ४॥**

१ पर्वताच्या गुहेंतील. २ मोठा अजगर. ३ भयानें व्याकुळ ४ त्या भीमाचें शरीर. ५ अरण्यांतील अग्नीनें. ६ ग्रास. ७ ३। सूर्यवंशीय राजा. ८ नेवविणारा. ९ आपल्या पालखीला

गमलें मज उद्धतपण सुखद, जरि विषापरीस अहिमंहि तें॥
आलों अगस्त्यमुनिच्या शापें होऊनि उग्र अहि मंहितें॥
भीमा, त्वत्पूर्वज मी झालों होतों महेंद्र,परि मोटे॥
मारक, न पर, अनुभवें जाणे हा नहुष, बहु षडरि खोटे॥
ज्यां पोसावा खाउनि सुगुण सुरसमान लेंकरूं काय॥
बापा, कर्म असें हें दैवाला मानलें करूं काय? ॥ ७ ॥
"त्वत्प्रश्नाचें उत्तर देता जो तो करील तुज मुक्त" ॥
हें त्या श्रीमन्मुनिचें ज्यां जतन मनांत ठेविलें उक्त ॥८॥
भीम ह्मणे" बा सर्पा, लेशहि नाहींच मृत्यु-भी मातें ॥
बंधु मरतील बहुधा झाला ऐकोनि मृत्यु भीमातें ॥ ९ ॥
शोकें मरेल माता मरतां न करूनि भीम भीम-रणं ॥
दे वीरसूसि अपयश पुत्राचें तसि न भीमभी मरण" १०
पाहुनि उत्पात पुसे आधीं भीमासि, धर्म तो ज्याला ॥
याचीच त्यासि चिंता जेंवि धनाचीच फार लोभ्याला ११
कृष्णा ह्मणे" किती मी? बहु रमवितसे तया अरण्यांनी ॥
ज्यां सांभाळावें किति? ज्या भाळावें तुह्मी शरण्यांनी" १२॥
" वत्सा धनंजया, त्वां पांचाळी आत्मकीर्ति लक्षावी ॥
दक्षां वीरवरा, हे माझ्या आज्ञेपरीस रक्षावी" ॥ १३ ॥
धर्म कृपींस ह्मणे " श्रित- रक्षण आंगें कराल, करवाल, ॥

---

१ उष्ण. २ या पदाचा 'शापें' याकडे अन्वय. ३ कामादि सहा शत्रु. ४ देह. या पदाचा पोसावा, याकडे अन्वय. ५ तुमुलयुद्ध. ६ वीरमातेला. ७ भयंकरभीति ८ महारण्य. ९ वश व्हावें. १० हे समर्था.

तुमचा आशीर्वाद प्रत्यूहांऽतक कराल करवाल ॥ १४
यम हे माझे डोळे जपतों यां तेंवि या न डोळ्यांतें, ॥
त्यजुनि विमानें ज्ञाता वरुनि करिल केंवि यान डोळ्यांतें।
या डोळ्यांचें रक्षण तुमच्या व्रत होय पादपात्यांचें ॥
जें श्रित असेंचि करणें इष्ट सकळ देवपादपा त्यांचें" ॥१६।
जाउनि सधौम्य धर्मे द्रुत अहि-कुहरी-समीप मार्गानें ।
भीम निरखिला जैसा नंदें धरिला स्वसूनु नागानें ॥१७।
धर्म ह्मणे "रे वत्सा, केला कुरुवंश-घात सापानें ॥
त्वद्व्यसनदर्शनें बहु ताप, न विषवह्निच्या तसा पानें १८।
विपरीतचि हें, गिळिला नागानें गरुड कीं, अगा धासा,
या शोषाया केला हा, जैसा घटजकर अगाधा सा" १९
भीम ह्मणे "आर्या, हा ह्मणतो 'मी नहुष' बळनवल याचें
दुर्मोच्यकाळपाशा- सम; याच्या होय बळ न वळयाचें २०
धर्म ह्मणे "मत्पूर्वज नहुप तुह्मी काय, जी, वदा नातें ॥
घ्या मजपासुनि दुसरें भोजन, द्या यासि जीव-दानातें २१
सर्प ह्मणे "उगळावा स्वनियतिनें भरविला न सुग्रास; ॥

---

१ विघ्ननाशक. २ भयंकर. ३खड्ग. ४ वाहन. ५ डोळी'या नांवाचें वाहन. ६ पाद हींच, पातीं ह्म. नेत्रपटलें, त्यांचें ७ कल्पवृक्षा. ८ सर्पाच्या बिळाजवळ. ९ या पदाचा "जाउनि" याकडे अन्वय. १० कृष्णपित्यानें. ११ आपला पुत्र. १२कालियसर्पानें. १३ अगस्त्यऋषीचा हात. १४खोल अशा. १५ त्या समुद्राला. १६ शक्तीचा चमत्कार. १७ वेंटाळ्याचें. १८ आपल्या दैवानें.

खाइन उद्यां तुजहि, जा, बहु विनवावें तुवां न उग्रास २२
मत्प्रश्नाचें उत्तर देशिल तरि मात्र यासि सोडीन ॥
मी शापमुक्त होउनि तुज निज-कुलजासि हात जोडीन"॥२३
राजा ह्मणे" पुसा मी जोडितसें हात हे तुह्मा,'तारा ॥
कोणाहि कुळांत नसो निज-बाळक-घात-हेतु ह्मातारा"२४
सर्प ह्मणे" ब्राह्मण तो ' कोण? कसा? वेद्य काय? वद राया
मिळतां साधूक्ताऽमृत- फळ मी सेवूं कशास बंदराया"२५
धर्म ह्मणे "कथितों मी, स्ववचाला जरिहि तूंहि जपशील
तोचि ब्राह्मण, जेथें क्षांति दया दान सत्य तप शील;२६
वेद्य तरि परब्रह्मचि, न स्पर्शे जेथ मृति-जनन-शोची ॥
ज्यांतें पावोनि पुन्हा संवर्तशतींहि कृतिजन न शोची"२७
एवंविध अन्योन्य प्रश्नोत्तर होय अमृत-वर्ष तसें ॥
सु-श्रोतृ-वक्तृ-संगम- सम घन न ह्मणेल अमृत वर्षतसें ॥
सद्वापणचि पात्रे शापापासून नहुष सुटकेला ॥
साधुचि अमृतकर सदा यासचि कविनीं स्वपाणि-पुट केला
टेवी यशोर्थ कंठीं, उरवी लोकीं न, जेंवि अज गरतां ॥
सत्संगजय ग्रंथीं दावी, नहुषीं न तेंवि अजगरता ॥ ३० ॥
नहुष जसा स्वर्गाला गेला पावोनियां स्वभावाला ॥

१ आपल्या बाळकाच्या नाशास कारण. २ जाणण्यास योग्य. ३ साधूचें भाषण हेंच अमृताचेंफळ. ४वोगाला. ५आपल्या वचनाला. ६ मरण व जनन हीच ज्वाला. ७ ज्या ब्रह्माला- ८ शतशः प्रलयांमध्यें देखील. ९ ज्ञाना. १० उत्तम श्रोता व वक्ता ह्यांच्या संगतीसारखा. ११ हस्तांजलि. १२ शंकर. १३ विषत्वाला. १४ सत्संगतीचें माहात्म्य वर्णिलें तसें नहुषाच्या अजगरपणाचें महत्त्व वर्णिलें नाहीं. हा भाव. १५ आपल्यापूर्व रूपाला.

धर्महि निजाश्रमाला पावोनि तसाचि त्या स्व भावाला
ऋषि ह्मणती "बा भीमा, ऐसें साहस नको करूं, दे हें॥
तुजवीण आमुचीं हीं निर्जीवेंशींच भासती देहें ॥ ३२ ॥
तेथूनि काम्यकीं जों आला तों समुनिजन अजांतारी ॥
तों प्रभु भेटाया ये पडतां मोहांत जो अजा तारी ॥ ३३॥
पांडव ह्मणेन चातक, परि घन हरि, वीज सत्यभामा ती
न ह्मणेन, त्यांपुढें, घन- शंपांची होय सत्य भा माती ॥
अंकें जैशीं शून्यें सद्यः कार्यक्षमें, न तीं अन्यें, ॥
केलीं पांडवें-देहें त्या आद्यें सगुण-विग्रहें धन्यें ॥ ३५ ॥
ब्रह्मादि साधु योगी ज्याच्या पद-भक्तिच्या पथीं शिरतो॥
धर्माच्या, भीमाच्या, ठेवी पायांवरी स्वयें शिर तो ३६॥
आलिंगिला प्रभूच्या भुज-भुजगांनीं किरीटि-पाटीर ॥
बहु कांपविता झाला जाणों त्याचा वियोग हा टीरें ३७॥
ऐसे धन्य पृथेचे मात्र न, सुत वं दितेहि माद्रीचे, ॥
गंगाधर-प्रिय-सखहि झाले, केवळ न ते हिमाद्रीचे ॥३८॥
गंगाह्रदें करावे मरणोत्तर सुर-समान-वपु न्हाते ॥
जे हरि-नति-रस मुदित न ह्मणति सुधा सुरस मानव पुन्हा ते

१ धर्म. २ ब्रह्मदेवाला. बृहद्दशम अ० १३--१४ पहा. ३ मेघ व वीज यांची. ४ कान्ति. ५ अंकानें. ६ तत्काल कार्याविषयीं समर्थ. अंकावांचून नुसत्या शून्यास कांहीं किंमत नाहीं. असा भावार्थ. ७ पांडवांचीं शरीरें. ८ आदिपुरुषानें. ९ गुण-विशिष्ट शरीर धारण करणाऱ्या. १०अर्जुनरूप चंदन. ११ कुछा. १२नमन करणारे. १३शंकराचे प्रियमित्र. १४देवसदृश शरीराचे. १५ स्नान करणारे. १६ हरिनमनरूप रसांत समाधान पावलेले.

भीमा कृष्णा, गंगा- यमुनाशा भेटल्या अनादि-सत्या ॥
साक्षात् लक्ष्मी गौरी ऐशा झाल्याचि त्या जना दिसत्या
कुशलप्रश्नें निववुनि देव ह्मणे “ हाचि धन्य वासर हो ॥
सद्दर्शन सुसर, न पर, मानस वा थोर अन्य वा सर हो॥
अंतर्बाह्य निवालों तुमचीं अवलोकितांचि पंच मुखें ॥
वाटे मनासि दर्शन दिधलें मज काम्यकांत पंचमुखें ४२॥
प्रथमचि तुझी तुळा. शत- जन्मेंहि सुदुर्लभा परा सुकृतें ॥
संप्रति तव कर्में पर- कर्में जीवत्कृतें परासुकृतें ॥ ४३ ॥
फिरलाशि उद्धराया तीर्थांतें, तूं न मज्जन कराया ॥
सच्चरण ह्मणति आर्धी पुण्यर्धी हो नमज्जन, करा या॥४४॥
आतां पुण्यश्लोका काय तुजपुढें टिकेल खळ-बळ तें ॥
त्वद्-भुज-घटज-स्मरणें अरिसिंध्वंतर उदंड खळवळतें४५॥
खद्योत व्योम-पर्थी भानुपुढें काय देखिले टिकले ॥
त्रिनयनभालेंदुपुढें सरितल सित रक्त रेखिले टिकले ४६॥
नगरी मज, शंभूची इंपुधि गमे, जींत सिद्ध यादव ती ॥

१ सत्यभामा व द्रौपदी-ह्या दोघी आदिमाया होत. २ दिवस. ३ उत्तम सरोवर. ४ काम्यक वनांत. ५ श्रीशंकरानें. ६ प्रथमचि तुझी तुळा ( तुलना करा. ) परा, शतजन्में हि दुर्लभा सुकृतें, परकर्में, परासुकृतें तवकर्में, संप्रति जीवत्कृतें. दुसऱ्यास, शतजन्मांमध्यें दुर्लभ अशा तुझ्या पुण्यकर्मानें, शत्रूच्या कर्मानें मृतप्राय केलेलीं तुझीं कर्में सांप्रत जीवंत केलीं आहेत. ७ पुण्यसमृद्धि. ८ नमज्जन हो, आर्धी पुण्यर्धी करा या, असें सच्चरण ह्मणती. ९ तुझे भुजरूप अगस्तीचे स्मरणानें. १० शत्रुसमुद्राचें त्दृदय. ११ शिवाच्या मस्तकावरील चंद्रापुढें. १२ भाता.

सिंधूच्या पुरतील न  वृष्णयुत्साहां लिहावया दवती॥४७॥
संपत्ति शक्ति विद्या  सत्साहित्येंचि होय अनपार्था' ॥
यास्तव कृष्णि बहूत्सुक  जोडिंदे भव्य कीर्ति-धन पार्था ॥
धर्म ह्मणे "श्रीकृष्णा  भुललों सेवूनि बोल कानाहीं ॥
बा तुज वेदाहि लाजे  ज्यासम कोठेंचि बोलका नाहीं ४९
स्तुति न दिल्या त्वां आशी- राशी श्रित-लोक-देव-कल्पतरो
प्रभुजी, तुझ्या प्रसादें  व्यसनीं हा दास तोककल्प तरो ॥
कृष्णेला कृष्ण ह्मणे " सखि बरि आहेसि कीं, असे नातें
पुस न पुसहि मज ह्मणतें  काय करूं क्षण उगें असेना तें
पूर्त बहिश्चर असुसे  प्रतिविंध्यादि त्वदीय सुत मा जे ॥
त्यांहीं देवि सुभद्रा- गृह षण्मुख-मातृ-सदन-सम साजे ॥५२॥
प्रद्युम्नें शस्त्रास्त्रीं  पटु केले, शिकति नित्य त्याजवळ ॥
आवडलें हेंचि तयां  बहु, तैसें देवि तें न आजवळ"५३॥
सांत्वन कृष्ण करी तों  ये मार्कंडेय मुनि पहायास ॥
तिनुक्यांत नारदहि ये  ज्याच्या स्मरणें सरे महायास ॥५४॥
तो ब्राह्मण-माहात्म्य क्षत्रिय-माहात्म्य सांगि आयकवी ॥
वर्णी पतिव्रतेचें  माहात्म्यहि सर्व-योगि-राय कवी ॥५५॥
धर्म व्याध-स्कंद-  प्रभावादि-कथा उदंड तो बोले ॥
श्रवणें धर्म ब्राह्मण-  गण नारद फार देवही डोले ॥५६॥

१ यादवांच्या उत्साहाला. २ सफळ. ३ आश्रित जनांच्या कल्पवृक्षा हे श्रीकृष्णा. ४ बालकसदृश. ५ कार्तिकस्वामीच्या मातेच्या सदना सारखें. ६ मार्कंडेय.

सत्या कृष्णेसि ह्मणे " वदत्यें तें तूं खरेंच मान सये ॥
लोक ह्मणोत, परि पळहि माझ्या हातीं न कांत-मानस ये
त्वां हे पांच पति कसे वश केले ? भजति सर्व एकीतें ॥
थोडें याहुनि पाहुनि, नटती कादंबिनीस केकी तें॥ ५८॥
मांग वशीकरण कसें .केलें त्वां देवि कोणत्या मंत्रें"॥
कीं दिव्यौषधिमूळें किंवा वात्स्यायनोदितें यंत्रें ॥ ५९ ॥
कृष्णा हांसोनि ह्मणे " भामे मोहावयाशि पतिला जे ॥
मंत्राद्युपाय करणें. या श्रवणें बहु मदीय-मति लाजे ६०॥
प्रेमें पति-चरणाशि न देउनि, दे हात तायिताला जे ॥
ते स्त्री न रुचे पतिला कीं तीतें आततायिता लाजे ॥६१॥
जाणें वशीकरण हें, करित्यें, जेणें कधीं न कोपति, तें ॥
सखि तूंहि असेंचि करीं मद मत्सर दाखवूं नको पतितें ॥
पति-परमेश्वर-चरणा जी तत्सेवार्थ न नवंशी करणें ॥
ती मुग्धा कैशी गे वळवील स्वामि-मन वशीकरणें ॥ ६३॥
पतिचे प्रसाद देती ज्या सद्गतितें न योग सर्व तीतें ॥
वाहे पहा शिरीं शिव- देहार्ध-मता शिवा स्वसवतीतें ६४
श्रुतिला, कवि-धीमी ती मानवली फार शुद्ध-वदलीला ॥
न पतीसचि, कर्णासहि, सत्य सती होति उद्धवर्द-लीला"

१. सत्यभामा. २ नर्तन करितात. ३ मेघमालेला. ४ मयूर. ५ वात्स्यायन ऋषीनें सांगीतलेल्या. ६ घातकीपणा. ७ वश करीत नाहीं. ८ इंद्रियें. ९ यज्ञ. १० शंकराच्या अर्धांगाला मान्य, अशा. ११ पार्वती. १२ श्रीगंगेला. १३ वेदाला. १४ कवींच्या बुद्धीसारखी. १५ पापरहित असें जिला ह्मटलें, तिला. हें, कवि-धी व ती ह्यांचें विशेषण. १६ आनंद देणाऱ्या लीला ज्यांच्या त्या.

जें सासुरां मुली पितृ- गमनिं करिति तेंहि काननौके तें[2] ॥
कवळिति जवळि. तिमिंगिल[3] दिसतां भटवराहि कां न नौकेतें?
देव ह्मणे "जरि होते वनवासें कृश मदीय असु खमतें ॥
असुखमतें माझ्या हें, जें दृक्-प्रिय मुख, नसोचि असुखम तें
कृष्णे, करिलचि ह्मणशिल जरि या भूमंडळा नभा उखळ
तुजकरितां सखि अखिलहि असु वसु वेंचील,हा न भाउ खळ
सखि सोशिजेल लंघुनि काय खगोत्तमगरुद्रवा टोळें ॥
कां दृगुपद्रवदमशक- ततिचें न करील रुद्र वाटोळें ८९ ॥
करुनि समाधान असें गेला तीचा निरोप घेऊन ॥
श्रिततापहरि हरि, न पर, तापहराहि आतपत्र घे ऊन ॥

# अध्याय ७ वा.

## सारांश.

पांडवांच्या उत्कर्षानें धृतराष्ट्रास चिंता प्राप्त झाली. शकुनी व कर्ण दुर्योधनास ह्मणाले, हे राजा, सांप्रत तुझें ऐश्वर्य पाहून कुबेरही लज्जित होईल. जे पांडव ऐश्वर्यमदांध होउन तुला हांसले होते ते सांप्रत भिकारी झाले आहेत. तर आतां त्यांस आपलें ऐश्वर्य दाखवून लज्जित करण्याकरितां वनास जाऊं. कर्ण ह्मणाला, आपल्या ह्या कृत्याची धृतराष्ट्रास शंका न यावी ह्मणून गवळवाड्यांत गाईवासरें पहाण्याकरितां आह्मी वनास जात आहों,

१ वनवासी पांडव. २ तें रुदन. ३ हा एक महामत्स्य आहे. ४ श्रेष्ठयोद्धे. ५ सोसतें. ६ दृष्टीला संतोषदायक. ७ सुखमा-सुषमा ह्म० तेज, असुखम ह्म० तेजोहीन. ८ उखळून टाक. ९ धन. १० खग-उत्तम- गरुद्-रव ह्म० गरुडाच्या पक्षांच्या शब्दाला. ११ दृष्टीला उपद्रव देणाऱ्या चिलटांच्या पंक्तीचें, १२ छत्र.

असें निमित्त करावें ह्मणजे झालें.तें कर्णवचनमान्य करून दुर्योधन धृतराष्ट्राची आज्ञा घेऊन सैन्यासह मोठ्या डौलानें वनास गेला.

वनांत कांहीं वेळ मृगया केल्यावर दुर्योधन जलक्रीडा करण्या करितां एका सरोवरावर गेला. तेथें चित्रसेनगंधर्व सपरिवार जलक्रीडा करीत होता.कौरवांनीं गंधर्वांस दूर होण्यास सांगितलें. तें गंधर्वांनीं ऐकिलें नाहीं.ते युद्धास आले.कांहीं वेळ युद्ध झाल्यावर चित्रसेनानें कर्णाच्या रथाचा चुराडा करून टाकिला.तेव्हां कर्ण पळून गेला.मग दुर्योधनाच्या मुसक्या बांधून त्यास घेऊन चित्रसेन चालता झाला.

हें वर्तमान दुर्योधनाच्या दूतांनीं धर्मास कळविलें. तेव्हां धर्म, भीमादिकांस ह्मणाला, आपल्या जातिबांधवांस पराभूत करून परक्यानें धरून न्यावें हें बरें नाहीं. ह्यांत आपली अपकीर्ति होईल.तें ऐकून चौघेही बंधु दुर्योधनास सोडविण्यास गेले.अर्जुनानें गंधर्वांचा पराभव केला.तेव्हां चित्रसेन धर्मास शरण आला,व दुर्योधनास सोडून देऊन धर्माचा निरोप घेऊन तो स्वर्गास निघून गेला.

मग धर्मानें दुर्योधनाचा सत्कार केला व त्यास हिताच्या गोष्टी सांगून जाण्यास परवानगी दिली. तो जात असतां मार्गांत त्यास कर्ण भेटला. तो ह्मणाला मित्रा, तूं गंधर्वांचा पराभव केला, तेव्हां तुला इंद्राची उपमा योग्य होय. तें ऐकून दुर्योधन ह्मणाला, आपला पराभव गंधर्वांनीं केला. तशांत पांडवांनीं आपणास सोडविलें. आमची मसलत ही त्यांस समजली. मला युद्धांत मरण येतें तरी बरें झालें असतें. पण हें दुःख मला सहन होत नाहीं. कर्णादिकांनीं त्याची समजूत केली.पण तेणेंकरून त्याचें समाधान झालें नाहीं.तो अन्नत्यागपूर्वक मरणाचा निश्चय करून बसला.

दुर्योधन प्रायोपविष्ट झाला तें पाहून पातालवासिदानवांनीं त-

त्काल अथर्ववेदोक्त यज्ञ केला' त्यांत कृत्या प्रकट झाली. तिज-कडून दुर्योधनास त्यांनीं पाताळीं आणविलें. व त्यास बोध केला कीं, आमच्या तपानें शंकर संतुष्ट होऊन त्यानें तुला आमच्या हिताकरितां 'उत्पन्न केलें. तुझा देह कंबरेच्या वर वज्रमय आहे व बाकीचा पुष्पमय आहे. अशा देहाचा त्याग तूं करूं नको. तुझ्या साह्यास भगदत्तादि वीर आहेत. 'भीष्मादिकांतही राक्षस अंशतः प्रवेश करतील. नरकासुर कर्णशरीरांत शिरेल. क्षत्रि-यकुळांत दैत्यदानव बहुत जन्मले आहेत. तेही तुझेंच साह्य करि-तील. असा उपदेश करून दानवांनीं त्यास स्वस्थानास पाठविलें

दुसरे दिवशीं कर्ण दुर्योधनाजवळ डोळ्यांत आंसवें आणून ह्मणाला, मित्रा, मी अर्जुनाचा वध करीन. तूं हें साहस करूं नको. ह्या प्रतिज्ञेनें व पूर्वोक्त दानवोपदेशानें दुर्योधन समाधान पावला व नगरांत आला.

भीष्म ह्मणाला दुर्योधना, तूं कर्णाच्या बळावर पाडवांचा द्वेष करूं नको. येणेंकरून तुझा नाश होईल. कर्ण ह्मणाला, पांडवां-नीं दिग्विजय केला ह्यामुळें भीष्मादिकांस ते मोठे पराक्रमी असें वाटतें. तर मीही दिग्विजय करून येतों. ह्मणजे ह्यांची भ्रांति दूर होईल. असें ह्मणून तो दिग्विजय करून पुष्कळ द्रव्य घेऊन आला. मग दुर्योधनानें वैष्णवसत्र केलें.

सत्र समाप्त झाल्यावर कर्ण ह्मणाला, हे राजा, तूं रणांत विजयी होऊन राजसूययज्ञ करशील. अर्जुनास मी मारिलें नाहीं तोंपर्यंत दुसऱ्याकडून आपले पाय धुवविणार नाहीं. मीच आपले पाय धुवीन व मांस खाणार नाहीं. ही माझी दृढ प्रतिज्ञा आहे. तें ऐकून दुर्योधन ह्मणाला, माझा सर्व भरंवसा तुजवर आहे. तूंच माझे सर्व मनोरथ; पुरविशील तसे कल्पवृक्षही पुरविणार नाहींत.

पांडव-वृत्त-श्रवणें धृतराष्ट्र उदंड काळजी वाहे ॥
कीं दुखविले भुजगमे निश्चित होतील काळ जीवा हे १॥
शकुनि मकर्ण ह्मणे "कुरु- राया संप्रति धनेश तुज लाजे
झाले भणर्ग, मदानें हांसत होते सभेंत तुजला जे ॥ २ ॥
स्वश्री दावुनि, द्याया. दायादां दुःख, काननां चाला ॥
लाजतिल वार्के-शिखीच्या त्त्वत-पक्ष-मयूर कां न नाचाला"
राजा ह्मणे " ह्मणेलचि पांडव-वत्सल सबंधु जनक नका
आह्मां, प्राणांशि, न बहु जपतो तो अंध;बंधुजन-कनका"
कर्ण ह्मणे "हूं हें किति घोष-परामर्श-मिष पुढें कर गा ॥
मज मंत्रदासि देउनि पीत-जय-सुधेकरूनि ढेंकर गा"५॥
याचि मिषें आज्ञेला पुसती जों, नृप करी नकारा तों ॥
स्पष्ट ह्मणे "बालिशहो मरण-मद-कुमतिशीं नका रातों ॥
द्वैतवनाश्रय करुनि च्छळिले ते पांडु-पुत्र आहेत ॥
त्यांला पुन्हा छळावें आहे तुमच्या मनांत हा हेत ॥ ७ ॥
दिसतो भीम-धनंजय- कृष्णा-क्षोभें सु-योध-नाश मला ॥
ह्मणतों वन-प्रवेशें दहनापरि या सुयोधना शमला" ॥८॥
शकुनि ह्मणे "गाईतें पाहूं, मृगया वनीं करूं, परतूं ॥

१ भिकारी. २ वनाला. ३ सरस्वतीच्या मयूराच्या. ४ ज्यांचे पक्ष गळून पडले ते. ५ पांडवांविषयीं दयाळु. ६ बंधु-विदुर; यासह. ७ धृतराष्ट्र. ८ बंधुजनाच्या धनाला ह्म० पांडवांला. ९ गवळवाड्याकडील समाचाराचें निमित्त. १० ममलत देणाराला. ११ प्यालेली जयरूपी सुधा,येणें करून. १२ गायन कर. १३ मृत्युदायक दुष्ट बुद्धीशीं. १४ रत होऊं. १५ चांगल्या वीरांचा नाश. १६ पाप्याला.

धर्माकडे न जाऊं, व्यर्थ भिसी धैर्य-निधि सुधी पर तूं ॥९

धर्मज्ञ धर्म जपतो कृत-समयां[1] असति वश तया भ्राते ॥
कां विद्रावितील आज्ञा लंघुनि चातक तसे दयाभ्रा ते ॥१०

दायादांचें दर्शन घ्यावें काशास ताप साधाया ॥
वल्कि-जटि-दर्शनेच्छा[2] तरि पाहूं साधु-तापसा धायां[3]"११

अंधमति-कुमारीच्या[4] ते मोहिति बोल-नग[5] मनाला हो ॥
अनुमोदन देइल कां प्रेमाचा डोल[6] न गमनाला हो१२॥

शिरला सदार सानुज सशकुनि सांगेश[7] तो सकटक वनीं॥
दुखवावया शिरे, खळ जैसा निजदुर्गुणांसकट कवनीं १३

घोषीं[8] सुयोधन वसे हरिसा[9] परि साच मुग्ध, न वनीं तें[10]
यश संपादी, केवळ नाशी सेवूनि दुग्धनवनीतें ॥ १४ ॥

कुरुपति[11] अनुगांसि[12] ह्मणे " मृगयाक्रीडा वनीं भली केली॥
त्या द्वैतवनाख्यसरीं[13] स्वप्रमदांसह[14] चला करूं केली"१५॥

पूर्वींच तेथ येउनि गंधर्वाधीश चित्रसेन रते ॥
दुर्योधन-प्रहित[15] जे झाले पाहोनि चित्रसे नर ते ॥ १६ ॥

गंधर्वांसि ह्मणति नर "येताहे मनुजे-देव[16] शूर, सरा ॥
हें द्वैतवन-स्थान त्यागुनि आतांचि सर्व दूर सरा" ॥१७॥

---

१ केलेल्या नियमाला. २ वल्कलधर व जटाधर यांच्या दर्शनाची इच्छा. ३ तृप्त होण्यास, ४ धृतराष्ट्राची बुद्धि हीच कुमारी, तिच्या. ५ बोल हेच दागिने. ६ कल. ७ अंगेश-कर्ण, यासह. ८ गवळवाड्यांत. ९ कृष्णासारखा. १० गोकुळांत जें श्रीकृष्णानें मिळविलें तें. ११ दुर्योधन. १२ सेवकांना. १३ द्वैतवननामक सगेवरांत. १४ आपल्या तरुणी स्त्रियांसह. १५ दुर्योधनानें पाठविलेले सेवक. १६ मनुष्यांचा राजा.

खेचर ह्मणति "कुमति हो सिंहीचें काय रे करील शुनी ॥
मृगमदपरिभव-कर गुण नायकिला लेशमात्रही लशुनीं ॥
गंधर्वराज करितो जल-केलि, निघा पळाचि पामर हो"
नातरि मराल, तुमचा पति तो हो सनरकोटि सामर हो॥
तें ऐकुनि भूप ह्मणे " स्वभटांतें शीघ्र सोडवा सर हो ॥
पळवा गंधर्वातें हा स्वजयें करुनि गोड वासर हो"॥२०
कुरुपति-भट ह्मणति, "अरे, सोडा गंधर्व हो, सरोवर तें
आह्मांपासुनि खेचर- बळ कुंठित-गति नहो,सरो वरतें"
करितां मदें अतिक्रम कळवुनि त्यांची स्वकुळवरा करणी॥
गंधर्वांनीं बांधिले द्वैतवना-निकट बहु वीरांक रणीं ॥ २२॥
निज कटक भग्न पाहुनि कर्णं प्रकटूनियां प्रभावातें ॥
गंधर्वांची हरिली दीपाची ज्यापरि प्रभा वातें ॥ २३ ॥
साशि भट ह्मणति "विजय- श्रीचा अतुल-प्रभाव नवरा हा
याची प्रभा परा, जशि यज्ञ-वराह-प्रभा वन-वराहा॥२४॥
त्या चित्रसेन भेटे जैसा भगवान् अगस्त्य सिंधुरसा ॥
होउनि विरथ पळाला सिंह-परित्रस्त-चित्त सिंधुरसा २५
कर्ण-परिभवान्त असा झाला असतां सुयोधनाश रण ॥

१ कस्तुरीचा पराभव करणारा. २ सनरकोटि तुमचा पति, सामर हो ह्म० तुमचा राजा मनुष्ययुक्त आहे तो देवयुक्त होईल, तुह्मांसह तुमच्या राजास युद्धांत मृत्यु प्राप्त होईल हें तात्पर्य. ३ आपल्या वीरांना. ४ दिवस. ५ ज्याची गति बंद झाली तें. ६ आपला कुलश्रेष्ठ चित्रसेन यास. ७ तुच्छ. ८ अनुपम पराक्रमी. ९ अदिवराहाची कान्ति. १० समुद्रोदकाला. ११ हत्तीसारखा

होउनि विकळ ह्मणति भट आह्मांला हो सुयोधना, शरण
कलिपुरुषं चित्रसेना- वरि धांवुनि जाय आशु न कदापी
खळ भी, हरिशि पिसाळे जो, तो पसरूनि आ शुनक दापी
जयहेतु काय होइल अहिला बळ-यत्न-कोटि केकिरणीं ॥
मिरवे प्रकाश तिमिरीं खद्योताचा न तो टिके किरणीं ॥
करुनि विरथ दुर्योधन धरिला जैसा भुजंग खगपानें ॥
लघुहित न गुर्वतिक्रम, वदन न फ़ाटेल काय नगपानें २९
सानुज सदार दुर्जन दुर्योधन खेचरेश्वरें धरिला ॥
जाणों क्षिति-हृदयींचा साक्षात् कांटाचि तो समुद्धरिला ३०
दुर्योधनासि जिंकुनि नेतां बांधोनि आपुल्या अयनें ॥
धर्मासि शरण गेले सचिव भरुनि अश्रुच्या भरें नयनें ३१
ते वृत्त कथुनि ह्मणती" तव-संदर्शनें-सुखोदया भ्राते ॥
पावोत, सोडवावे बंधापासुनि तुवां दयांऽभ्रा ते" ॥३२॥
भीम ह्मणे" खल-मत हें आह्मां श्री दाखवूनि गांजावें ॥
त्या हित-कर-सुहृदांसीं आह्मीं भांडावयासि कां जावें"३३
धर्म ह्मणे"रे भीमा, शरणागत रिपुहि रक्ष्य सन्मोहित ॥
बा जरि घडेल भीतांऽ भय-दान जगीं तरीच जन्म-हित३४

१ रक्षिणारा. २ कलीचा अंशावतार दुर्योधन. ३ तत्काल ४ दटावी. ५ सैन्याचे कोटिशः यत्न. ६ मयूराशीं युद्ध करण्यांत. ७ अन्धकारांत. ८ गरुडानें. ९ अल्पहितकारी. १० पर्वतभक्षणानें. ११ चित्रसेनानें. १२ उपटून काढिला. १३ मार्गानें. १४ तुझ्या दर्शनानें होणाऱ्या सुखाच्या उदयास १५ कृपावना. १६ दुष्टाची मसलत. १७ हितकरणाऱ्या मित्रांशीं १८ रक्षणास योग्य. १९सज्जनांस मान्य. २० भ्यालेल्यास अभय देणें.

न सहावा अन्य-कृत ज्ञाति-पराभव बुधें, उठा, रचितो ॥
जन्मुनि सुयशासि न जो, जननी-यौवन-वनीं कुठारचि तो ३५
आरंभिता न मख तरि जाता, हा पळहि राय न रहाता॥
सुयशोमृतासि पसरिति अमर, न पसरील काय नर हाता" ३६
चौघेहि ह्मणति "तुमचे घेउनि येतोंचि ते असु-ज्ञाती" ॥
सुज्ञासि गुर्वनुज्ञा कामदुघा बहु मता असुज्ञा ती ॥ ३७ ॥
होऊनि सज्ज कुरुरथा-रूढ तयां गांठिती महाबळ ते ॥
खेचर फिरले, नमते मरणार, भिउनि तरी न कां पळते ३८
गंधर्वांसि ह्मणति "रे दुर्योधन बंधु आमुचा सोडा ॥
ऐशी श्रीधर्माज्ञा, स्वसुखें चुकलों ह्मणोनि कर जोडा" ३९
गंधर्व ह्मणति "जो खळ-जलधीतें महातपा प्याला ॥
आह्मां मता तदाज्ञा, नातरि शिवता न हात पाप्याला ४०
प्राण सुधाहि अव्हेरुनि जीस सदा पसरितात आ ज्ञाते ॥
आह्मीं नरदेवाज्ञा कांजी प्यावी? त्यजूनि आज्ञा ते" ४१
ऐसें निष्ठुर वदले की खळ-मथनांत लेश अनय नसे ॥
झाले होतेहि विजय-ज-मदें सनयन असोनि अनयनसे ४२
"कां मरतां? सोडा रे, सोडा, गंधर्व हो" ह्मणति चवघे ॥
त्यांवरि खवळोनि खचर खरतरशर-निकर सोडिती अवघे ४३

---

१ मतिच्या तारुण्यरूप वनांत. २ राजसूययज्ञ. ३ हा धर्म. ४ प्राणरूप ज्ञातिबांधव ५ गुरूची आज्ञा. ६ कामधेनु. ७ असु (सामर्थ्य)-ज्ञ ह्म० गुर्वाज्ञेचें सामर्थ्य जाणणाऱ्याला. ८ दुष्टाचें सैन्य, हाच समुद्र, त्याला. ९ महातपस्वी इंद्र. १० नयापासून प्राप्त झालेल्या गर्वानें. ११ नेत्रसहित.

त्या हरिचे आश्रित ते, या हरिचे प्रबळ दास हे तिपट॥
झांकिति न त्यांशि, साही खेचरा,त्यांचे विशाळ हेतिपट४४
गर्वे हरिशीं भिडतां कां होतिल शुद्ध चित्रसे न करी ॥
जिष्णुपुढें तशि खेचर- गति होतां,युद्ध चित्रसेन करी ४५
तच्छस्त्रास्त्रैकार्णव- मध्य-गत तो महाकिरी टिकला ॥
अपराजिता शिवासीं समरीं विजयावहा किरीटि-कला ४६
अन्यत्र नवल,परि त्या पांडुकुमारीं नव्हे नवल यश तें ॥
हरि-हर-दास-परिभव- क्षम न सकळ देव दानव लयशतें ४७
तो भेटोनि ह्मणे " कां झालासि खळा सुयोधना शरण॥
केला शक्राज्ञस स्वहितकरामितसुयोधनाश रण ॥ ४८ ॥
हें काय बरें सुज्ञा? जो दारुण दंश-काम साप सदा ॥
तन्मथन अनिष्ट?अभय द्यावें त्या सर्व-तामसाऽपसदा?४९
अर्जुन ह्मणे" सख्या,मज अकृतज्ञ असें ह्मणों नको,पावें॥
ऐसें अजातरिपुवरि अहित-हित-निरत ह्मणोन कोपावें ५०
जेंवि शरणागताच्या त्यागा,प्राणांचिया न,शिबि भ्याला॥

१ श्रीकृष्णाचे २ पाण्डव. ३ श्रीसूर्याला. ४ शस्त्रास्त्ररूप पट. ५ सिंहाशीं. ६ अर्जुनापुढें. ७चित्रसेनाचीं शस्त्रास्त्रें, हाच महासागर, त्यामध्यें असलेला. ८ आदिवराह. ९ पराभव न पावलेला. १० यशस्वी. ११ अर्जुनाची कुशलता. १२ श्रीकृष्ण व शंकर यांच्या दासाचा पराभव करण्यास समर्थ. १३ शतशःकल्पांतीं. १४ चित्रसेन. १५ त्राता. १६ आपलें हित करणाऱ्या असंख्य वीरांचा नाश ज्यांत,तो. १७ दंशाची इच्छा करणारा. १८ सर्व तमोगुणिजनामध्यें अधम,अशा दुर्योधनाला. १९ दुर्जनाचे हिताविषयीं तत्पर.

सन्मति अपवादा भी, करणीच्याहि न वधू तशि बिम्याला
सोशील मृत्यु, परि गुरु शरणागत-ताप पळ न सोशील
तारिल सकळांसहि त्या, वा, तें क्षणमात्र चळ नसोशील"
खेचर-सिंह वदे कुरु- सिंहाला "उचित भाग हरिला जो
या कर्मे तुज मुक्ता- .कवळ नुगळितां हटींद्र हरि लाजो"
तो खेचरनाथ ह्मणे "कुरुवंशीं धन्य तो अजातारी ॥
खळ-रक्षकां तुह्मां प्रभु बहु बहु मानील, जो गर्जा तारी ५४
धन्य तुह्मी गुर्वर्पित- वाक्-चेतःकाय कीर्ति-लाभ-रत ॥
आठविला मज आद्यें कविनें जो काय कीर्तिला भरत ५५
भेटुनि वर्णुनि धर्मा गंधर्वश्रेष्ठ जाय नाकाला ॥
खळ बहु लाजे, जाणो तो न यशा ने हरूनि, नाकाला ॥
मृत गंधर्व उठविले शक्रें तत्काळ अमृतसेकानें ॥
स्व-मरण-कथेसि ऐकति सुप्तोत्थित सत्य अमृतसे कानें ५७
धर्मे सदार सानुज बंधु हित कथुनि पुराशि पाठविला ॥
आठविला तत्परिभव- खेदचि, न तदीय दोष आठविला
मार्गी भेटोनि ह्मणे कर्ण, "सख्या धन्य तूं महातेजा ॥
मज पळविलें जिहीं, ते शत्रु न झाले रणीं सहाते ज्या ॥
खेचर-नाथ-परिभवें तुजला सुरपाळ कां न कांपावे ॥
चापश्रुति जगदंबा समयीं प्रिय-बाळकां न कां पावे" ॥

---

१ जादूच्या. २ बिळ्याच्या रेघेला. ३ हरण केला. ४ महा-आग्रही. ५ सिंह. ६ गजेंद्राला. ७ गुरूला अर्पिलीं, वाचा, मन, देह ज्यांनीं ते. ८ वाल्मीकानें. ९ वर्णिला. १० रामभ्राता. ११ नासिकेला. १२ निजून उठलेले. १३ न मेलेले असे.

दुर्योधन त्यासि ह्मणे " काय सख्या, वर्णितोशि कर्णा, तें
निज वृत्त काय सांगों होइल अति तापदायि कर्णातें ६१
अरिनें केलें मजला विरथ, करुनि सानुजासि बद्ध रणीं॥
सोडविलें धर्मानें, तें झालें दुःख बहु, न मद्धरणीं ॥६२॥
अस्मन्मंत्रित कथिलें गंधर्वेंद्रें युधिष्ठिरासि खरें ॥
तेव्हां खचोनि पडलीं मजवरि दुःखाद्रिचीं महाशिखरें ६३
प्राणांकडे न पाहुनि म्यां केला धरुनि मृत्युकाम रण ॥
कर्णा, आलें नाहीं मज तच्छस्त्रें करुनि कां मरण ॥६४॥
वदलों शतदा मी कीं घे पोटीं भूमिदेवि, वर दे हा ॥
विश्वंभरा क्षमा, परि न शिराया भूमि दे विवर देहा ६५
बुडविति तापविती श्रुत- मात्रा सहसाचि दुर्दशा, न नया
मद्दुःख बहु, न झाला पात्र समर-निहत तो दशानन या
प्रायोपवेश करितों दावूं काय त्रपावहास्याला ॥
पाव मला, मरणाज्ञा दे, लोकांच्या न पाव हास्याला ॥
दुःशासना, धृति धरुनि अंध-पितृ-हित-प्रियार्थ हो राजा
अभिषेचितों, पुढें ये, निज-गुर्वाज्ञाचि होय होरा ज्या"
"म्यां राज्य-भर सहावा कैसा? प्रिय-पुत्र-शोकभर तातें?॥
गुरु-दत्त-राज्य-भोगें संस्तविते काय लोक भरतातें ॥६९॥

---

१ दुःखदायक. २ माझ्या हरणीं. ३ आमची गुप्त मसलत. ४ विश्वाला पोसणारी. ५ पृथ्वी. ६ नद्या. ७ मरणाच्या संकल्पानें उपोषण. ८ लाजिरवाण्या मुखाला. ९ अंध पित्याचें हित करणारें, अशा प्रिया करितां. १० मुहूर्त. ११ या पदाचा 'सहावा' याकडे अन्वय. १२ कैकेयीपुत्राला.

ऐसें वदोनि झोंबे कंठीं दुःशासन स्व भावाच्या ॥
सर्वांसि दुःख होतें भावि-वियोगें सम-स्वभावाच्या ॥७०॥
कर्ण ह्मणे "बाळांसहि हें ऐसें झोंबणें गळां ठावें ॥
कां रडतां भारत हो? न शिरोनि तुह्मीं तमीं गळां ठावें ॥
प्रभुनें प्रजा, प्रजांनीं प्रभु, रक्षावाचि संकटीं असुनी ॥
कां न जपावें तुज त्या पाण्डुसुतांनीं त्वदाश्रयीं असुनी॥
पावे हरिहि पराभव मग अन्य न कां सुयोध नाडावा ॥
या अपयशें मळो पद- नखरहि न तुझा सुयोधना, डावा"
शकुनिहि ह्मणे तयातें "यांत दिसे लेश न मज लाभाचा"
प्रिय हित सत्यहि सांगे परि तद्वचनें न समजला भाचा॥
सुर-जित पातालगं दिति-दनु-सुत निज-हित-सुयोध-नाश तदा
जाणुनि कृत्या-हस्तें नेउनि बोधिति सुयोधना शतदा॥
असुर असें वदले कीं " होतां हें त्वच्छरीर असुरहित ॥
राजा सुयोधना, मग कोण पर प्रभु करील असुर-हित ॥
सांबें दिलाशि निर्मुनि पूर्वी आह्मांशि तूं तपस्तुष्टें ॥
कीं व्हावीं असुर-कुळें बहु सेवुनि तव-यशोमृतें पुष्टें ॥७७
नाभ्यूर्ध्व वज्रमय तव जगदीशें निर्मिला महाकाय ॥
पुष्पमय अधस्तन जग- दंबेनें, त्यजिशि हा असा काय॥
भगदत्तादि तुज तुझ्या कार्याशि सहाय होतिल कराया

१ धैर्य खचवावें. २ प्राणांनीं. ३ इंद्र देखील. ४ पराभूत व्हावा. नागविला जावा. ५ देवांनीं जिंकिलेले. ६ पातालवासी- ७ दितीचे व दनूचे पुत्र, दैत्य व दान. ८आपलें हित करणाऱ्या वीराचा नाश. ९ आसुरी उग्र देवता. १० नाभीच्या वरचा भाग. ११ खालचा.

अस्मत्पक्षश्रीच्या भाळीं तूं भव्य हो तिलक राया ॥७९॥
भीष्मादिकांत अंशें राक्षस-वीर प्रवेश करितील ॥
तेणें निर्दय होउनि ते स्वसुतहृज्जीवनाशि हरितील ॥८०॥
नरकासुरहि समर्व- यदुवर-हननार्थी शिरेल कर्णांत ॥
तोहि अरिबळीं जैसा सिंधूच्या वाडवाग्नि अर्णांत ॥ ८१॥
क्षत्रकुळीं दितिज दनुज बहु राक्षस जन्मले अगा राया॥
तुज ते सहाय होतिल न उपेक्षीं भूतिच्या अगारा या८२॥
सुर-गति धर्म, असुर-गति तूं, यास्तव पसरिताति आ शेतें
मेघा तुज, असुर-कुळें जीवन-लाभार्थ धरुनि आशेतें८३॥
स्व-सुताऽर्जुन-हित-कामें याचक-वेषासि वृत्रहा धरिल ॥
करिल कपट वामनसा कर्णाचीं कवच कुंडलें हरिल ॥८४॥
परि संसप्तक समरीं करितिल हरि-पुत्र-घात राक्षससे ॥
भीतील त्यांसि पांडव सिंहाला जेंवि कातराक्ष ससे" ८५
ऐसें पाताळीं दिति- दनुज स्वमुखें रहस्य कळवूनी ॥
स्वस्थानीं पाठविती कृत्याहस्तें तयाशि वळवूनी ॥ ८६ ॥
प्रकट न तें वृत्त करी जाणों होईल त्या स्व-निधिला भें॥
होय मनींच प्रमुदित जैसा लुब्धांत लुब्ध निधि-लाभें ॥८७॥
प्रातःकाळीं रोदन- नमनाऽर्जुन-मारण-प्रतिज्ञांनीं ॥

१ आमच्या पक्षाच्या लक्ष्मीच्या. २ अर्जुनासहित श्रीकृष्णाच्या नाशाकरितां. ३ उदकांत. ४ आपला पुत्र अर्जुन, याच्या हिताच्या इच्छेनें. ५ इंद्र. ६ प्रतिज्ञेमुळें युद्धपराङ्मुख न होणारे वीर. ७ इंद्रपुत्र अर्जुन, याचा नाश. ८ भयभीत नेत्र ज्यांचे ते. ९ हर्षयुक्त. १० रुदन, नमन व अर्जुनास मारण्याची प्रतिज्ञा, यांहीं करून.

वळवी राधेय जसा प्राणत्यागोद्यतामति ज्ञानी ॥ ८८ ॥
कर्णाशि ह्मणे "सखया, मित्रावांचुनि पडेन साधि तमीं ॥
करितों त्वदुक्त, आलों स्वन्मंत्रेंचि स्वकार्य साधित मी" ॥
जाय पुरा दुर्योधन यश देउनि बंधु-शकुनि-कर्णातें ॥
वन-वृत्त श्रुत झालें भीष्म-द्रोणादि-पूज्य-कर्णातें ॥ ९० ॥
भीष्म ह्मणे " कथितों हित रिपुसहि, सांगेन कां न नातूतें ॥
कां गेलासि मदाज्ञा नसतां जायासि कानना तूतें ॥ ९१ ॥
स्व-पर-स्वरूप तुजला कळलें कीं, कां ? कसा अजातारी ॥
कर्ण कसा, पार्थ कसा, वत्सा, पंकांत गज गजा तारी ९२ ॥
न स्तुत्या धेनुपरिस जरि बहु दुध दे अजा तरि पुराणा ॥
सद्वदना कर्ण तसा स्तुत्य न, सोडुनि अजातारिपु राणा ९३
हर्षे कुलज भट तदा होय रणीं बाण-राजि-लाभ यदा ॥
वी सूत-सुता झाली जशि पत्रिप-दृष्टि राजिला भयदा ॥ ९४
याचें जो तेज हरी त्याचें फाल्गुन, ह्मणोनि जे कवि ते ॥
कर्ण-खचराऽर्जुनां कां ह्मणति न खद्योतरात्रिकरसविते ९५
या कर्णें उडुपें त्वां लंघाया पांडवाऽब्धिला जावें ॥
हा ! बालिशहो, न तुह्मीं या अविवेकेंकरूनि लाजावें ॥ ९६ ॥
दे राज्य, संधि कर, कर जोड, गुरु-युधिष्ठिरासि हो नत रे
नय-सेतु-पथाश्रय जो न करी व्यसनाऽर्णवांत तो न तरे ॥

१ कर्ण. २ प्राणत्याग करण्यास उद्युक्त झालेल्यास. ३ दुःखी. ४ शेळी. ५ गरुडाची दृष्टि. ६ दुर्तोंड्याला. ७ कर्णाचें. ८ चित्रसेनाचें. ९ कर्ण चित्रसेन व अर्जुन यांस. १० काजवा, चन्द्र व सूर्य. ११ लहान नौकेनें. १२ न्यायरूप सेतूवरील मार्गाचा आश्रय.

जें सन्मत भीष्म-वचन पावे दुर्मतिपुढें अनादर तें ॥
गीर्वेहि अनादरिजे काय न गायन जडें अनादं-रतें ॥९८॥
होती प्राप्त जयाच्या स्वीकारें मंगळें अवधि- रहितें ॥
कवि-शत-सत्कृत कुळ- गुरु-वचन न घे तो जरी अबधिरहि तें
जाय उठोनि कुमति कीं हा राज्यानिष्ट-हेतु ह्मातारा ॥
न वदोनि वदे नातू बुडतां ह्मणातिल न हे तुह्मा तारा ॥
कर्ण ह्मणे" कुरुराया मजशीं सुश्राव्य शांतनव न वदे ॥
कर्णासि ताप बहु कटु- भाषी हा अप्रशांत नव नव दे ॥१॥
धिक्कारूं त्याशि कसें गुरु-धिक्कारेंकरूनि पाप डसे ॥
नाहींतरि म्यां ऐसे चुरिले असते धरूनि पापडसे ॥ २ ॥
आहे पांडु-तनय-कृत- दिग्विजयाचें नृपा पडप यास ॥
माझा अभिमान असो तुज,जैसा वारिचा जड पायास ॥
दिग्विजय ससेनांहीं केला त्यांहीं न तो असेनांहीं॥
परि ह्मणतों'विजयी भुज कोणाचेही जगीं असे नाहीं ॥४
दिग्विजय करुनि येतों एकाकी एक-रथ असेनहि मी ॥
किति हें,त्वदर्थ वर्षी उघडा,ग्रीष्माऽतपीं,असेन हिमीं"
गांधार ह्मणे" सखया आहे मज बहु तुझाचि विश्वास ॥

१ सरस्वतीचेंही. २ नादरत नव्हे अशा जनानें. ३ सुखें. ४ निरंतर. ५ शतशः ज्ञात्यांनीं सत्कारिलेला. ६ बहिरा नव्हे तो. ७ राज्यास अनिष्ट होण्यास कारण. ८ नवदोनि वदे ह्म० न बोलतां सुचवी. ८ ऐकण्या जोगें. ९ एखाद्याची प्रतिष्ठा वर्णावी असा जो कोणास पक्षपात असतो तो. १० उदकाचा. ११ दुधाला. १२ सेनारहितांनीं. १३ सेनारहित.

वीरा,एकाकीही तूं यद्यपि जिंकिशील विश्वास ॥ ६ ॥
परि शोभार्थ असोंदे, त्याग करावा न आत्म सैन्याचा॥
माझा सखा तसाहो क्षितिला वश करुनि त्याहि वैन्याचा"
दिग्विजयार्थ सुदिवशीं तो तेजोराशि शूरंज निघाला ॥
घालावया अनम्रा- क्करदाहितसर्वशूरजनिं घाला ॥१०८॥
दुर्योधन बहु मानी शकटशतानीत मणि-कनक दातें ॥
भरिलें,घृतें भरावें, जें तैलानेंही माणिक न कदा तें ॥९॥
त्यावरि तो दुर्योधन निज-कुळ-गुरुला ह्मणे"पुरोहित हो ॥
मत्काम राजसूय- क्रतु करणें,हा सुखें पुरो हित हो" १०॥
तो साधु ह्मणे"वैष्णव- सत्र करावें तुवां नयज्ञा तें ॥
ऐसेंचि फळद, असतां धर्म उचित तूंहि या न यज्ञातें१२॥
तें मान्य करुनि रायें "वैष्णवसत्रोत्सवा पहयास॥
यावें"ह्मणुनि नृपांप्रति पाठविले दूत बहु वहायास॥१२ ॥
मरताचि न मरता जरि ह्मणताचि सदाहि अन्यसत्रपहा! ॥
दूतमुखें दुर्योधन धर्मासि ह्मणे'मदीय सत्र पहा, ॥११३॥
धर्म ह्मणे"गांधारे, साधु करिसि कर्म भारतोचित रे ॥
जो धर्म-सेतु-संश्रित वाहुनि गुरुराज्यभार तोचि तरे॥१४॥
वा येती पुण्य-यश- संपत्ती जोडितां न येरा-या ॥

१ वेनराजाचा पुत्र, पृथुराज. २ सूर्यपुत्र कर्ण. ३ अनम्र अकरद-अहित इ० ह्म० जे नम्र नव्हत व कर न देणार, जे दुष्ट, अशा सर्व शूर जनांवर. ४ शतशः शकट भरून आणिलेलें. ५ दाता, जो कर्ण, त्यानें. ६ सढळ. ७ माझा मनोरथ. ८ राजसूया सारखें. ९ सलज्ज. १० धर्मरूप सेतुस अवलंबून असलेला.

यावें, परि संप्रति वन-वासव्रत सोडितां नये राया" ॥ १५ ॥
भीम ह्मणे "धर्मासह निश्चित येईन समर-सत्रास ॥
रुचतो हाचि रस मना, देतो पर अमृतसम रस त्रास" १६
तें सत्र पूर्ण होतां कर्ण ह्मणे "पांडवायु हरिशील ॥
ऐसाचि कुरुपते, तूं विश्वस्तुत राजसूय करिशील ॥ १७ ॥
जोंवरि न अर्जुनातें मारीन रणगणांत मी स्वशरें ॥
तों वरि न पाद-धावन करवीन, करीन आपुल्याचि करें॥
सेवीन न मांसातें जैसा मोक्षेच्छु सुजन न सुरेतें ॥
न तदुक्त मृषा, ज्याचें सुक्षेत्रामाजि सुजनन स्फुरेतें" ॥१९॥
गांधार ह्मणे "कर्णा, पूर्ण भरंवसा मला तुझाचि असे ॥
त्वद्भुज संश्रित-कामद ते मंदारादि पांचही न असे१२०

# अध्याय ८ वा.



## सारांश.

धर्मराज वनांत असतां, त्याकडे व्यास आले. ते ह्मणाले " स त्पात्रीं अल्पही अन्नदान करून मुद्गल ऋषि तरला. तो आपल्या स्त्रीपुत्रांसह शेतांत गळून पडलेलें धान्य वेंचून आणी. पंधरा दिव-

१ मद्याला. २ पवित्र वीर्यानें. ३ आश्रितांचे मनोरथ पुरविणारे. ४ मंदार, पारिजातक, संतान, कल्पवृक्ष, हरिचंदन.

सांत अदमण भात जमत असे. त्याचा पाक करून तो दरप्रतिपदेस इष्टि करीत असे. व उरलेल्या अन्नापैकीं अतिथीस अन्न देऊन बाकी राहील तें आपण खात असे. याप्रमाणें तो पंधरादिवसांत एकदा भोजन करीत असे. असें त्याचें व्रत दुर्वासा ह्यास समजलें. तो दरप्रतिपदेस त्याकडे येऊन सर्व अन्न भक्षण करीत असे. याप्रमाणें दुर्वासा ऋषीनें सहाविळ केलें. तरी मुद्गल ऋषि सत्वास ढळला नाहीं. त्यांचें हें औदार्य पाहून दुर्वासा सन्तुष्ट झाला व त्यास वर देऊन स्वस्थानास गेला. वत्सा धर्मा, तूंही सत्वास ढळूं नको. ह्मणजे या संकटांतून लौकर मुक्त होशील. असें सांगून व्यास निघून गेले.

एकदा दुर्वासा ऋषि दुर्योधनाकडे गेला. दुर्योधनानें त्याची उत्तमप्रकारें सेवा केली. तेणें करून ऋषि प्रसन्न झाला. तेव्हां दुर्योधनानें त्याकडे वर मागीतला कीं, वनांत पांडवांकडे शिष्यांसह जाऊन मध्यरात्रीं अन्न मागावें. ऋषीनें तें कबूल केलें. व त्याप्रमाणें तो पांडवांकडे गेला. तेव्हां पांडव संकटांत पडले. मग द्रौपदीनें भक्तवत्सल श्रीकृष्णाचा धांवा केला. तो ऐकून श्रीकृष्ण धांवून आला. तो द्रौपदीला ह्मणाला. मी क्षुधित आहें. आधीं मला भोजन दे. ती ह्मणाली. थाळी धुवून ठेविली आहे. आतां तुला काय द्यावें? कृष्ण ह्मणाला, तें भांडें मजकडे आण. द्रौपदीनें तें भांडें त्याकडे आणिलें. त्याभांड्यास एक भाजीचें पान चिकटलें होतें तें आपल्या हातांत घेऊन श्रीकृष्णानें "श्रीपरमेश्वरःप्रीयताम्" असा संकल्प करून द्रौपदीकडून उदक

सोडविलें. श्रीकृष्णानें तें भाजीचें पान खातांच विश्वाची तृप्ति झाली. मग श्रीकृष्ण द्वारकेस निघून गेला.

मग द्रौपदीनें ऋषींना बोलाविण्यास नकुळाला सांगितलें. इकडे ऋषींची तृप्ति होऊन ते ढेंकर देत बसले होते. त्या दिवसापासून दुर्वासानें प्रतिज्ञा केली कीं, आजपासून साधूचा छल करावयाचा नाहीं. अंबरीष राजासारखेंच धर्माचें तप आहे. द्रौपदीच्या कोपानें आमचा नाश होईल. आतां भोजनास न गेलों तर भीम सर्वांस मुष्टिमोदक देऊन बलात्कारानें घेऊन जाईल. तर आतां येथून पळून जावें. असा निश्चय करून दुर्वासा तेथून शिष्यांसह पळून गेला.

चिंतित होता विपिनीं तो धर्म सबंधु विप्र-भव्यांस ॥
तों त्यांसि भेटि देउनि धन्य करी शशि-रवि-प्रभ व्यास १॥
व्यास ह्मणे''वत्सा मी झालों द्विजतर्पणें प्रहर्षित रे ॥
स्वल्पहि अन्न सुपात्रीं देउनि स-कुटुंबमुद्गलंपि तरे ॥ २ ॥
जोडी सात्मजदार द्रोणमित व्रीहि पंधरा दिवसीं ॥
विधिवत् सेवी करवुनि पेज कण्या भात पानगे दिवसीं ॥३॥
समयीं सर्वहि भक्षी दुर्वासानाम विप्र सादा तें ॥
सत्वाशि न ढळतां तो भगवान् बहु दावि प्रसादांतें ॥ ४॥

---

१ ब्राह्मणांच्या कुशलास. २ चंद्रसूर्याप्रमाणें तेजस्वी. ३ त्वां केलेल्या ब्राह्मणतृप्तीनें. ४ मुद्गलनांवाचा ऋषि. ५ पुत्र व स्त्री, यांसह. ६ अदमण, ७ भात. ८ हें एक पक्वान्न आहे. हा शब्द बहु वचनीं आहे. यास फळें असें ह्मणतात. ९ सहावेळ.

सत्वाशि न चुकले ते तरले,तरशील तूंहि वारा या ॥
मरल्याचि समा,यापरि तेरावीही सरेल बा राया ॥ ५ ॥
व्यसनांत शीलवश जन तरला नळवश जळांत पाथरसा ॥
सोडी सत्वासि न शुचि- गुण तसहि,जेंवि शुद्ध पाथ रसा ६ ॥
शिष्यायुतयुत भगवान् दुर्वासा गजपुरासि ये राहे ॥
सत्संगति सत्फलदा, सुज्ञासि पचे,पचे न येरा हे ॥ ७ ॥
चित्र, च्छळ सोसुनि खळ मुनि-भजनीं सर्वकाल रावे तें ॥
न विटे सत्सेवेतें, जेंवि पिपीलिक-समूह गवेतें ॥ ८ ॥
दास्यें प्रसन्न होउनि माग ह्मणे तो तपोनिधी राजा ॥
जो देणार तशाही सिद्धि असुलभा,तपीनि धीरा ज्या॥९॥
खळ त्यासि ह्मणे "येथें जैसा झालासि अतिथि सुतपा हें ॥
शिष्य-कटक घेउनि बा तोहि कुरूत्तंस पांडुसुत पाहें ॥१०॥
परि सुकुमारी कृष्णा जेवूं द्यावी,जपूनि धेनु सती ॥
दोहावी जाणा हे, सत्वमयी ती तपोनिधे,नुसती ॥ ११ ॥
श्रोत्यांच्या व्हावे बहु तप्त प्राशूनि ज्या वरा कानें ॥
मागीतला तसा वर सद्गुरुपाशींहि त्या वराकानें ॥ १२ ॥
तो मुनि अवश्य ऐसें बोलोनि निघे,असाधुजन नाचे ॥
त्यातें पूजिति ते प्रिय- सख त्या यदु-वंश-विहित-जननाचे१३

१ बारा वर्षे. २ सद्वृत्तास वश आलेला. ३ नलनामक वानरास वश झालेला. ४ उदक. ५ शिष्यांचे दशसहस्रानें युक्त. ६ आश्चर्य. ७ मुंग्याचा समूह. ८ काकवी पेक्षां कांहीं दाट जो उंसाच्या रसाचा गोंधा करितात. तिला. ९ जितेंद्रियाला. १० कुरुश्रेष्ठ. ११ कानानें. १२ नीचानें. १३ यदुवंशांत धारण केलें जन्म ज्यानें, त्या श्रीकृष्णाचे.

प्रार्थुनि धर्में मुनि तो स्नानासि स-शिष्य-कटक पाठविला ॥
त्या संकटीं सतीनें श्रित-कल्पद्रुम मुकुंद आठविला ॥१४॥
स्व-मनि ह्मणे ती कृष्णा "श्रीकृष्णा धांव, पाव, नाश तदा
हीचा होऊं न दिल्हा, स्मरतें मज तेंचि पावना शतदा॥१५॥
सत्य असो जें ह्मणती कवि भवसिंधूंत नांव नामा तें ॥
संप्रति चुडे भरावे त्वां करुनि श्रितजनावना मातें ॥ १६ ॥
नेसविता झालाशि प्रेमें तूं करुनियां दया लुगड्या ॥
आतां चुडे भरीं बा, आश्रय मज एक तूं दयालु गड्या॥१७
तुजहुनि इतरें कोणें वारावा क्षिप्र अंतराय महा ॥
दंडीलचि, साहेल न, देवा स्वल्पाहि अंतरा यम हा॥१८॥
मग मत्स्वरूप काय ब्राह्मण आले दुरूनि जेवाया ॥
त्यांसि तुझी भगिनी हे बा न नमुनि जरि ह्मणेल जेवा या१९
या मुनिकोपासि जसा लागे न पयासिचिया उता वेळ ॥
श्रीकृष्णजी, तुह्मीं मज- वरि करुनि दयाचि या उतावेळ२१
स्मरतांचि ये प्रभु, दया सत्य सुरभि, भक्त-वत्स लागावें ॥
कांसेसि याचियांचि, त्यजुनि सकळ याचि वत्सला गावें॥२॥
ते काय जे न केवळ भक्तिवश पुरंदरादि सुर भितरे ॥
तीही काय, न आपण- ही जी व्यसनार्णवांत सुरभि तरे॥२०
येतांचि दीनबंधु- प्रति कळवी ती नमूनि आधीतें ॥

---

१ आश्रित जनाचें रक्षण. २ विघ्न. ३ अवकाशला. ४यमरूप दुर्वासा. ५ दुधाच्या. ६ ओताला. ७ याच्यान. ७ इंद्रादि. ८काम-धेनु. ९ चिंतला.

भगवान् ह्मणे "भुकेलों सखि वाढ मला असोचि, आधीं तें" ॥
कृष्णा ह्मणे, "अहा बा वाढावें काय गा पहा हातें ॥
क्षाळूनि घातलेंसे आतां कीं पाळथें अहाहा! तें ॥२४
अन्न मद्दर्शनावधि रवि दत्त-स्थालींत, मग नसे लवही ॥
त्वद्दृष्टि सर्व जाणे, रुम धर्माची असी नसेल वही" ॥२५॥
कृष्ण ह्मणे, "नर्म पुरे "तर्पाया योग्य सर्व थालीला ॥
मीच नव्हें काय इची सखि, सुरभि सखीच, सर्वथा लीला
आण वरें पाहोंदे ऐसा आग्रह करूनि आणविली ॥
कृष्णेसि सत्सभेसि स्थालीमहि बहु दयाचि जाणविली ॥२
त्या पात्राच्या कंठीं स्वल्पचि शाकान्न लागलें होतें ॥
मत्परिचर्येंचि जडही समयीं सत्त्वासि जागलें हो तें ॥३८॥
तो यज्ञ-भुक् तशाही त्या शाकान्नासि वोढवी पाणी ॥
कृष्णेकरवीं आपण सांगुनि संकल्प सोडवी पाणी ॥ २९ ॥
प्राशुनि ह्मणे प्रकट हरि विश्वात्मा देव तुष्ट हो येणें" ॥
हळुचि ह्मणे मुनि किति हे? घेउनि शतकोटि तुष्ट हो येणें ३०
कृष्णेसि ह्मणे "बाई बाहुनि आणीव विप्र-कटकातें" ॥
ती सहदेवासि ह्मणे "जा जी क्षुधित मुनिवृंद हटका तें ३१
अघमर्षणींच तो मुनि झाला आकंठ तृप्त सहसा जे ॥

---

१ तें पात्र. २ माझें भोजन होई पर्यंत. ३ सूर्यानें दिलेल्या पात्रांत. ४ विनोद. ५ या थालीची. ६ हे द्रौपदी. ७ सज्जन-समूहाला. ८ अचेतनही. ९ यज्ञभोक्ता. १० पुढें करी. ११ येणें करून. १२ सर्व पापनाश करणारा जपावयाचा मंत्र.

जरि तेजस्वि-तपस्वि- प्रवर च्छळशील दुःसह त्रिजगा ॥
भ्याला त्वत्तेजाला, धर्मा, गेला पळोनि अत्रिज गा॥४९॥
अनलस-समीहित साधी राया, वारा महीवरा, कामा
अनलस मीहि तसा, धी- रा, यावा रामही, वराका मा५०
ऐसें बोलोनि करी स्वजन-घन-श्रीद यानं दीपकसा ॥
भक्तांशि उपेक्षील व्यसनीं तो श्री-दया-नदीप कसा॥५१॥
कीर्ति न देता, देता. जरि ह्मणता श्रीमदत्रिज गदा द्या॥
सोसे स्वच्छळ, न सुहृ- च्छळक-तपःश्रीमद त्रिजमदाद्या॥
धर्म ह्मणे मतिमति सति, संसारामाजि अन्य कुणगा तो॥

१ तेजस्व्यांमध्यें आणि तपस्व्यांमध्यें श्रेष्ठ. २ अत्रिऋषीचा पुत्र दुर्वासा. ३हे धीरा महीवरा राया, जसा वारा अनलसमीहित साधी, तसा मीहि( तुझ्या) कामा अनलस(साधीन.) रामही यावा.मा वराका आहे. हे गंभीर अशा पृथ्वीपते राजा धर्मा, जसा वारा अग्नीचें इष्टकार्य साधितो तसा मीही तुझ्या कार्याला आलस्यरहित होऊन साधीन माझ्या साह्यास बलरामही येईल. आह्मी दोघे आल्यावर लक्ष्मी ही कवडीसारखी अति तुच्छ आहे. जेथें आह्मी दोघे, तेथें लक्ष्मी आहेच, असा भाव. ४ स्वजनांस विपुल श्री ( द्रव्यादि, पक्षीं कांति ) दे-णारा. ५ गमन. ६ श्री आणि दया यांचा समुद्र. ७ दुर्वासा ऋषीनें श्रीकृष्णाच्या हातांतील गदा मागीतली असती तर तीही श्रीकृष्णानें दिली असती. ८ आपल्या सुहृदांचा छळ करणाऱ्या ऋषीचा तपोलक्ष्मीसंबंधी गर्व. ९ लोकत्रयाच्या आधीं झालेला; अशा श्रीकृष्णाला. १० छोटा व्यापार.

केवल अनिष्ट, परि हा बहु धन्य तुझा ह्मणोनि गुण गातो॥
तुजविण न दीपिके साति, कृष्णे तरतों नयज्ञाहि तमातें ॥
करितां जरि तरि गमता कृष्णेतर तो न यज्ञ हित मातें ॥
देव तुझा कैवारी शुद्धें प्रेमें तुझ्याचि वळला गे ॥
दे धेनु दुग्ध धांवुनि वत्सा, इतरा तदर्थ वळ लागे॥ ८९ ॥

# अध्याय ९ वा.



## सारांश.

पाण्डव काम्यकवनांत असतां, आश्रमांत धौम्य व द्रौपदी हीं मात्र होतीं. एके दिवशीं ते मृगया करण्यास गेले होते. त्याच दिवशीं धृतराष्ट्रराजाचा जामाता सिंधुदेशचा राजा जयद्रथ हा, बरोबर सैन्य घेऊन, विवाह करण्याच्या हेतूनें नवरी शोधण्याकरितां, त्या वनांतील आश्रमांत आला. द्रौपदीला पाहून जयद्रथ मोहित झाला. मग तिला आपल्या रथांत घालून चालता झाला. तें वर्तमान पाण्डवांस कळतांच त्यांनीं तत्काळ धांवून जाऊन त्यास धरून धर्माजवळ आणिलें. तो धर्मास शरण आला. त्यास धर्मानें जीवदान दिलें मग जयद्रथ तेथून निघाला. पण मनांत फारच तप्त झाला. तो तसाच गंगाद्वारीं जाऊन तप करण्यास बसला. शंकर प्रसन्न झाला तेव्हां वर मागीतला कीं, पांडवांचा पराभव माझ्या हातानें व्हावा. शंकर ह्मणाला, अर्जुन नसतां, तूं एकदां चौघांचा पराभव करशील. असा वर देऊन शंकर अंतर्धान पावला. व जयद्रथ आपल्या स्थानीं गेला.

१ कृष्णभक्तिरूप जो यज्ञ त्याहून इतर. २ त्या दुधाकरिता.

गायां धृतराष्ट्राचा प्रिय जामाता विवाहकाम वनीं ॥
आला जयद्रथाख्य स्व-बळें-भरें कांपवीत ती अवनी॥१॥
मृगयार्थ पांडुनंदन गेले असतां निजाश्रमद्वारीं ॥
होती उभी द्रुपदजा जैशी शंपा नवांबुभृद्वारीं ॥ २ ॥
तीतें पाहुनि आला तो रावणसाचि पात्र अन्याया ॥
मित्राभि ह्मणे चित्ता हेचि बहुमता, नकोचि अन्या, या
जा कोटिका सख्या, तूं पुस तिचें वृत्त, होय मत्करगा॥
ऐसें आधीं चतुरा सामें निज-कार्य सिद्धिमत् कर गा॥ ३॥
सांगुनि निजवृत्त, तिचें वृत्त पुसे तीस कोटिक विहितसें॥
स्वल्पांत तीहि सांगे, बोलों शकती न कोटि कविहि तसें
कळलें कोटिक-वदनें ती कृष्णा स्व-भगिनी असें नातें ॥
तरि भय न धरी लज्जे- सह, फळ कामातुरीं असेना तें॥६॥
कृष्णेसि ह्मणे "माझी राणी हो, लाजतीस कां? बस ये
अंकावरि येऊंदे; आइक सुखकर मदुक्त थांब मये ॥ ७ ॥
राज्य-च्युत-संग श्रम पात्र करिसि दिव्यदेह कां गे हें ॥
श्रीमद्गेह मिळाल्या सेवावीं निर्धनेंचि कां गेहें ॥ ८ ॥

---

१ हे जनमेजया. २ धृतराष्ट्राची दुःशला कन्या जयद्रथास दिली होती. ३ विवाहाची इच्छा करणारा. ४ जयद्रथनांवाचा. ५ आपल्या पुष्कळ सैन्याच्या योगानें. ६ वीज. ७ नवीन मेघसमूहांत ८ ह्या मला. ९ माझ्या हस्तगत. १० सामोपचारानें. ११ फलद्रूप. वडून येईलसें. १२ पुसण्यास योग्य असें. १३ राज्यापासून भ्रष्ट झालेल्या पांडवांच्या संगतीनें.

त्वां फेडिलेंचि सांचें तत्संगें कृश करूनि देह रिण ॥
हो मद्दयिता, देइन मन तुज, गानासि जेंवि दे हरिण" ९
कृष्णा ह्मणे "कुबुद्धे खद्योतो कीटकाधमीं मलिनीं ॥
द्युमणिप्रति मोडूनि प्रिय-भाव धरील काय रे नलिनी १०
क्षणमात्र स्वप्नींही वरिली कुशलेच्छुनें न विटलीला ॥
हे आवडली बहुधा त्वन्मतिला जीवनासि विटलीला ॥ ११
स्पर्शींच मृति-प्रद हा वीर-परिग्रह महाऽहिचा मणि कीं ॥
अंड-घटीं द्युमणि-द्युति योग्या नांदावयासि कीं मणिकीं
सजिनिल भेट तुज समयीं, सजिति हरि जसे नगासि नग-दाहें
भीम-प्रिया प्रियसखी लवहि न साहेल लंघन गदा हें" १३
कामांध खळ करीना, अन्य करी लेश तरि विवेक पिसा
धावोनि बळात्कारें हां हां ह्मणतांहि तो शिवे कापसा ॥
पावे व्यसन अनाथा जाणों विजनांत तापसी ते तें ॥
खळ दे तिला जसा तो पाप-मति दशास्य ताप सीतेतें १५
कृष्णेनें भोंवि नरक- पाताच्या प्रत्ययासि जड लाहो ॥
ह्मणउनि कृष्ट निजोत्तर- पट आंसुडतांचि दुष्ट पडला हो ॥

१ क्षुद्र किड्याचे ठिकाणीं. २ सूर्याला. ३ जागचें कृत्य. ४ मरणदायक. ५ वीरस्त्री. ६ मोठ्या सर्पाचा. ७ ब्रह्मांडघटांत. ८ सूर्यकान्ति. ९ मडक्यामध्यें. १० सिंह. ११ पर्वतावरील वणव्यानें. १२ मर्कटासारखा. १३ पुढें येणारा नरकपाताचा अनुभव जयद्रथास आतांच यावा ह्मणून इ० १४ जयद्रथानें ओढिलेलें आपल्या अंगावरील वस्त्र.

धौम्यासि ह्मणे "धांवा मजला हें मूर्त पातक विटाळी ॥
रक्षा मज, कीर्तीसहि, कीं स्व-पर-व्यसन-पात कवि टाळी
पुनरपि कपिसाचि पिसा क्षिप्र धरायास तीवर उगारे ॥
तों धांवुनि धौम्य ह्मणे " न उठ धराया सतीवर उगा रे
ती नमुनि ह्मणे "मुनिला न वदावें व्यर्थ दुष्ट हा निपट ॥
वोढिल तरि जीवनही पावेल न एक मात्र हानि पट १९
भवदाज्ञेनें बैसो हे दुष्ट-रथीं वृकोदर-गदासी ॥
न हरि-प्रसाद-कविची आपन्ना खळवृकोदरग दासी २०॥
बसतां स्वरथीं हर्षे तो जेंवि दशास्य जानकी-लाभें ॥
धरि पर-रथासि ती कीं स्पर्शाया अंत्यजा न कीला मैं ॥
ती बहु त्यासि दटावी कापासा काय दापिना कीला ॥
काय बधेल पराला सती त्यजुनि कायदा पिनाकीला २२
दुष्टरथासह धांवत धौम्य मुनीश्वर ह्मणे "अगा राहो ॥
राहो मद तूं न तया जाल्मत्व-ख्यातिच्या अगारा हो ॥
जरि तूल-राशि-मध्य- स्व-बिळीं नेईल आखु वातीतें ॥
तरि वाति आखुतें वा सहसा भक्षील आखु वा तीतें २४॥

१ आपलें व दुसऱ्यानें संकटांत पडणें. २ धांवून जाई. ३ तुमच्या आज्ञेनें. ४ भीमाच्या गदेसारखी. ५ श्रीकृष्णाचा प्रसाद हाच शुक्राचार्य, त्याची. ६ दुःखी झालेली. ७ दुष्टजयद्रथ रूप लांडग्याच्या पोटांत गेलेली. ८ ज्वाला. ९ पार्वती. १० अर्धांग देणाराला. ११ शंकराला. १२ हे राहुदैत्या. १३ नीचत्वप्रसिद्धीच्या. १४ गृहा. १५ कापसाच्या राशीमध्यें असलेल्या आपल्या बिळांत. १६ उंदीर.

रे तत्काळचि साध्वी- धर्षण-कर जरि महातपा मरतो"॥
धौम्य मुनि असें सांगे हित, परि जोडी न हात पामर तो
कृष्णाहि ह्मणे "काय न कांपिल गिळितां वृकाननां शस्त्री
वधि दश-मुखा, मग करिल एकमुखाचाहि कां न नाश स्त्री"
अप-शकुनज्ञ युधिष्ठिर समजोनि अनिष्ट सानुज परतला॥
जो मृगयेंत न चित्तें त्यजुनि दया राम-नाम-जप रतला ॥
तों मार्गी भृत्याची भार्या धात्रेयिकाचि आढळली ॥
धांवे पडेहि असकृत् नगशिखराहूनि जशी शिळा ढळली ॥
वृत्त कथुनि कोपानल दीप्त करायासि पाण्डु-योधमनीं ॥
सरळा सुवंशजा ती झाली धात्रेयिकाचि हो धमनी २९॥
रिपुला गांठाया ते पांडव देती भगं न घटिकेतें ॥
खळ-बळ बहु भी, जाणों न पळहि साधुपुढें अघ टिके तें ३०
गांठिति रिपु-कटकातें हरिणाच्या सिंह जेंवि कळपातें ॥
रक्षील काय पतिला तें व्यसनीं होय जें विकळ पातें ३१
स्वरथा वरूनि भूवरि उतरूनि देवीस, जरिहि नाकद न॥
वरिलें पलायन खळें, कीं न पहावेंचि लोचनां कंदन ३२
धर्म स्वरथीं स्त्रीतें मुनिनें घेउनि ह्मणे "पुरोध्यानें ॥

१ पतिव्रतेचा अपमान करणारा. २ लांडग्याच्या तोंडाला. ३ सेवकाची. ४ सरळ, पक्षीं, निष्कपट. ५ उत्तम वेळूपासून झालेली, पक्षीं, कुलीन. ६ फुंकणी. ७ दुष्ट जयद्रथाचें सैन्य. ८ धन्याचा. ९ पतनानें. १० स्वर्गदायक. ११ मर्दन.

व्हा शांत, असेंचि प्रिय राज्यश्रीमोचनें[1] पुरो, द्या तें"॥
अर्जुन भीमासि ह्मणे " न करावें व्यर्थ भीत-भट-कदन[3] ॥
गेला पळोनि बहुधा दुष्ट जयद्रथ न दाखवी वदन"॥३४॥
भीम ह्मणे "सपुरोहित राया, तूं आश्रमांत जायेतें ॥
निववी तेंचि करावें तेणें जें स्वच्छ कर्म ज्या[4] येतें ॥ ३५॥
जा सहदेवा, नकुळा, तूंही जा. या तिघांसि सांभाळा ॥
लावाया गेलें धन येतां हातासि बोल कां भाळा ॥ ३६॥
येतों आतांचि नको साधाया शत्रुवध मला उशिर ॥
कृष्ण[5] असो, जा, आर्या, त्वच्चरणा[6] तो न अधम लाउ शिर"
धर्म ह्मणे "रे, वा त्या निज-भगिनीच्या न उग्र हो तिलकीं[7]
निज सुता-सौभाग्य- क्षय-शोकें[8] पितर साश्रु होतिल कीं"
कृष्णा ह्मणे "अहो जरि मत्प्रिय करणें, वधाचि तरि त्यातें
मारावेंचि नयज्ञें श्रीतें स्त्रीतें बळेंचि हरित्यातें ॥ ३९ ॥
क्रोशमितांतर[9] असतां बीभत्सु[10] ह्मणे "शरांस कळवा जी ॥
आलों असें अरिस तो दूर न जावा वधा सकळ वाजी॥"

---

१ राज्यलक्ष्मीच्या मोचनानें. २ चिंतन करा. ३ भ्यालेल्या वीरांचा नाश. ४ याचा कर्ता, कर्म. ५ अर्जुन. ६ तो अधम तुला शरण आला असतां, तुला त्याची दया येईल, हा भाव. ७ कुंकुमतिलकाविषयीं कठोर होऊं नको ह्म० पतीला मारून तिला वैधव्य आणूं नको. ८ कन्येच्या सौभाग्याच्या नाशा बद्दल झालेल्या शोकानें. ९ एक कोसभर अंतर. १० अर्जुन.

अर्जुन-नामांकित-शर- हत हय पाहूनि फार तो भ्याला॥
बहु पाप-जीवितहि त्या प्रिय, जेमें पाप-वित्त लोभ्याला॥
धांवोनि त्यासि सार्जुन भीम महाबळ पळांत आटोपी ॥
ज्याचें चित्त ह्मणे "स्व- क्रोधा और्वा खलाब्धि आटो,पी"॥
अर्जुन ह्मणे " उभा रे, सिंहत्व त्यजुनियां न कुतरा हो॥
उतरा हो, क्षण पाहों, जा यम-भटहो, तळीं न उतरा हो
रे रे जयद्रथा हें योग्य नव्हे तुज पलायन परत रे ॥
अभिमुख मरोनि'जरि पळ पळतां न महाबळांयन पर तरे"
भीम रथाकरूनि उडी टाकुनि धांवुनि धरी तया अरितें॥
वाटे प्रभुचें भीमा- कृति खल-बल-दलन-लब्ध-यश अरि तें
व्यसनीं न पडेल कसा व्याघ्र-बिळीं जो मदांध ओतु निघे
कीं पद्मराग मानुनि जो पदरीं विगळांशि ओतुनि घे ॥
बुकली भीम, बुकलिती जेमें यज्ञांत बोकडाला हो ॥
कीं तो साध्वी-धर्षण- दोष-फलाऽनुभव रोकडा लाहो॥४७

१ अर्जुनाच्या नांवानें चिह्नित बाणांनीं मेलले. २ पापकर्मामध्यें घालविलेलें आयुष्य. ३ पापाचरणानें संपादिलेलें. ४ वडवानला. ५ दुष्टजयद्रथ हाच समुद्र. ६ अर्जुन यमभटांस ह्मणाला, उतरा ह्म० मी जयद्रथास आतां मारितों. पुनः अर्जुन बोलला.कीं—क्षण पाहों. ह्म० क्षणभर जयद्रथाची वाट पाहू. ह्म० युद्धांत मरून स्वर्गास जाण्याची त्याची इच्छा आहेकीं नाहीं; तें पाहू. इ०, ७ बलाढ्य. ८ दुष्टाच्या सैन्यनाशापासून मिळविलें यश ज्यानें, तें. ९ सुदर्शन चक्र. १० बोकोबा. ११ पतिव्रतेच्या स्पर्शाच्या दोषाचें फळ, त्याचा अनुभव.

विकळ जयद्रथ होतां　वारी धर्मानुजा गुडाकेश ॥
कीं तत्सत्सेव्यगुणा　कोप न दूपू, जसा गुडा केश ॥४८॥
भीम ह्मणे "गुरु-दुःखद तो स्त्रीजितसाचि, हा दयाजित कीं
चालों न देचि कर्मे　मी करितों जीं हितोदया जितकीं ॥
हा धर्म दया-जित तुज　योग्य सखा स्त्रीजिता दशरथा रे
शर सह्य पार जातां, त्वद्दयींच जनापवाद-शर थारे ॥५०॥
वत्सा, जैसा तो गुरु　होतोसि तसाचि तूंहि कां ? पावें ॥
या पापातें पाहुनि　सन्नयनें न, नरकेंहि कांपावें ॥ ५१ ॥
देवूंदे प्राणान्त-　प्रायश्चित्त स्वकीय हा नर कीं ॥
मूर्खाहि सुत्दृद्र वसावा स्वर्गीं चिरकाळ, कीं महानरकीं॥५२
वधसम विडंबन, असें　समयींच स्मरण शास्त्र-पाटव दे ॥
अर्धेंदुशरें त्याच्या　माथां काढूनि पांच पाट वदे ॥ ५३ ॥
'मी पांडवदास' असें　स्व मुखें सर्वत्र बोलशील तरी ॥
देईन जीवित तुला,　तारी विपदब्धिमाजि शीलतरी" ५४
वंदुनि ह्मणे जयद्रथ　ऐसेंच ह्मणेन मी सदा साचें ॥
मारूं नका बुक्यांनीं　रक्षावें जीवित स्व-दासाचें ॥ ५५ ॥
ज्यापासूनि धरावी　प्रबळ-तरारातिच्याहि भी मानें ॥
बांधुनि केतुस्तंभीं　खळ नेला स्वाश्रमासि भीमानें ॥ ५६॥

१ अर्जुन. २ त्याच्या, सज्जनांला स्वीकारण्यास योग्य अशा गुणाला. ३ दशरथ. ४ केकेयीनें जिंकिलेला. ५ धर्म. ६ शास्त्रनिपुणत्व. ७ सुस्वभावरूप नौका. ८ अतिबलाढ्य शत्रुच्या. ९ गर्वानें.

प्रेपूनि कोटरेतें प्रेम्यानें जेंवि बाण राखविला ॥
तैसाचि निजाज्ञेनें जणें तो या प्रभूंसि दाखविला ॥५७॥
धर्म तशासि विलोकुनि भीमासि ह्मणे "अगा, महाबाहो॥
सोड, न विलोकवे मज ध्याया असु मृत्युला न हा बाहो"५८
भीम ह्मणे "देवीला' सांगा, ती जरि ह्मणेल, सोडीन ॥
नाहीं तरि मी याचा सतंचलैकपे पाणि तोडीन ॥५९॥
कां सोडितां, असो द्या, हा निजदासांत दास रावावा॥
या कामहता रक्षा, पायांचा याचि आसरा बावा"॥६०॥
कृष्णा धर्मासि ह्मणे "देवा, सोडावयासि सांगा जी ॥
मज देखवे न शिवती निर्दयतेसह अकीर्ति आंगा जी"६१
धर्म ह्मणे "रे साधो, जाऊंदे सोड दे मला, वा हें ॥
जातें सजुनि भलेपण, न विटावें सुयश तें, तया वाहें"६२
भीम ह्मणे "मी पांडव- दास, असें तीन वेळ सोड्यानें ॥
हा खळ ह्मणो, भल्याला विनवावें धरूनि पाय खोट्यानें"
धर्म ह्मणे "गा भीमा, तुज जरि आह्मी प्रमाण, तरि सोडीं॥
नवदें निष्ठुर कांहीं अभय-वितरणें सदीड्य यश जोडीं"

१ पाठवून. २ श्रीकृष्ण व बाण ह्यांचे युद्धांत बाणाचा नाश होतो असें पाहून बाणाची माता कोटरा नग्न होऊन श्रीकृष्णापुढें उभी राहिली. तेव्हां श्रीकृष्णानें मान खालीं घातली. तेणें करून बाणाचें रक्षण झालें. ( बृहद्दशम अ० ६३ पहा. ) ३ पुत्रप्रेम्यानें. ४ श्रीधर्माला. ५ सतीचा पदर ओढणारा. ६ दानानें. ६ सज्जनांनीं स्तवन करण्यास योग्य.

भीमें गुरु-मंत्र-वश- व्याघ्रें मृगसाचि सोडितां नमनें ॥
धर्मासि करि, वरि लवे मात्र शिरें, दुष्ट अंतरीं, न मनें ६५
नृप त्यासि ह्मणे "घ्याया भुजगीच्या शेंवतां नर मणीतें ॥
वांचेल, परि पराच्या चित्तेंहि स्पर्शतां न रमणीतें॥ ६६॥
जा, यावरि न करावें पाप, असें मागतों, मला दे हें॥
जें कर्म धर्म-शर्मद त्यासीच संपादितो भला देहें"॥ ६७॥
खल न खलत्व त्यागी जरि सामें गौरवूनि बोळविला ॥
लकुच कटुचि अमृतकरा- करवींही शर्करेंत घोळविला ॥
हर दर्शनार्थ गंगा- द्वारीं तपतां तया कृपाकर तो ॥
भेटोनि ह्मणे "घे वर कष्टापासोनि मति नृपा परतो"॥६९
"युद्धांत पांच-पांडव- परिभव हो मत्करें" असेंच वदे ॥
प्रभु-कर्णीं तें बहु कटु वच, जाणों गर मुखीं रसें चव दे७०
शंभु ह्मणे "नारायण- सख नर अर्जुन पुराणऋषि, तातें॥
धनसें पाशुपतहि म्यां त्यासि दिलें, जेंवि अमृत तृषितातें॥
मजपासीं तुज द्याया तद्भंगावह असा नसेच वर ॥
हो मशक-मक्षिका-हर गरुडा नाशी असें नसे चवर॥७२॥
यश एकदाचि अर्जुन- रहितहि चवघां रणांत भंगुनि घे ॥
मेरु असो बहु हेंही, जरि लंघुनि कुळगिरींशि पंगु निघे"

१ सुखदायक २ ओटवनामक वृक्षाचें फळ. ३ पृथ्वीला आधारभूत सातपर्वत आहेत, त्यांतील प्रत्येक.

महेंद्रो मलयः सह्यः शुक्तिमान् ऋक्षपर्वतः ॥
विंध्यश्च पारियात्रश्च सप्तैते कुलपर्वताः ॥

झाला गुप्त महेश्वर तो बालिश मनुजदेव वेदा त्या ॥
प्रभुसहि विटवी मागुनि जें, तैशाही न देवते दात्या ॥ ७४ ॥
मागावा कामाद्यरि- परिभववर वरद-नायका परि तो ॥
मत्-परिभव-वर मागे, खळ न पराहित, निजाहितहि करितो
स्वगृहा जाय जयद्रथ विसरोनियां दुःख नें परिभवाचें ॥
दामासमंज त्वें क्षोभे मन शांतही परि भवाचें ॥ ७६ ॥

# अध्याय १० वा.



## सारांश.

जयद्रथानें द्रौपदीहरण केलें. त्यामुळें शोकाकुल होऊन धर्मानें मार्कंडेयाला प्रश्न केला कीं, माझ्या सारखा शोक कोणास झाला होता काय ? तें एकून मार्कंडेय ह्मणतात. इक्ष्वाकुलांत दशरथ राजा झाला. त्यास कौसल्येपासून राम, कैकयीपासून भरत; व सुमित्रे पासून लक्ष्मण व शत्रुघ्न असे चार पुत्र झाले.

ब्रह्मदेवाचा मानसपुत्र पुलस्त्यऋषि, त्याचा पुत्र कुबेर हा त्याचा त्याग करून तो ब्रह्मदेवास शरण गेला. तेणें करून पुलस्त्यऋषीला क्रोध आला. पुत्राचा छळ करण्या करितां, त्यानें दुसरा जन्म घेतला. त्याचें नांव विश्रवा.

१ वेदरूपी अशा श्रीशंकराला. २ कामादिषड्रिपूंच्या पराभवाचा वर. ३ वर देणाऱ्यांत श्रेष्ठ, अशाला.

ब्रह्मदेवानें प्रसन्न होऊन कुबेराला, अमरत्व, सोन्याची नगरी लंका व श्रीशंकराशीं सख्य असें दिलें. कुबेरानें, पित्याचा आपणा वरील राग दूर व्हावा ह्मणून त्याच्या सेवेला तीन राक्षसीकन्या दिल्या. त्यां पैकीं पुष्पोत्कटेपासून विश्रवा यास रावण व कुंभकर्ण असे दोन पुत्र झाले. मालिनीपासून बिभीषण झाला. व राकेपासून खर व शूर्पणखा अशीं अपत्यें झालीं. बिभीषण हा फार साधु होता.

रावणादिकांस कुबेराचें ऐश्वर्य पाहून फार वाईट वाटलें. व तें आपणांस प्राप्त व्हावें ह्मणून रावणकुंभकर्णांनीं तीव्र तपस्या केली. हजार वर्षे तप झालें ह्मणजे रावणानें आपलें एक मस्तक कापून त्याची आहुति द्यावी. या प्रमाणें त्यानें आपलीं नऊ मस्तकें कापिलीं. दहावें शिर कापणार, तों ब्रह्मदेव प्रसन्न झाला. आणि ह्मणाला, मनुष्य व वानर यां शिवाय तुला कोणाचेंही भय नाहीं. कुम्भकर्णास महानिद्रा दिली. बिभीषणास धर्मबुद्धि, ब्रह्मास्त्रस्फूर्ति व अमरत्व दिलें. मग ब्रह्मदेव स्वस्थानास गेला.

वर मिळतांच रावणानें प्रथम कुबेराचें ऐश्वर्य हिरावून घेतलें. व त्रैलोक्यास अत्यन्त त्रास दिला. देवादि, ब्रह्मदेवास शरण गेले, ब्रह्मदेवानें त्यांचें समाधान केलें. ईश्वर, दशरथाचा राम नामें करून पुत्र झाला आहे. त्याचें साह्य करण्याकरितां तुह्मीही वानररूपानें अवतीर्ण व्हा. रामाच्या राज्याभिषेकास विघ्न करण्या करितां दुंदुभिनामक गंधर्वस्त्रीनें मंथरा व्हावें. असें सांगून ब्रह्मदेव अंतर्धान पावला. व देवही स्वस्थानीं गेले.

इकडे विश्वामित्रानें आपल्या यज्ञरक्षणार्थ रामलक्ष्मणांस मागून नेलें. रामानें तेथें यज्ञास विघ्न करणाऱ्या राक्षसांचा सं-

हार केला. मग विश्वामित्राचा यज्ञ निर्विघ्नपणें शेवटास गेला.

जनकानें विश्वामित्रास सीतास्वयंवरास बोलाविलें, तेथें विश्वामित्र रामलक्ष्मणांसह गेला. रामानें शिवधनुष्य उचलून सीतेला वरिलें. मग राम अयोध्येस आला.

दशरथराजानें रामास राज्याभिषेक करण्याची तयारी केली, तेव्हां कैकेयीची दासी मंथरा हिनें कैकेयीस सांगितलें कीं, रामास चवदा वर्षें वनास पाठवावें व भरतास राज्य द्यावें असे दोन वर तूं राजा जवळ माग. कैकेयीनें वर मागितले. तेव्हां राम, सीता व लक्ष्मण ह्यांसह वनास गेला. भरतानें राज्यस्वीकार केला नाहीं. त्यानें कैकेयीची फार निंदा केली. व तो रामाकडे निघून गेला. त्यानें रामाच्या पादुका आणून सिंहासनावर ठेविल्या. व प्रधानांकडून राज्यकारभार चालविला. व आपण नंदिग्रामीं राम येईपर्यंत तपश्चर्या करीत वसला.

**मार्कण्डेयाशि ह्मणे धर्म, बुडालों अगाध-शोकांत ॥**
**सांगा मत्सम मदधिक जरि दृष्ट श्रुत असेल लोकांत[१] ॥१॥**
**त्या धर्माला श्रीम- द्रामकथा साङ्ग होय परिसविता ॥**
**भगवद्यश कथिताचि त्रिजगद्बंधु, न तमोघ्न परि सविता २**
**इक्ष्वाकु-कुलज दशरथ राजा, तत्कीर्ति विष्टपीं[२] सुतता ॥**
**स्वीकारिली तयाची साक्षात् श्री-प्राण-वल्लभें[३] सुतता[४] ॥३॥**

---

१ भुवनांत, २ अत्यन्त विस्तृत. ३ श्रीविष्णूनें. ४ पुत्रत्व.

कौसल्या-सुत राम प्रभु, कैकेयीजं[1] कीर्तिलो[2] भरत ॥
पुत्र सुमित्रेचे ते लक्ष्मण शत्रुघ्न कीर्ति-लाभ-रत ॥ ४ ॥
एकचि देव चतुर्धा यापरि त्या रविकुळांत अवतरला ॥
यन्नामें विष-पान- व्यसनीं[3] ह्मणती कवींद्र भव तरला ॥ ५ ॥
मुनिवर पुलस्त्य; तत्सुत वैश्रवण[4], त्यजुनि त्यां[5] दया-निधिला
पद्माला भृंग तसा तो नित्य भजे पितामहा विधिला[6] ॥ ६ ॥
सुत पीडाया देहा- न्तर घे तो ख्यात विश्रवा नावें ॥
रसिक कवींनीं त्याचें तेंहि चरित अमृतमिश्र वानावें ॥ ७ ॥
वरदें विधिनें दिधली वैश्रवणा अमरता, कनक-लंका, ॥
सख्यहि तेणें देवें[7], नाशी ज्याचें विलोकन कलंका ॥ ८ ॥
तो विश्रवा पिता न क्षोभावा ह्मणुनि राक्षसी कन्या ॥
सेवार्थ दे तिघी त्या ज्या बहु आराधिती तया धन्या ९
तो विश्रवा ह्मणे "वर मागा" ऐसें तिघींसहि, तदा त्या ॥
सुत मागती प्रसन्ना मुनिला जोडोनि हात हित-दात्या १०
पुष्पोत्कटेसि दिधले सुत, दशमुख कुंभकर्ण या नावें; ॥
साधु विभीषण मालिन्यात्मज, ज्या त्रिभुवनेंहि मानावें ॥ ११
खर, शूर्पणखा, झालीं दोन अपत्यें तिज्याहि राकेला ॥
ज्यांहीं लज्जित दावुनि त्हृत्काठिन्या[8] निजा हिरा केला १२
एका काळीं धनपति पाहुनि ते दशमुखादि तळमळले ॥
साधूत्कर्षासहन- त्वें केव्हां कोणते न खळ मळले ॥ १३ ॥

---

१ कैकेयीपासून झालेला. २ वर्णिला. ३ शंकर. ४ कुबेर. ५ पुलस्त्याला. ६ ब्रह्मदेवाला. ७ श्रीशंकराशीं. ८ त्हृदयाच्या कठोरपणाला.

शुभ-काम बिभीषण;दश- मुख कुंभश्रुति कुकाम हे भारी॥
तप करितां भय देती विप्रांशि जसे वृका महेभारी॥१४॥
खर, शूर्पणखा, त्यांची सेवा करिती जपोनि, धीरानीं॥
आराधिला तपें विधि, न तसे तपले तपोनिधी रानीं॥१५॥
एक-सहस्राब्दांतीं शिर दशवदनें स्वयेंचि कापावें ॥
तें होमूनि ह्मणावें पद्मभवा वरदनायका पावें ॥ १६ ॥
भेटे प्रसन्न विधि त्या दशकंठा कापितांचि दशमातें ॥
वारुनि ह्मणे "ह्मणोतें न या कर्में निर्दय त्रिदश मातें॥१७॥
वर एका अमरत्वा- वांचुनि देतों समस्त, माग मला ॥
वत्सा, वद हें तप गुरु भार मज तुझ्या गुरूत्तमा गमला१८
येतिल शिरें, विरूप न दिसमिल,होसील काम-रूप-धर॥
जेता रणीं अरीचा स्थैर्यें जसा महीध्रे भूप-धर" ॥ १९॥
रावण ह्मणे "प्रभो, मी सादर ऐसा तपीं असें देहें ॥
अमरत्व न देसी जरि तरि मजला मागतों असें दे हें२०
असुर-सुर-यक्ष-राक्षस- किन्नर-गंधर्व-सर्प-भूत-गणें ॥
मत्परिभव न करावा हे माझ्या शासनांत भू तगणें"॥२१

१ कुंभकर्ण. २ लांडग्याला. ३ महागजाचा शत्रु सिंह. ४ जितेंद्रियांनीं. ५ एक सहस्र वर्षांच्या अंतीं. ६ हे ब्रह्मदेवा. ७ दहाव्या शिराला. ८ देव. ९ तुझा श्रेष्ठ गुरु मी, त्या मला. १० इच्छेस येईल तें रूप धरणारा. ११ जिंकणारा. १२ पर्वत. १३ गजांना धारण करणारा. १४ पृथ्वी.

ब्रह्मा ह्मणे "मनुष्या- वांचुनि जे कीर्तिले तुवां सारे॥
यांपासूनि नसो भय, परि न नरां वानरांसि हांसा रे १२॥
घटकर्ण[2] महानिद्रा मागे, जोडनि हात दात्यातें॥
मंदा मृदु झोळी तैसी दे तीच हा तदा त्यातें ॥ २३ ॥
परमापदेंतही मति धर्मींच रतो अशिक्षितचि देवा ॥
ब्रह्मास्त्रहि स्फुरो, हें द्या, गुरुजी, साधुंची घडो सेवा" २४॥
मागे असें विभीषण, सांशि ह्मणे ब्रह्मदेव "वत्सा, हें ॥
घे, अमरहि हो, व्हाया सुयश ब्रह्मण्यविष्णुवत् साहें ॥ २५
विधि, वर देउनि जातां करुनि रणीं कीर्ति-हानि धनपतितें
प्रथम पराभविलें त्या दशकंठें व्हावया निधन पतितें॥२६॥
पुष्पकविमान, लंका, हरितां धनपति, ह्मणे कुल-कलंका
त्रासें संप्रति, हर्षें मग, पोपू त्वत्क्षयें पुलकें लंका ॥ २७॥
मल्लोचनीं निरखिले बहु, परि कुतराचि यागग न, यानीं॥
योग्य नव्हेसि बसाया पापा तूं तेंवि या गगनें-यानीं २८॥
वाहेल तुज न पुष्पक, जो तुज मारील सांशि वाहेल ॥
करितोसि गुर्वतिक्रम परि हरि या दुर्मदा न साहेल॥२९॥
शापुनि धनप मनि ह्मणे " अनर्थीं हा शक्तिसंपदंध रतो॥
परिभवुनि अग्रजातें लंका-पति होय पंक्ति[13]-कन्धर तो ॥

१ सांगितले. २ कुंभकर्ण. ३ महानिद्राच. ४ न शिकविलेली. ५ विष्णूसारखें. ६ मरण. ७ रोमांच. ८ माझ्या डोळ्यानीं. ९ यज्ञांत गेलेला. १० या नेत्रांनीं. ११ विमानांत. १२ बलरूप ऐश्वर्यानें अंध झालेला. १३ दशमुख-रावण.

केवळ विशृंखळ खळ खळ-बळ-जलनिधि दशास्य तो यत्नें॥
आक्रमुनि सुराऽसुर-नर- नाग-वरांतें हरी धनें रत्नें ॥३१॥
लोक-विनाश-करत्वें रावण हें नांव पावला खलधी ॥
पळ धीर वीर-हृदया स्वास्थ्य न दे तो कुबुद्धिचा जलधी
जाऊनि सत्यलोकीं ब्रह्मर्षि सुरर्षि सिद्ध बहुधा सा ॥
पीडा पावक-वदनें कळविति हा हा ह्मणोनि बहु धासा॥
ब्रह्मा ह्मणे "सुराऽसुर साहेल रणांत त्या न मत्तातें ॥
तन्नाशार्थ तरणि-कुल केलें जन्मोनि धन्य मत्तातें ॥३४॥
म्यां विनविला स्वगुरु कीं हो नर-रूप, न ह्मणोत तापस हा
प्रभु झाला दशरथ-सुत, करिल सुखी,स्वल्पकाळ ताप सहा"
ब्रह्मा शक्रासि ह्मणे "प्रभुला व्हाया सहाय ऋक्षींतें ॥
द्या काम-रूप-बळ-सुत करिजे जें चन्द्रकार्य ऋक्षीं तें३६॥
अमित-बळ सुर-सुतांतें क्षिप्र प्रसवोत वानरी हित, मी ॥
कथितों प्रभु-दास्य-रता प्रजा न ज्या बुडति सा नरींहि तमीं
सुर-कार्य-सिद्धि व्हाया गन्धर्वी दुन्दुभीहि आठविली ॥
युक्ति पढवुनि प्रभुनें कैकेयीच्या समीप पाठविली ॥३८॥
कामबळ कामरूप त्रिदशांचे वानरर्क्षतनु सुत ते ॥
दुःसह अलंघ्य सकळा कल्पांतींचे जसे जलधि-उत ते३९॥
निर्मुनि अपत्य हर्षें सर्वहि शक्रादिदेव तो कपिसें ॥
हरि-दास्य यल्ललाटीं धन्यचि तें जरि असेल तोकं पिसें॥

१ सूर्यवंश. २ श्रीविष्णूनें. ३ आस्वलींना. ४ वानर व आस्वल यांच्या तनु धरणारे. ५ बालक. ६ रावयामास लोकान् यत्तस्माद्रावण उच्यते.

काळीं ढुस्स चरांजनें- नग-शिखरेंशीं विवूकि आसविलें ॥
देवांनीं हिमगिरिला क्षीरधिला स्वयश तुच्छ भासविलें
देहें कुब्जा नामें झाली ती मन्थराभिधा, नातें ॥
कैकैयीशीं लावी साधाया कार्यसंविधानातें ॥ ४२ ॥
श्रीगाधिज-मुनि ध्याया सत्कविवृन्दांस सुमहिमा गाया ॥
दशरथ-मधुपाप्रति ये प्राप्त-सुत-सुरद्रुसुमाहि मागाया ४३॥
दे राम लक्ष्मण मखं- त्राणार्थ असें तयासि तो यांची ॥
ओपी नृप जेंवि पिता निज पात्री मरुपथांत तोयाची ४४
तो अतिथि तृप्त सुज्ञें अर्पुनियां तें स्व ताट केला हो ॥
जातां पथीं मुनि ह्मणे "रामा, सद्गतिद ताटकेला हो" ४५
तीतें या मुनिवचनें मारी तो, न रघुराज नय शोधी ॥
कीं जो गुर्वाज्ञापर सर्वहि होतो खरा जन यशोधी॥४६॥
मुनिदत्तास्त्राशीर्धन जोडुनि सिद्धाश्रमासि तो पावे ॥
मारी मखघ्न राक्षस कीं संत खळांपुढें न लोपावे ॥४७॥
जनक-मखाप्रति जातां श्रीराम करूनि वंदन वदान्या ॥
त्या गुरुसि ह्मणे "आज्ञा मागाल असें कदापि नवदा,न्या
गाधिज रामाकरवीं मार्गीं गौतमसतीसि उद्धरवी ॥

---

१ चालणारीं पर्वतांचीं शिखरं. २ कार्यनिर्वाहाला. ३ प्राप्त झालेलें, पुत्ररूप वृक्षाचें फूल. ४ यज्ञरक्षणार्थ. ५ मागे. ६ पिणारा. ७ उत्तम गति देणारा. ८ गुरूच्या आज्ञेंत तत्पर. ९ विश्वामित्रानें दिलेलें, अस्त्रें व आशीर्वाद, हेंच धन. १० अहल्येला.

मानी तत्पोदास स्व-कर-सहस्रापरीस शुक्र रवी ॥ ४९ ॥
मुनि जनकाभि ह्मणे "हो के हरितें धन्वि-गर्व यो धनु तें"
आणवितांचि उचलिलें रामें शर्वादि-सर्व-योध-नुतें ॥५०॥
गुण जोडूनि सलील प्रभुनें आकर्षितांचि भंगे तें ॥
तद्रव न मुनि-सभेसचि; कांपवि विभु-मुर्धगांहि गंगेतें॥५१॥
होता कठिन पण, पण प्रभु पुरवुनि होय जानकीजानी ॥
झाले उदश्रु, धरिली होती हृदयांत जानकी ज़ानी॥५२॥
जनकें चवघी कन्या दिधल्या रामासमेत चवघांस ॥
ते दृष्टिस देति, तसे अमृतांचेहि न जिभेस चव ग्रांस५४॥
भग्न-गुरु-धनुर्ध्वान- श्रवणें भार्गव धरूनि ये कोपा ॥
स्वर्णांहि पराभविला जो न क्षत्रें करूनि येकोपा ॥ ५४॥
आला ह्मणत असें कीं "विजय-श्रीचा असेंच नवरा मी"॥
परि त्या चालेल अनर्व- रामाचें तेज काय नव-रामीं५५॥
श्रीरामाला दशरथ द्यावें युवराज्य-पद असें योजी ॥
गुरु सचिव ह्मणति"इच्छित होतों कीं हेंचि तव मना योजी"
अभिषेकनिश्चय करुनि करवी साहित्य सर्वहि तदा तें ॥
वाटे न मंथरेच्या- चि मना आनंद-पर्व हित-दातें ॥५७॥

१ श्रीरामपादाला. २ धनुर्धरांचा गर्व. ३ येवो. ४ शंकर आदिकरून सर्व वीरांनीं स्तविलेला, असा. ५ लीलेनें. ६ त्याचा ध्वनि. ७ शंकराच्या मस्तकावरील.८ जानकी जाया ज्याची, तो. ९ अश्रुयुक्त. १० रामानें मोडिलेल्या, शंकराचे धनुष्याचे शब्दानें. ११ परशुराम. १२ क्षत्रियजातीनें. १३जुन्या रामाचें.

ती कैकेयीस ह्मणे  "दासत्व तुझ्या सुतीं न यो, द्या हो॥
कल्याण कुमाराचें,  भवदाज्ञावर्तिनी अयोध्या हो ॥ ५८॥
विश्वास काय यांचा?  सुविषम होतात नर सदा समही ॥
गुर्वऽनुमतां[2]ऽनुसरणें-  करुनि मग बिटेल न रसदा[3]स मही५९
दायाद-दास्य[4]-दहनीं  वेडे करिशील आज्य[5] भरतातें ॥
होसिल विपक्षदा[6]सी  देतां रामासि राज्यभर तातें ॥ ६०॥
ज्यां[7] प्रभुला धन्य ह्मणत  होत्या कवि-साधु-सुर-सभा, केला
वश तो कैकेयीनें  घेउनि, बोलोनि सुरस, भाकेला ॥
'वर माग, असें ह्मणतां  मागे प्रिय काम हा शुभर्ता[8]तें ॥
"द्या चवदा वर्षे[9] वन  रामातें,राज्य आशु भरतातें"॥६२॥
कैकेयीच्या आलें  जों ऐसें दारु[10]णोक्त तोंडास ॥
त्या दशरथ-त्हृदयाचा  घे मोह-महाभुजंग तों डास ॥६३॥
वरदानवृत्त परिसुनि  वदला तो यापरि स्व-जन-कवच[11] ॥
हो राज्य-भ्रष्ट तनुज.  परि सत्वभ्रष्ट न स्व-जनक-वच॥६४॥
संत ह्मणति संततिहुनि  संसारीं प्राज्य[12] सार सत्या[13]गी ॥
ती गुरुची न मळाया  राम-मधुप राज्य[14]-सारस त्यागी॥६५॥
जनकादि-गुरुजनांतें  वंदुनि रघु-वंश[15]-पद्म-भानु निघे ॥

---

१ तुझ्या आज्ञेंत वागणारी. २ गुरुदशरथाच्या अज्ञेस अनुसरण्यानें. ३ प्रीति देणाराला. ४ भाउबंदांची सेवा हाच आग्नि, त्यांत. ५ तूप. ६ शत्रूची दासी. ७ दशरथाला. ८ मंगलकार्यांत निमग्न झालेल्या दशरथास. ९ लौकर. १० भयंकर वचन. ११ स्वजनाला कवचासारखा. १२ पुष्कळ. १३ वाणी. १४ राज्य हेंच कमल. १५ रघुवंश हेंच कमल, त्याचा सूर्य.

वनवासातें परमाऽनुग्रह ऐसें मनांत मानुनि घे ॥ ६६ ॥
लक्ष्मण निघे पदाधिक जाणुनि तत्पादसुपरमाणूस ॥
त्यजिल गुरुभजन कैसें हें आर्यकिस्याहि उपर माणूस६७
श्रीराम ह्मणे "मदधिक गुरुचरण त्यजुनि काय निघसी ते"
लक्ष्मण ह्मणे "भजावें गुरुचरण त्यजुनि काय? निघ सीते"॥
सीता ह्मणे "त्यजावी हे न, न चपलेसही वनदं सोडी ॥
यद्यपि झडती जड ती, आपण उबगे पटासि न, देसोडी६९
जाय प्रसन्न-वदन श्रीराघव अकृत-कुत्स वनवासा ॥
कीं मानिला प्रभु-मनें तो देसवटाँहि उत्सव नवासा ॥७० ॥
भेदूनि काळिजाला गेला लोकाऽपवाद-शर, थानें ॥
शिशुसा, रामें त्यजितां त्यजिले स्व-प्राण त्या दशरथानें ॥
दूत प्रेषुनि मातुल- नगराहुनि भरत शीघ्र आणविला ॥
कैकेयीनें स्वमुखें सर्वहि वृत्तांत त्यास जाणविला ॥ ७२ ॥
भरत ह्मणे "शिव! शिव! ईह केयमपूर्वेदृशी कुशीला हो ॥
वत्सा शत्रुघ्ना वद हीतें, आलों जिच्च्या कुशीला हो॥७३॥
जा वेडया तशिन दिसो दुर्वृत्ता राक्षसीच हे तीची" ॥
आकृति धरली बरवी वर, वीरा, आंत औलि हेतीची"७४
गेला विचार न करुनि केंवि अहो पुष्करांक्ष! सीमा या ॥

१ राज्यपदापेक्षां. २ रामाच्या पायांच्या धुळीला. ३ विघ्नेला. ४ कंटाळे. ५ वस्त्रादिकांची दशी. ६ नाहीं केली, निंदा ज्यानें, तो. ७ देशाचा भाग. ८ येथें भूलोकीं. ९ का-इयं-अपूर्वा-ईदृशी. कोण ही अपूर्व अशी. १० दुष्ट स्वभावाची. ११ तीच. १२ सखो. १३ खड्गाची. १४ रामचंद्र. १५ मेघ.

तुमच्या साधुत्वाची, माय न हे शुष्क राक्षसी माया॥७५॥
वरिली कां हे निज-कुल- सर व्हाया शुष्क राक्षसी तातें॥
जेणें गुरु हानि करिति कां लक्ष्मण पुष्कराक्ष सीता तें॥
गे कौसल्ये माते दायादत्वें न साच हा रामीं॥
घेइन टाकुनि चिंता मणिहार करोनि काच-हारा मी७७
आण तव पदाची मज अवगत नव्हताचि हा विनाश-पथ
त्यागीन प्राणातें जरि तुज मद्बुद्धि दाविना शपथ"७८॥
कौसल्या त्याशि ह्मणे" वत्सा तुज तों असें न वाटावें॥
बा ठावें त्वन्मन मज सर मीनाच्या मतें न आटावें॥७९॥
एकात्मे साधु तुह्मी, ऐसे तों एकिलेहि न भ्राते॥
जे इतर सहज विषया- स्तव बहु घेती करूनि बभ्रा ते८०
कैकेयीच्या मतिचें कृत्य न, मन्नियतिचेंचि ताता तें॥
बहु दुःख हें त्यजुनि मज आपण वरिली तुझ्या चिता तातें
वत्सा भरता ज्यांचा मार्दव-लेशहि नसेचि नवनीतीं॥
वत्साचीं पदपद्में कैशीं भ्रमतील निर्जन-वनीं तीं"॥८२॥
करुनि क्रिया पित्याची गेला तो श्रितभवाब्धिसेतुकडे॥
पौर सचिवहि अयाचे तच्चुंबक-मणिकडे जसे तुकडे॥८३॥
धांवुनि गळांचि पडली होती जी राज्यभू तिला भरत॥
झिडकारूनि निघे कीं राम-पद-प्राज्य भूति-लाभ-रत॥
रामासि चित्रकूटीं जैसा गाईस तर्णक वनांत॥

१ अश्रितांस संसारसमुद्राच्या पलीकडे नेणारा सेतु राम, त्याकडे. २ लोखंडाचे. ३ रामपद हाच मोठा ऐश्वर्यलाभ, त्यांत रत. ४ वत्स.

भेटे निवे तदुटजीं तो ज्यापरि रसिक-कर्ण कवनांत॥८५॥
राम-पदीं भरत मिठी घाली क्षतकंटकी तदपि त्याचें ॥
तें माने तन्मतिला, निष्कंटकहि न रुचे पद पित्याचें ८६
अंकीं घेउनि रडत्या निज-शिशुतें पुसुनियां वदन तातें ॥
जें सुख द्यावें, दिधलें श्रीरामें तेंचि त्या पदे-नतातें ॥८७॥
हे बंधु स्नेहामृत- रत सुरसिक, अमृत-रत न सुरसिक ते ॥
न कदापि अर्थशास्त्रें कवि-गुरुपासूनि असुर सुर सिकते"॥
भरत कथी स्वागमना- वधि तैलीं तात-काय होता तें ॥
राम ह्मणे " हा त्यजिले मच्छोकें प्राण काय हो तातें८९
हा तात, हा नृपोत्तम, हा वत्सल, हा प्रभो, असेंचि रडे ॥
प्रभुचें गुरुशोक भरें त्हत्कंज महोपलें तसें चिरडे ॥ ९०॥
यच्चरणसरित्तटमृत- सुकृतें गीचेंहि न करकंज लिही ॥
तो, स्मृतिनें अमृत दिलें ज्या, त्या दे पिंड तिळहि अंजलिही
प्रार्थुनि तो भरत ह्मणे " अमृत-रसहि मज तुह्मांविना कुचेला
काढा क्षिप्र अयोध्यां- त्हृद्गत-निज-विरह-वज्र-शंकु, चला॥
राज्यश्रीस वळविता तूं जेंवि इभीस अंकुश तसाच ॥
मृगराज तूं, त्वदाज्ञा- कर आह्मी सर्व रंकुशत साच"॥९३

१ क्षतें व कांटे यांनीं युक्त. २ आपण येईपर्यंत. ३ हृदय-कमल. ४ मोठ्या दगडानें. ५ ज्याच्या चरणांपासून निघालेल्या नदीच्या ( भागीरथीच्या ) तीरीं मृत आलेल्या जनांचीं पुण्यें. ६ हस्तकमल. ७ रामस्मरणानें. ८ मोक्ष. ९ काजरा. १० अयोध्येच्या हृदयांतील, तुमचा विरह हाच वज्राचा खिळा. ११ हत्तिणीला. १२ हरिणांचें शतक.

श्रीराम ह्मणे " वत्सा वेदोक्त तसें गुरूक्त सन्महित ॥
त्वां म्यांहि चालवावें, या रविवंशीं तरीच जन्म-हित ९४
न मिळे गुरूक्त-धनुर्षीं जो गुण तो व्यर्थ लाखवावें हो ॥
वचन करूनि परलोकीं तरी सुख जनित्यासि दाखवें हो
व्यसनीं बुडों दिल्हें निज- जीवितहि, बुडों दिल्हें न यश तातें
वत्सा, पहा विचारुनि हेंचि सुसंमत असे नयशतांतें॥९६॥
साकेतीं वस, मज हें दे, मीच वनीं असेन, चवदावें ॥
सरतां येईन, उगा, कोणींहि नको असें नच वदावें ॥९७॥
भरत ह्मणे " तरि हें श्री- पदयुगें संपादु काम हा, यास॥
न शिवोंदेऊत पदीं वैसुनियां पादुका महार्यास ॥ ९८ ॥
तें सिंहासन भूषित या श्रीमत्पुण्यपादुकानीं हो ॥
कीं यांच्या बहु यश नय तेज सुकृत शिव कृपा दुकानीं हो
सौवर्णी मणिखचिता भरतकरें तो पळार्थ ज्या त्याला ॥
त्या पादुका दिल्या त्या भक्ताला भक्तिनेंचि झाल्याला १००
सांत्वुनि निज-जननी-जन सर्व सचिव पौर गुरु सखे दास
प्रेषुनि पुरीप्रति प्रभु मानी सुख वन-निवास-खेदास १०१
नंदिग्रामीं होउनि वल्कि-जटाधर वसे परतला जो ॥
प्रभुसि न आणुनि तो श्री-मदयोध्येला न कां भरत लाजो

१ गुरुवचन हेंच धनुष्य. २ शतशःनीतीला. ३ अयोध्येमध्यें. ४ आपले पाय. ५ भरताला. ६ महादुःख.

# अध्याय ११ वा.



## सारांश.

रामचन्द्र, सीता व लक्ष्मण यांसह चित्रकूट पर्वतावर असतां शूर्पणखा राक्षसी, तेथें सुंदर स्त्रीरूप घेऊन आली. व माझा स्वीकार करा असें ह्मणाली. तेव्हां रामानें तिचें स्वरूप ओळखून लक्ष्मणाकडून तिचें नाक व कान कापविले. खर राक्षस, तिचा बंधु, चवदा हजार सैन्य घेऊन आला. त्याचा रामानें सैन्यासुद्धां संहार केला.

मग शूर्पणखा रावणाकडे गेली. ती त्यास ह्मणाली. पंचवटी येथें मी गेलें होतें. तेथें एक सुंदर स्त्री आहे. तिचें नांव सीता. व तिच्या पतीचें नांव राम. ती स्त्री तुला आणून द्यावी ह्मणून यत्न केला. तिच्या पतीनें ही माझी दुर्दशा केली. तें ऐकून रावणास मोठा क्रोध आला. व तो मोठ्या वेगानें गोकर्णास गेला. तेथें त्याचा मामा मारीच राहत होता. त्यास हें वर्तमान सांगितलें. मारीच ह्मणाला. तूं हें साहस करूं नको. पण रावणानें तें ऐकिलें नाहीं. त्याच्या आग्रहास्तव मारीच सुवर्णमृगाचें रूप घेऊन पंचवटीस गेला. तो मृग धरण्या करितां राम त्याच्या पाठीस लागला असतां, रावण यतिरूपानें येऊन सीतेस घेऊन गेला. मार्गांत जटायु गृध्रराज यानें रावणास अडथळा केला. त्याचा रावणानें खड्गानें पक्षच्छेद केला.

इकडे राम मृगाला मारून परत येत असतां त्यास लक्ष्मण भेटला. आश्रमांत सीता नाहीं हें पाहून शोकाकुल होऊन राम चोंहींकडे वनांतून शोध करीत फिरत असतां, मार्गांत जटायु भेटला. त्यानें सर्व सीतावृत्त कळविलें. पुढें जात असतां कबंध राक्षसानें लक्ष्मणास धरिलें, रामलक्ष्मणांनीं खड्गानें त्याचे बाहु तोडून पाडिले. द्विजशापानें निश्वावसु गंधर्व, कबंध झाला होता. तो रामहस्तानें मृत्यु पावतांच पूर्वरूप पावला. तो ह्मणाला: रावणानें सीता हरून नेली. तूं पंपासरोवराजवळ ऋष्यमूक पर्वतावर सुग्रीव राहतो, त्याचें सख्य कर. असें सांगून गंधर्व स्वर्गास गेला.

पुढें रामसुग्रीवांचें सख्य झालें. रामानें वालीला मारून वानरांचें आधिपत्य सुग्रीवाला दिलें. सुग्रीवानें सीता शुद्धीकरितां चारी दिशांस वानर पाठविले. मारुति सीताशुद्धि करून रामास येऊन भेटला.

**प्रभु चित्रकुट टाकुनि राहे गोदावरी-तटीं उटजीं ॥**
**मानस-सरःसरसिरुह- वनवासी हंसवर जसा कुटजीं ॥ १॥**
**वरि शोभवूनि कपटें वपु जें मळमूत्रमणिक रंडा तें ॥**
**याया ये शूर्पणखा खचरी सा सु-गुण-मणि-करंडातें ॥२॥**
**तन्नासा-कर्णातें, दूपाया काय. कापवि त्रासी ॥**
**कीं दुर्दानें दूपूं- पाहे श्रीनायका पवित्रासी ॥ ३ ॥**

१ मानससरोवरांतील कमलवनांत राहणारा. २ कुड्यांच्या झाडांमध्यें. ३ मलमूत्राचें मडकें. ४ तिचें नाक, व कान ह्यांला. ५ देह. ६ अपवित्रवस्तुदानानें.

आला नर मानुनि खळ खर घेउनि मनुं-सहस्र बळ खाया
किति तो ? मुनिहि न पुरति प्रभुला तत्वें करूनि बळ खाया
झाले भस्मचि; पडतां सर्वहि राक्षस कुवर्ण ते रामीं ॥
ह्मणतों खरादि पापे, प्रभुशर तन्मनुसुवर्ण तेरा मीं ॥५॥
बंधु खर सबळ बुडवुनि धांवत लंकेसि जाय ती नकटी ॥
कुदशा-राज्ञी-सिंहा- सन निजमुख दशमुखापुढें प्रकटी ६॥
ती त्यासि ह्मणे " दादा पंचवटीवासि कामिनी-रत्न ॥
तुज सर्व-रत्नभोक्त्या द्याया गेलें करावया यत्न ॥ ७ ॥
तत्पतिनें कर्णयुग च्छेदुनि केलें पहा विनासा हें ॥
त्वत्कीर्तिविरूपकरण; मानधना, अन्य यात्रिना साहें॥८॥
ती स्त्री सीता, तीचा जो पति,तन्नाम राम, नर जाया॥
तदनुज, लक्ष्मणनामा, जानुनि हो तूं प्रभंजनें रजा या'९
अग्नि-ज्वाळांसि वमे मुख-रंध्रें दुष्ट-रक्ष कोपे तें ॥
ओकावा वह्नि जसा वल्मीकें क्रुद्धतक्षकोपेतें ॥ १० ॥
श्रीसीतार्थ निघे अव- लंबुनि वेगा भुजंगमारीच्या ॥
गांठी श्रीगोकर्णीं तो दशकंधर-भुजंग मारीच्या ॥ ११ ॥
तो कळतां भाव ह्मणे " राया हें स्पष्ट कर्म अविहित रे ॥
व्यसनीं हरिहि बुडे बळ न पाहातां,पाहिल्यासि अविहि तरे
कोणी हें तुज कथिलें चक्षुर्विष-नाग-पुच्छ तुडवाया ॥

१ पातकी. २ राममंत्रांतील उत्तम वर्ण. ३ दुर्दशारूप राणीचें सिंहासन. ४ महावायु. ५ धुळीचे कणाला. ६ वारुळानें. ७ रागावलेल्या सर्पानें युक्त, अशा. ८ गरुडाच्या. ९ सिंहही. १० मेंढा. ११ नेत्रांमध्यें विष ज्याच्या, अशा सर्पाचें शेंपूट. १२ चवदा.

दाटुनि कां ? करिसी गा रामासीं वैर वंश बुडवाया१३॥
शतयोजनें उडालों हा मी रामेषुपक्ष[1]भूपवनें ॥
लीलेनेंचि जलधिचीं शोषिल तो अस्त्रदक्ष भूप वनें॥१४॥
रक्ष ह्मणे " रे मूढा भिवविशि वर्णूनियां नरा मातें ॥
चाल उगाचि,मरसि कां? स्तवुनि महेशासमान रामातें"१५
असुहर[3] दोघेहि परि श्रेष्ठ गमे रामराय मारीच्या ॥
गंगेच्या कांठ[2] द्यावा धीरें वीरें न कार्य मारीच्या[5] ॥१६॥
होवुनि रत्न-कनक-मृग गेला रामाश्रमासि वेगानें ॥
पाहुनि त्रास कराया वश ती रामा[6] श्रमा सिवे गानें[7]१७॥
ती रामासि ह्मणे "जी अवलोका मृग असोन, सोन्या, या
भेद नसेचि, गृहा हा न्यावा, दुसरें असो नसो न्याया ॥
आणा धरोनि मृग हा, कैसा दिसतो मनोरम ? उठावें ॥
जातो कीं धांवाजी आहे कीं हरिणत्हृदय मउ ठावें १९॥
ठेवी उटजीं अनुजा लंघाया शक्त ज्या न कीनाशं[8] ॥
कीं व्हावा न कपट-पटु- यातूपासूनि[9] जानकी-नाश २०॥
त्या कपट-मृगा-मागें धांवे प्रभु रुद्रसा शरी[10] रानीं ॥
वरिति सुर यदंघ्रिरजें- स्पर्शें[11] बहु मुद्रसां[12] शरीरानीं॥२१॥
व्यर्थ पळे पशु, ऐसा कोण कृती? एक पळ विलय मातें॥
न घडो, ह्मणोनि यत्नें जो दावुनि धाक पळविल यमातें॥

१ रामबाणाच्या पिसाऱ्याच्या वायूनें. २ उदकें. ३ प्राण-हरण करणारे. ४ देह. ५ महामारीच्या. ६ सीता. ७ गायनानें. ८ यम. ९ राक्षसापासून. १० शरधारी. ११ ज्याच्या चरण-रजाच्या स्पर्शानें. १२ आनंदरसाला.

प्रभुवर खर-तरं-विशिखें जेव्हां मर्मींच अत्रपा वेधी ॥
समयीं गुरूक्तिस, तसी त्याची कपट-स्मृतीस पावे धी२३
हा सीते हा लक्ष्मण ऐसें मरतां "ह्मणोनि मोट्यानें ॥
अमृत-प्रदीं करावें अहिनें, केलें तसेंचि खोट्यानें ॥२४॥
सीता ह्मणे " अहाहा धांवा हो मारतात हाकेला ॥
लक्ष्मणजी, धांवा हो भ्यांचि बळें आत्मघात हा केला"
सौमित्रि ह्मणे " तुमचें व्हावें न त्रस्त मन अहो वहिनी॥
हें मृग-कपट, करावा गरुडाचा नाश काय हो अहिनीं॥२६
सीता ह्मणे "न धांवसि जेव्हां तूं, परिसतांचि हाकेला॥
स्त्री-कामा, गुरु-घात श्रीकामींपरिस तांचि हा केला२७॥
ऐसेंहि ह्मणे बहुधा "उटजीं परमाधमा नसावास" ॥
तो बोल करी व्याकुळ त्यासि विष-व्रततिचा जसा वास
युक्तचि सीतेसि नमुनि तो वंधुकडेचि होय जाता तें ॥
माय जया रडवी, शिशु जाय कथाया स्वदुःख तातातें २९
त्यजितां उटज ह्मणे "वन- देवीहो जानकीस रक्षा हो ॥
लाविल इला बळें कर जरि खल परपुरुष सकुळ रक्षा हो॥
गेला लक्ष्मण तों यति- वेषें उटजीं दशास्य शिरला हो॥
कीं दैवमतें त्याचें प्रभु-शस्त्रें करुनि पतन शिर लाहो॥३१॥
उटजीं न यातु शिरलें तें अग्निगृहीं अभद्र कुतरेंच ॥
हा उतरिताचि त्याचा असता तरि मानवेंद्रसुत रेंच॥३२॥

१ अतितीव्र बाणानें. २ निर्लज्जाला. ३ दूध देणाराचे ठायीं. ४ कपटी मारीचानें. ५ भयभीत. ६ भरतापेक्षां. ७ त्वांच. ८ विषवल्लीचा. ९ राव. १० राक्षस. ११ लक्ष्मण.

जसि हे जयद्रथें तसि ती देवी त्या खळें बळें हरिली ॥
न करीच भस्म, जाणो बाळें भुजगी धृतव्रता धरिली॥३३॥
सीता ह्मणे "मजहि पर हरितो हें काय हो अहा तात ॥
अद्यापि कां न येती अबलेचा अंत किति पहातात॥३४॥
लक्ष्मणजी बहु चुकल्यें आधीं रक्षूनि जीवित रुसा हो ॥
तुमचा भुज श्रितसुखद मरुमार्गगदीर्घजीवितरुसा हो॥३५॥
हा राम, हा रघूत्तम, धांवा हो न त्यजा स्वभावास ॥
रक्षूनि जोडवा मग मजकरवीं अंजलि स्व भावास"॥३६॥
वाहुन रथीं गगन-पथ अवलंबुनि जानकीस खळ पळवी ॥
तें व्यसन तिचें रोदन तच्छ्वशुरसखा जटायुला कळवी॥३७
गृध्र ह्मणे "रे कोठें नेसी माझ्या सुनेसि फटकाळा ॥
मी पक्षिप, तूं केवळ मदमत्त व्याळ पंक्ति-फट काळा॥३८॥
बहु वृद्ध गृध्र जरि मी जरि तूं वज्रींदुराहु तरणा रे ॥
तरसिल न मज, जरि तुझे सुर-बल-जलधीस बाहु तरणारे"
रोधावें जेंवि वनीं अतिचपला वानरा वणवयानें ॥
केलें तसेंचि गृध्रें, वृद्धाहि तरे न रावण वयानें ॥ ४० ॥
सीता गृध्रासि ह्मणे" नमितें व्हा मुक्तिहेतु मामाजी ॥

---

१ द्रौपदी. २ धरिलें आहे व्रत जिनें ती. ३ निर्जल प्रदेशांतील मार्गामध्यें असणारा बहुकाल वांचणारा जो वृक्ष, त्या सारखा. ४ मूळ प्रकृतीला. ५ तिचा श्वशुर दशरथ, त्याच्या मित्राला. ६ गरुड. ७ दहा फणा ज्याला, तो. ८ वज्रीं ह्म० इंद्र हाच चंद्र, त्याचा राहु. ९ देवांचें बल, हाच समुद्र, त्याला.

उचिता स्वतनूपेक्षा कुदशा उचिता न हे तुला माजी"४१
गृध्रें क्षण सोडविली विरथ करुनि शत्रुला जसी तातें ॥
मृग-दर्शनादि जें जें स्वप्न ह्मणे धरुनि लाज सीता तें॥४२॥
गृध्रें प्रभु-कीर्ति-रतें खळ लंघुनि कीर्ति घाबरा केला ॥
विसरेल चकोर कसा सेवुनि परळांत राव राकेला॥ ४३॥
चक्रवृत्ति दृष्टि खंडी खड्ग तो दुष्ट गृध्रपक्षातिला ॥
पडतां मूर्च्छित वाटे समजावी साधु गृध्रप क्षितिला॥४४॥
सीतेसि निजस्कंधीं बसवुनि तो राक्षसेंद्र चोर पळे ॥
ती तत्स्पर्शे तापे बहु जेंवि मृगी दवांत होरपळे ॥ ४५ ॥
खळ मूषक लंका-तृण- राशि-स्थ स्वकुळ सर्व चाटून ॥
तो खावखावया ने त्या साध्वींवर्तिलागि दाटून ॥ ४६ ॥
मृग मारुनि परततां भेटे लक्ष्मण-मयूर अभ्रा त्या ॥
जाणुनि वृत्त ह्मणे प्रभु" हें भ्रात्या तुज न उचित, अभ्रात्या
व्हावीच विकळ-हृदया वध जाणुनि भीरु नायको पतिचा
त्वां वत्सा त्यजिलि कशी? करिता इतुक्यांत काय कोप तिचा
धरिलें मृगरूप खळें कीं सोडुनि उटज हा निघो रानीं ॥
वाटे बहुधा केली मुग्धेची प्राणहानि योगानीं ॥ ४९ ॥
वत्सा, मज पथ न सुचे तूंच पुढें काढ चाल बापा हूं ॥
किति आलों किति उरलें झाली गति काय चाल बा पाहूं
येतां, राक्षस गणिला, पडला होता जटायु, तो रानीं ॥

१ पूर्णचंद्रयुक्त पूर्णिमेला. २ जटायूच्या पक्षमूळाला. ३ पृथ्वीला. ४ लंका हाच तृणाचा राशि, त्यात असणारा. ५ साध्वीरूपी वातीला. ६ आश्रमांतून जाणें. ७ जो बंधु नव्हे, त्याला.

केलीं सज्ज धनुष्यें त्यांहीं विगलज्जटायुतोरानीं ॥ ५१ ॥
तो त्यांसि ह्मणे "तुमच्या त्द्दया जें भासलें, असेना तें
सुत हो, जाणा दशरथ- सख गृध्र जटायु मी, असे नातें॥
रावण घेउनि गेला स्व-वधूरत्नासि करुनि अन्याया ॥
बहु कीर्ति-क्षत बाधे क्षतं-तति बाधति तशा न अन्या या॥
कपट न करिता, पडता क्षणमात्रें अंतकाननीं चोर ॥
तें पावतें अशा या चंचूनें अंत कां न नीचोरं" ॥ ५४ ॥
श्रीराम ह्मणे "ताता, गेला कोण्यादिशेसि तो हतक ॥
मतकलुष हो यशोजल त्यांत पडो तद्सुर्नाश तें कतक॥५५
स्वशिरःकंपें दावुनि दक्षिणदिक् गृध्र, याउपर मातें ॥
शक्ति नसे तिळहि, असें पावे कळवूनियां उंपरमातें॥५६॥
"हा तात, मन्निमित्त भ्राते दोघेहि पावलां मरण ॥
बहुधा स्वर्गींहि तुह्मां क्लेशकरचि मद्विपत्तिचें स्मरण" ५७॥
ऐसें रडोनि सुतवत् दहन करुनि राम, भूमि-बाळेला ॥
शोधी वनीं, प्रभु गमे स्त्रीविरही, जेंवि वृद्ध बाळेला ॥५८॥
"हा सीते, हा सीते, टाकुनि जावें तुवां न रामातें ॥
राहूतें जेंवि सुधा देवि न जिरलीस तूं नरा मातें ॥ ५९ ॥

---

१ लोंबणाऱ्या जटांनीं युक्त उर ज्यांचें; त्यांनीं. २ माझ्या स्नुषारत्नाला. ३ क्षताच्या पंक्ति. ४ मृत्युमुखांत. ५ नीचाचें त्द्दय. ६ शठ. ७ गेला गढूळपणा ज्यांतील, तें. ८ त्याच्या प्राणांचा नाश. ९ निवळीची बी. १० मरणाला. ११ जटायु व दशरथ. १२ वेडसर झालेला.

वाहति न नद्या, न चरति हरिणी, चोखी न थान तोक, वनीं
जेणें विलाप विभुचा मज वदवे सर्वथा न तो कवनीं ॥६० ॥
योजनें-बाहु कवंध क्षणदाचर लक्ष्मणासि धरि खाया ॥
मृग-लाभें वृकसा तो लागे चित्तांत फार हरि खाया ॥६१॥
सौमित्रि ह्मणे "आर्या, काळाचा होय हा सखा, यास ॥
सांपडलों, अंतरलों तुज, मज नेतो सहासें खायास ॥६२॥
मारुनि रावण त्याचे दारें तदस्रेंकरुनि न्हाणून ॥
गेल्या निज-कीर्तिसह श्रीमत्सीता-सतीस आणून ॥६३ ॥
जातां पुरास यावें सामोरें भरतसह अनीकांहीं ॥
त्वां बैसोनि स्वपदीं नुरवावा काम जनमनीं कांहीं ॥ ६४ ॥
ऐसें अवलोकावें हें बहु माझ्या मनांत वा होतें ॥
देवीं नसे, बरें, सुर- पुरजन पाहोत दीर्घबाहो तें ॥ ६५ ॥
श्रीराम "ह्मणे वीरा, त्वां खड्गेंकरुनि बाहु तो डावा ॥
हा म्यांहि एकदांचि, श्रीकांतें जेंवि राहु तोडावा" ॥६६॥
खंडिति तद्बाहूंतें त्यांचे ते सुकरवाल-कालाही ॥
कालाहि उशिर लागे कापाया सुकर-बाळकालाही ॥६७॥
झाला दिव्यशरीर प्रभुच्या जैं निर्मलासिनें तुटला ॥

---

१ विश्वव्यापक रामाचा. २ चार कोस लांब बाहु ज्याचे, तो. ३ राक्षस. ४ संतोषावयास. ५ कबंध राक्षस. ६ हास्ययुक्त. ७ स्त्रिया. ८ त्यांच्या अश्रूंनीं. ९ गेलेल्या. १० सैन्यांनीं. ११ देव आणि नागरिक जन. १२ हे रामा. १३ उजवा. १४ श्रीविष्णूनें. १५ उत्तम खड्ग, हेच कालसर्प.

विश्वावसु गंधर्व द्विजशापापासुनि क्षणें सुटला ॥ ६८ ॥
त्या श्रीरामातें कां साधु न बहुमानितिल? कबंधातें ॥
मारी, तारी, वारी त्याच्या तो मानितिलक[1] बंधातें ॥६९॥
तो सांगे "श्रीरामा, सीता नेली दशाननें, साची ॥
होइल बहु, तसि शिशुची भुजगीच्या दुर्दशा न नेत्यांची[2]॥
स्व-कर[3]-बळें, तेजस्वी लोकीं जैसा रवि, प्रसरसी[4]; तें ॥
कथितों, पंपेप्रति जा, वर्णिति त्या विप्र फार सरसीतें[5]७१
मग ऋष्यमूक[6]-नग-ग- प्लवग-प-सुग्रीव-सख्य साधूनी ॥
यश जोडिशील, अमृतहि सोडुनि तें सेविजेल साधूनीं" ७२
गंधर्व जाय, तोहि श्री-रघु-कुल[7]-सारस-रवि सरसीतें ॥
तो त्यासि ह्मणे "कैसें अनुभविलें[8] सारसर[9] विसरसी तें"॥
प्रभुला दे ताप तिचा[10] वात, जरि सुगंध मंद शीतळ तो ॥
वाटे नलिनींत न, हा देह कढायींत सर्वथा तळतो ॥७४॥
"हा सीते, तुजवांचुनि सर्वहि मज तापहेतु हा सीते ॥
हा सीते, तूंचि, मज व्यसन-समुद्रांत सेतु हा सीते ॥७५॥
हा सीते, हा न जगत्[11]- प्राण, खरा वाघ, वायु हा, सीते ॥
हा सीते, व्याळचि हा, व्यक्त पितो राघवायु हा, सीते ७६
हा सीते, मज देतो त्वन्मुखजित चंद्र ताप हा, सीते ॥

१ विचारशीलांमध्यें श्रेष्ठ. २ नेणाराची. हें शिशूचें विशेषण. ३ आपल्या बाहुबलानें. ४ विख्यात होशील. ५ सरोवराला. ६ ऋष्यमूकपर्वतावरील, वानरांचा राजा सुग्रीव, याचें सख्य. ७ श्रीरघुकुल हेंच कमल, त्याचा सूर्य. ८ अनुभविलेलें. ९ उत्तम सरोवर. १० पम्पेचा. ११वायूला जयत्प्राण ह्मणतात.

हा सीते, करितो द्विंज- राजहि ह्मणवूनि पाप हा,सीते७७
हा सीते, कशि कळली त्वद्व्यसनकथा पिकास हा,सीते ॥
हा सीते, जरि नत मी, कशिवोंचि तथापि कास हा, सीते
हा सीते, जे त्वत्कच- भाराजितकलाप मोर, हा सीते ॥
हा सीते, ते नाचति मज पाहुनि मज समोर, हा सीते ७९
बहु लाजवीत होतों करि-केसरि-कीर-कोकि-हरिणा मी ॥
हांसत कर्म करावें भोगावें रडत तेंचि परिणामीं ॥ ८०॥
हा सीते, हा सीते,, असिल अद्यापि तूं कसी सासूं ॥
एकुनि या वार्तेतें प्रियसखि वांचेल ती कसी सासू॥८१॥
मेला श्वशुर, न समर्थ आह्मी आलों, भिऊनि उग्रासे ॥
तूं भीरु व्यसु होउनि झालीसचि तन्मुखांत सुग्रास॥८२॥
हा सीते हा सीते, हा सीते, सुदंति सुदांतिशयसुखने ॥

१ द्विजांचा राजा चन्द्र. २ तुझ्या नाशाचा वृत्तान्त. ३ कोकिलाला. तुझ्या मधुर स्वरानें कोकिल लज्जित झाल्यामुळें शब्द करीत नव्हता. तो तुझ्या नाशाचा वृत्तान्त कळतांच गर्वानें मधुर शब्द करीत आहे; असा रामाचा अभिप्राय. ४ दृढ बांधितोंच. ५ तुझ्याकेशपाशानें जिंकिला पिसारा ज्यांचा, ते. ६ मन्द गमन; कृशकटिभाग; बांकदार नासिका; श्यामवर्ण व पुष्पांनीं सुशोभित असा केश पाश; विशाल चंचळ, काळे भोर नेत्र ह्या तुझ्या स्वाभाविक अप्रतिम गुणांनीं हत्ती, सिंह पोपट मोर व हरिण यांस मी लाजवीत होतों. असें सीतेस लक्षून रामाचें ह्मणणें. ७ सजीव. ८ जटायु. ९ रावणाला. १० गतप्राण. ११ उत्तम दांत जीचे ती. १२ आनंदातिशयाची उत्तम खाण अशी. ही सीतासंबोद्धि.

मुख नेत्रा दावुनि पर- लोकीं मज साध्वि धावया मुख ने
हा दयिते, हा जानकि, हा भामिनि, हा सुगात्रि, हा सीते,
हा सुदति, हा कृशोदरि, हा मुंदरि, हा वरोरु, हा सीते,
ऐसा विलाप करितां लक्ष्मण वंदुनि ह्मणे "अहो आर्या,
धैर्य त्यजितां कैसी मारुनि खळ सोडवाल ती भार्या ८५॥
करिती इष्ट-वियोगें जे प्राकृत तेचि नर विलापातें ॥
व्याकुळ होऊनि तर्मी त्वां द्यावी लाज न रविला पातें ॥
त्याली आहे पाति- व्रतोऽशनि-कवच सर्वकाळ जिला ॥
घडतें त्वद्ध्यानामृत- पानहि, कां ती धरील काळजिला॥
सुग्रीव ऋष्यमूकीं आहे, भेटूं तयाशि आर्यी, तें ॥
साधूं अन्योन्याच्या नाशूं साधूनि सख्य आर्यीतें ॥८८॥
चिंतारत्न-श्रीगुरु- वरदान तुझ्या असेचि पदरीं तें ॥
मग साधिशील न कवण सिद्धि, सुखें संहरूनि सदरींतें ॥
मी बंधु सचिव भृत्यहि, हें लटिकें काय जी वदा नातें ॥
देईन कार्य सिद्धि- प्रति जाया काय जीव-दानातें"॥९०॥
पंपेंत स्नान करुनि विभु गेला ऋष्यमूक-गोत्रास ॥
त्यातें दुरूनि पाहुनि पावे सुगलें प्लवंग तो त्रास ॥ ९१ ॥

---

१ हे कोपशीले. २ सुंदर शरीर जिचें ती. ३ कृश उदर जिचें ती. ४ उत्तम मांड्या जिच्या ती. ५ विद्यादिसंस्कारहीन. ६ पतनानें. ७ पातिव्रत्य हेंच वज्रमय कवच. ८ चिंतिलेली वस्तु देणारें रत्नच असा गुरूचा वर. ९ साधूंच्या शत्रूंना. १० पर्वताला. ११ सुग्रीव. १२ वानर.

पवनंसुतासि ह्मणे "ते तापस परि कार्मुकी शरी रानीं ॥
येताति कोण पुस जा स्पष्ट गमति देवसे शरीरानीं" ९२
आज्ञा ह्मणोनि भेटे गिरिखालीं प्लवगपाळ कपि त्यातें
तत्काळ निवे पाहुनि बहुदिवसां जेंवि बाळक पित्यातें ९३
दवतप्त द्विप निवतो जैसा पावोनि गांग-तोयातें ॥
तेंवि निवे कपि, रामहि सांगे निजवृत्त साकु तो यातें ९४
रुग्णां धनिकासि जसा वित्तार्थी वैद्य पवनजें कपिला ॥
भेटविला प्रभुतें, जेंसि चुकल्या वत्सासि कामधुक्पिला ॥
सुग्रीवें सीतेचें सहभूषण उत्तरीय दाखविलें ॥
पितृ-वृत्ति-पत्रसें जें होतें त्या-नग-गुहेंत राखविलें ॥ ९६ ॥
तेजें करी प्रकाशित तें अद्भुतधाम कानना चेलं ॥
त्यातें पाहुनियां तो साधि श्रीराम कां न नाचेल ॥९७॥
मोहूत भुजग मोहा केंवि तुह्मी मजसम स्तनगे ! होतें ॥
तुमचेंहि सुकृत सरलें कां सांगा मज समस्त नगेहो तें" ९८
प्लुगल ह्मणे "रामा म्यां शोधावी जानकी शपथ करितां"
राम ह्मणे "कार्य तुझें जें, तें मी जानकीश पथ करितों ॥
शिखिसांक्षिक सख्य करुनि राम करी कार्य मान्य, वालिशतें

१ मारुतीला. २ रोग्याला. ३ मनोरथ पुरविणारी गाय. ४ विलक्षण तेज ज्याचें तें. ५ वस्त्र. ६ मनोव्यथायुक्त. ७ स्तनावरील ( दागिने. ) ८ हे दागिन्यांनो. ९ सीतापति. १० अंगीकारितों. ११ अग्नि आहे साक्षी ज्यांत तें. १२ वालिवानराच्या शतकानें.

क्षण जापुढें नुरावें; प्रभुबळ नुमजे सुकंठ[1] बालिश[2] तें १००
तत्प्रत्ययार्थ[3] एकें- बाणें भेदूनि सप्तताल[4]ीला ॥
वाळीस वधी, ज्याची स्वजनीं नुरवीच तप्तता लीला ॥१॥
निववी कपि राजपदीं अभिषेचुनि तप्त अंग दासाचें ॥
कुरवाळुनि वालिसुता दे प्रियपुत्रत्व अंगदा साचें ॥ २ ॥
प्रार्थी सुगल बहु परि प्रभु किष्किंधापुरीं न मन घाली ॥
माल्यवद[5]गींच राहे सानुज तो संन्मनोब्रुडनघाली[6] ॥ ३ ॥
लंकेंत अशोकवनीं, जसि बाळमृगी वृकींत, तशि देवी ॥
बहु-राक्षसींत होती न स्नान करी न तीं निजे जेवी ॥ ४॥
छळवी छळी परोपरि तीस वशकरावयासि मायावी[6] ॥
नवळेचि, परकरा कशि कुळभित्तिगतां[7] वधूत्तमा यावी ॥५॥
हेंहि ह्मणे "राक्षसि हो, शेवटिं घेउनि महानसा[8] जा गे ॥
न बळात्कार[9]तम उठे मनिं शाप-दिवा लहानसा जागे॥६॥
त्या नगगुहेंत वार्षिक- मास-चतुष्टय दिवानिश क्रमुनी ॥
ऐसें अनुजासि ह्मणे तो धन्वि-यशस्वि-मानि[10]शक्र-मुनी[11] ७॥

१ सुग्रीव. २ मूर्ख. ३ सुग्रीवास अनुभव येण्याकरितां. ४ सात ताडांचे वृक्षांला. ५ माल्यवान्पर्वतावरच. ६ सत्-मनस्-अप्-रुट्-अनघ-अलि. साधूंचें मन हेंच कमल, त्यांतील निष्कलंक भ्रमर. ६ कपटी. ७ कुलरूपी भिंतीनें आड केलेली. ८ स्वयंपाक-गृहाला. ९ बलात्कार हाच अंधकार. १० तेजस्व्यां मध्यें श्रेष्ठ. ११ विचारशील.

"जा वत्सा, चापीं गुण चढवुनि एकाचि सायका, पूस ॥
कापूस ज्वलनिं किती? ऐसें त्या पूलवगनायका पूस ॥८॥
बहुधा कृतघ्न मिथ्या- वादी दुर्ष्परिहराघ वानर तो ॥
अंगद असो कपीश्वर, तारेसीं सुगळ राघवा,न रतो" ९॥
जातांचि लक्ष्मणातें धांवुनि भेटे सुकंठ तो भ्याला ॥
नमुनि ह्मणे "स्वप्नीं मज कार्य दिसे,जेंवि वित्त लोभ्याला॥
लंघील कवण? जेणें वांधला एकें शरें कपीश तशा ॥
सर्व दिशा शोधायां पाठविले असति म्यां कपी शतशा॥
ऐसें सांगोनि निघे भेटाया त्याहि राघवा राया ॥
दिसलें कृतघ्नपण जें तेंहि महादुर्धराघ वाराया ॥ १२ ॥
प्रभुतें पाहूनि निवे जैसा निधिदर्शनें निवे दीन ॥
अंजलि बांधोनि ह्मणे"जरि अभय असेल तरि निवेदीन ॥
मज बोलवाल तैसें बोलेनचि मी अजानें कीरचि, तें ॥
कार्य घडेल कसें, जी, सुकृतें इतरें अजानकीरचितें॥१४॥
देवीतें शोधाया पाठविले पूलवगवीर बोधून ॥
भरलाचि अवधि मास द्रुत येतिल ते दिशांसि शोधून"॥
श्रीराम ह्मणे "साधो कृतकृत्य तुझा सखा नवा नर हो॥
जा तिकडे, काय गुणें तूं, बहुमत शतमखा न वानर हो॥
तों पूर्वोत्तरपश्चिम- दिक्शोध करूनि कीश कवि दार ॥
आले ह्मणति "न देवी ती आढळली, न तोहि अविचार

१ अनिवार्य पाप ज्याचें, तो. २ फार दुःसह पाप. ३ अज्ञान. ४ जानकीवांचून इतर स्त्रीनें रचिलेलें. ५ वानर.

राम ह्मणे "कर्णी कर　ठेवूं, ती तरि न दक्षिणा आशा॥
मज फार दक्षिणेची　विप्रा जसि तशिच लागली आशा
मासा नंतर दधिमुख　सांगे मधु-वन-विनाश-बोभाट ॥
सुगळासि गमे तो निज-　भट सुयशातेंचि वर्णितो भाट१९
दुसरे दिवशीं प्रभुला　वंदिति कपि अंगदादि येऊन ॥
तद्दर्शन तें जाणों　त्या शीतार्ता यथेष्ट ये ऊन ॥ १२० ॥
राम ह्मणे "शोधकहो　सकरुणही जरि असेल सांगातें ॥
द्या जीवनौषध मला　कीं त्याचें स्थान कोण सांगा तें ॥
वांचेन काय? होइन　साधूंसि, रसांत आज्यसा, मान्य ॥
मरण बरें, यश ज्यांत,　श्रेष्ठ न त्याहूनि राज्य सामान्य"
हनुमान् वदे "प्रभो म्यां　लंकेंत विलोकिली अनादि सती
रविभा जसी उलूकी-　नयना तसि राक्षसीजना दिसती ॥
ज्या शिखिशिखेसि भुलला　तो दुष्ट पतंग मत्त पाहून ॥
ती म्यां विलोकिली, तप　गुरु अन्याचें न मत्तपाहून२४॥
वांचेल पतंग कसा　लावुनियां वदन दीपकलिकेला ॥
म्यां तों सार्सी, लंघुनि　शतयोजन नंद-नदीप कलि केला
पुर जाळिलेंचि, चुरिला　अक्षाख्य सहोपवन कुमारमणी ॥
वाटे प्रसन्न झाली　सती प्रिया शंभुची उमा रमणी॥२६॥
चूडामणि पाठविला　या चरणावरि वहावयाला जो ॥
तो हा; पादाब्जस्था　र्या, पद्मासन महा-वर्या लाजो ॥२७

१ दिशा. २ मधुवन ही सुग्रीवाची बाग. ३ घुबडीच्या डो-ळ्यांला. ४ अग्निज्वालेला. ५समुद्र. ६ अक्षया नांवाचा रावणाचा पुत्र.७ पदकमलावरील, ८ ह्या मणीला. ९ ब्रह्मदेव. १० वृद्ध.

तुज ऐषीकास्त्रांची   कथिती झाली रडोनि खुण गा ती ॥
प्राण-व्यसनीं पडली   करि-वर-मतिसी तुझेचि गुण गाती
भस्म कराया घेउनि   गेला तो दैवहतक लंकेला ॥
रक्षा स्वकीर्तिला रवि-   कुळदीपा त्याहि गत-कलंकेला२९
राम ह्मणे "साधो त्वां   वांचविलें घेतलें विकत मातें ॥
मरणीं अमृत दिलें जें   उपकारीं न बुडवील कतमातें ३०
प्रभुच्याप्रहर्ष समयीं   मृगलाङ्गें करुनि यूथराज बळी ॥
बहुसंख्य सिद्ध होउनि   आले साह्यार्थ ईश्वराजवळी ३१॥
नल नील सुषेण पनस   गज गवय गवाक्ष गंधमादनही ॥
आले जांबवदादि   स्वबळभरें कांपविति समस्त मही ३२॥
कोटि सहस्त्र बलाधिक   एकैक असंख्य ते मज न कथवे॥
दिसती प्लवगर्क्षांचे   जिकडे तिकडे जिताभ्रकनक थवे ॥

१ इंद्रकाक, सीतेच्या रूपास मोहित होऊन त्यानें तिला स्पर्श केला. तेव्हां रामानें त्यावर ईषीकास्त्र सोडिलें. त्या अस्त्रापासून रक्षण व्हावें ह्मणून तो काक त्रिभुवन फिरला. पण त्यानें रक्षण कोणास झालें नाहीं. तो काक मग रामाला शरण आला. रामानें त्याचा एक डोळा काढून घेऊन त्यास सोडून दिलें. २ गजेन्द्राच्या बुद्धीसारखी. ३ कोणाला. ४ वानर व आस्वल यांचे ५ जिंकिले आहेत मेघ व सुवर्ण ज्यांनीं, ते.

# अध्याय १२ वा.



## सारांश.

सुमूहूर्त पाहून राम रावणास मारण्या करितां निघाला. त्यास रावणाचा बंधु बिभीषण शरण आला. विश्वकर्म्याचा पुत्र नळवानर, यानें समुद्रावर सेतु बांधिला. त्या सेतूवरून वानरसैन्यासह रामचंद्र लंकेस गेला. तेथें गेल्यावर रामानें अंगदास रावणाकडे सख्य करण्याकरितां पाठविलें. अंगदानें रावणास पुष्कळ हितोपदेश करून, सीता रामाच्या स्वाधीन करून, रामाशीं सख्य कर असें सांगितलें. पण तें रावणानें ऐकिलें नाहीं. त्यानें युद्धाची तयारी केली.

रामास हें वर्तमान समजतांच तोही वानरसैन्यासह युद्धास उभा राहिला. कांहीं दिवस युद्ध झाल्यावर कुंभकर्ण युद्धास आला. त्याचा लक्ष्मणानें वध केला. मग रावणपुत्र इन्द्रजित् युद्धास आला. त्यासही लक्ष्मणानें मारिलें. मग रावण स्वतः युद्धास आला. इंद्रानें रामाला बसण्या करितां रथ पाठविला. त्यावर बसून रामानें रावणाशीं घोर युद्ध केलें. ब्रह्मास्त्रेंकरून अभिमंत्रित बाणानें रामानें रावणाचा वध केला.

रावणाचा वध केल्यावर रामानें बिभीषणास लंकेचें राज्य दिलें. सीतेची मुक्तता केली; पण ती सहा महिने रावणाच्या

घरीं होती ह्मणून राम तिचा स्वीकार करीना. मग सीतेनें दिव्य केल्यावर रामानें तिचा स्वीकार केला. इद्रानें अमृतवृष्टीनें वानरसैन्य जीवन्त केलें. मारुतीच्या साह्यानें आपली मुक्तता झाली, याकरितां सीतेनें मारुतीला वरदान दिलें कीं, जे जन शिव-विष्णूंप्रमाणें तुझें भजन पूजन करितील ते संसारमुक्त होतील. मग रामचन्द्र सुग्रीवादि वानरांसह पुष्पक विमानांत बसून अयोध्येस यावयास निघाला. किष्किंधेस आल्यावर अंगदास यौवराज्य दिलें. तेथून नंदिग्रामीं भरतास भेटून त्याचें सांत्वन केलें. मग त्यासह रामचन्द्र अयोध्येस आला. नगरजनांनीं मोठा उत्साह केला व सुमुहूर्तावर रामास राज्याभिषेक केला.

सुदिनीं रघुसिंह निघे माराया त्या दशानन-गजातें ॥
प्रभुचा क्षम होय चुरुनि कर द्याया दुर्दशान नग जातें॥
तो उत्तराब्धि जाणों जातो त्या दक्षिणाब्धि वरि सातें॥
जिंकाया दुष्टातें आश्रय देउनि कुकीर्तिवरियातें ॥ २ ॥
स्वप्नांत सिंधु सांगे "नळवानर विश्वकर्म-सुत राया ॥
रामा, तो सेतु रचू हा कीर्तिमद उपाय उतराया" ॥ ३॥
प्रभुचे आज्ञेनें नल सेतूतें धरुनि अनलसत्व रची ॥
तो सिद्ध होय जगदघ- राशीचा मूर्त अनल सत्वरची॥४॥
तेथ बिभीषण राक्षस नमुनि ह्मणे "बा परार्ध वाराया ॥
तूंचि सुतीर्थ नता मज, तूं माता बाप राघवा राया"॥५॥
शरणागत अरि-बंधुहि रामें प्रेमेंचि घेतला पदरीं ॥

१ आलस्यरहितता. २ महापाप.

खळें-दत्तीं अमृत फळीं न प्रभुरुचि, बहु सदर्पितीं बदरीं१
"सुग्रीव पांचवा, बा गुणं-रंजित-सर्व-सत्सभा, सावा ॥
तूं बंधु, न कोणीही दीन सुधी सुरभि-वत्स भासावा"७॥
ऐसें पूजुनि त्यातें प्रभु लंका-राज्य दे, न वेदा ते ॥
गुण वर्णवती, ज्यांहीं लाजविले बहु जुने नवे दाते ॥८ ॥
शतयोजन आयतं दश- योजन विस्तीर्ण सेतु, शंकेतें ॥
दे, गेला बुडवाया कोपाकुल भूमि-बाहु लंकेतें ॥ ९ ॥
किंवा तो कपिकटको- त्तरसिंधूद्गत बुभुक्षु कालाऽही ॥
दूर पसरला खाया रात्रिंचरा क्षुद्र-बेडकालाही ॥ १० ॥
सेतु न तो, यत्पतिनें स्वसुता नेली जशी वृकें एणी ॥
सा लंकेची श्री-भू- देवीनें वोढिली असे वेणी ॥ ११ ॥
राम-जयश्री-लग्नीं लंका घाली सुनील पाटावें ॥
सेना-वऱ्हाडिणीला पायघडी कां असें न वाटावें ॥ १२॥
बहुधा तुच्छ जलधि-तृण चाटायाचा धरूनियां वीट ॥
गेला प्रभुप्रतापा- सितपथ रक्षोटवीकडे नीट ॥ १३ ॥

---

१ दुष्टानें दिलेल्या. २ आह्मी चौघे बंधु, सुग्रीव पांचवा आ-तूं सहावा असें, रामाचें ह्मणणें. ३ गुणांच्या योगानें रंजविली सज्जनांची सभा ज्यानें, अशा हे बिभीषणा. ४ लांब. ५ वानर सैन्यरूपी उत्तर समुद्रांतून उत्पन्न झालेला. ६ कालसर्प. ७ राक्षसाला. ८ हरिणी. ९ रामाचा प्रताप हाच असितपथ ह्म० अग्नि. १० राक्षसरूपी अरण्याकडे.

कीं पतित पति त्यागुनि विश्वशरण्याकडे रडत वाटे ॥
आली जी लंका-श्री तीचा तो सांजनाश्रुपथ वाटे ॥१४॥
कीं रचिलें स्वापयशें शोकानळदग्ध सागरोरचि तें ॥
सूचविले तर्क असे त्या सेतुवरें महा-सुधी-रचितें ॥१५ ॥
प्रभु सेतु-पथें उतरुनि शत्रुकडे वाळि-सूनुला धाडी ॥
कीं कोणी न ह्मणावें न कळत जाऊनि घातली धाडी ॥
जावुनि सभेंत अंगद दशकंठातें ह्मणे "अगा राया ॥
आलों अखिल-प्रभु-वर- रामाज्ञेस्तव तुझ्या अगारा या ॥
श्रीमद्रामप्रभुची आज्ञा आहे असी, परिस तीतें ॥
हारिति यशोर्थ पराच्या श्रीतें, न स्पर्शती परि सतीतें॥१८॥
येणें क्षय-पात्र अमृते- करहि कुदर्श-देह देव मघवाही ॥
आपणचि भारवाही बुडतो, बुडवी कुळाहि अघवाही१९
दीप-कलिकेसि द्याया आलिंगन जो करी पतंग जवा ॥
तो कीं तूं! सिंहीला लातेनें हाणिता मतंगज वा?॥ २० ॥
होउनि तूं व्याघ्र-व्रत- धर चरचर न बहु मानवां चावें ॥

---

१ विश्वाचें रक्षणस्थान. २ कज्जलसहित अश्रुयुक्त मार्ग. ३ आपल्या अपकीर्तीनें. ४ शोकरूप अग्नीनें दग्ध झालेलें. ५ समुद्राचें त्हृदय.६ महाबुद्धिसंपन्न रामानें रचिलेल्या.७अंगदाला.८सर्वांचा श्रेष्ठ धनी रामचन्द्र, त्याच्या आज्ञेकरितां. ९ चन्द्रही (गुरुस्त्री गमनामुळें. ) १० दुर्दशायुक्त ह्म० भगांकित देह ज्याचा तो ( अहल्या गमनामुळें. ) ११ इन्द्र. १२ पापाचें ओझें घेणारा.

कुलजें धरूनि चित्तीं नयं[1]-लय-भय सबहुमान वांचावें२१
न कुरीतीतें हृदयीं ठेवीं, टाकूनियां सुरीतीतें ॥
ईतेंचि सुधा-धारा बुध ह्मणती रावणा सुरी[2] तीतें[3] ॥२२॥
भक्षिसि नर-मांसातें, हा पापा, प्राशिसी सुरेतें कीं ॥
हा रे भ्रष्टा, घडलें तुज जन्म महर्षिच्या सुरेतें[4] कीं ॥२३॥
धरिली असेल असती[5] जी रीति तसीच जी सुरी तीतें ॥
त्यज, तुज बहु सुख व्हाया देतों मी आपल्या सुरीतीतें२४
सीतेपरीसहि मला प्रीति असे फार साधु-रीतीची ॥
ती देतोंचि तुज पहा आधीं सेवूनि माधुरी तीची ॥ २५॥
नाहींच तरि हठें तूं देणार प्राण मद्यपा, हूं[6], दे ॥
त्वदुर्दशा पहाया बहु इच्छिति,त्यांसि सर्व पाहूंदे" ॥२६॥
खळ 'मारावेंचि' ह्मणे कथितांहि सुखावहा निरोपातें ॥
हतभाग्य कां ह्मणेना हो सुरतरुच्याहि हानि रोपातें २७
मधुपासि बहु प्रिय जो आत्म[7]-प्राण-व्रजासम स्तबकं[8] ॥
सकळ-रसिक-प्रिया त्यां न ढुंकोनाहि पाहती समस्त बकं[9]॥
झोंबति राक्षस चवघे त्यातें काळाहि जेंवि खगपातें[10] ॥
त्यांतें उडोनि झाडी झाले ते चूर्ण जेंवि नगपातें[11] ॥ २९॥
तें ऐकतांचि राम स्वसहायांतें ह्मणे " उठा राहो ॥
नामचि शेष खळाचें; विस्मय भार्गव-सखा कुठारा हो ३०

१ नीतिभंगाचें भय. २ समुद्रमथनांत जें मूर्तिमंत मद्य निघालें, ती. ३ वाईट रीतीला. ४ पवित्र वीर्यानें. ५असाधु. ६ आतांच. ७ आपल्या प्राणसमूहासारखा. ८ पुष्प गुच्छ. ९ गुच्छाला १० गरुडाला. ११ पर्वतावरून होणाऱ्या पतनानें.

कपि एकदांचि "जयति श्रीरामो, जयति लक्ष्मणो" ह्मणती
रण-तीव्र-यत्न[1] ते त्या लंकावरणासि[2] लाविती खणती ६१
टंक-घनाऽधिक[3] त्यांचे खर कूर्पर दंत नखर गुडघे ते ॥
ते न्यूनचि दुष्काळीं जे राशीचे लुटोनि गुड[4] घेते ॥ ६२॥
लंकेवरी कपिसेना शेतावरि टोळ धाडसी पडली ॥
मधु प्यावया पिपीलिक-पृतना[5] कीं स्वर्णभाजनीं जडली॥
वाटे पिपीलिकावृत-भोगा[6] ती होय आकुळा व्याली ॥
न पुरी. न कटक-कोपें उग्रा गरळाग्निच्या कुळा व्याली?॥
क्षोभे साखिलखलबल[7] रावण, सभुजर्ग-समूह[8] तक्षकसा ॥
हृत-दारं[9] गरुडसा प्रभु होय न तद्दर्प-भंग-दक्ष[10] कसा॥६५॥
दशकंठ ह्मणे " झाले गज मर्कट-नखर-भग्न-कट[11] कटकीं ॥
नर वानर तुच्छ ह्मणत होतों, परि माजलीच कटकट कीं
मद्भट-लक्षहि वारूं न शके एकाहि माकडा; गमला ॥
मद्विक्रम तुच्छ नरा; शिवला हा जेंवि काक डाग मला"
चिंतुनि ऐसें उठवी घटकर्णालागिं[12] तो उपायशतें ॥
सांगुनि वृत्त ह्मणे " वा रक्षावें त्वांचि यातुपा[13] यश तें"॥

१ युद्धाविषयीं तीव्र यत्न ज्यांचा, ते. २ लंकेच्या तटाला. ३ टांकी व घण यांहून अधिक. ४ धान्य. ५ मुंग्यांचें सैन्य. ६ मुंग्यांनीं वेष्टिला भोग ह्म० देह जीचा ती. ७ संपूर्ण दुष्ट सैन्यासह. ८ सर्पसमूहासह. ९ हरण केली स्त्री ज्याची तो. १० त्याचा गर्वनाश करण्यास समर्थ. ११ वानरांच्या नखांनीं फुटलीं गंडस्थळें ज्यांचीं, ते. १२ कुम्भकर्णाला. १३ हे राक्षसेंद्रा.

घटकर्ण ह्मणे " चिंता न करावी गा समस्त-यातु-पते[1] ॥
नर वानर जे आले उद्दीपक या धनंजया[2] तुप ते ॥ ३९॥
ह्मणसी एकचि गेला जाळुनि लंकापुरास माकड बा ॥
निजलासि तूंहि, हो कपि- कोटिहि मज सिंधुरासमा[3] कडवा
वाटे नवल व्याघ्रहि भ्याला निजकाननांत ओतूंतें ॥
जाऊं मदीप्त होऊं कपि-बळ-घृत[4] आननांत ओतूं तें" ४१॥
आज्ञा घेउनि निघतां भासे तो प्रळयकाळ-पावकसा ॥
कपि ह्मणति "दया-मेघा श्रीरामा शीघ्र वर्ष, पाव कसा" ४२
त्यांतें वेष्टुनि ताडिति कपि-कोटी जेथवां अगनगांनीं[5] ॥
तें कोटि-होम होतो ऐसें क्षण भाविलें गगनगांनीं[6] ॥ ४३ ॥
शतशः प्लवंग गटगट गिळितां न ह्मणे " नको पळाशमन[7]॥
त्या पापि-कुंभकर्णा-परि केव्हांही न कोपला शमन[8] ॥४४ ॥
ते मृतिभीत पळाले कपि ज्या घटकर्ण-नासिकेवाटे[9] ॥
तीं प्राणाऽवनधर्मा[10] प्राणि-विहित-वर्णना[11] सिके वाटे ॥४५॥
भय-कंचुकासि[12], धरितां घटकर्णे प्लवगराय[13] कपि ल्याला ॥
मोडवि लक्ष्मण मारुनि अहिसि जसा पक्षिनायक पिल्याला
मग रामलक्ष्मणांवरि ये रावणपुत्र जो अविप्रहित[14] ॥

---

१ सर्व राक्षसाच्या राजा, हे रावणा. २ अग्नीला. ३ गजसदृश मला. ४ वानरसैन्य हेंच घृत. ५ वृक्ष व पर्वत यांनीं. ६ देवांनीं. ७ राक्षस कुम्भकर्णाचें मन. ८ यम. ९ कुम्भकर्णाच्या नाकावाटे. १० प्राणरक्षणाच्या धर्माला. ११ प्राण्यांनीं केलेल्या वर्णाला. १२ भयरूपी अंगरख्याला. १३ सुग्रीव. १४ विप्रांचा शत्रु, इन्द्रजित.

व्याघ्रावरि मत्त जसा  मत्तें तत्स्वामिनें अवि प्रहित॥४७॥
तो इंद्रजित् महाबळ  मायावी जेंवि दुष्ट राहु निघे ॥
प्रभु पुष्पवंतप्रभेतें  कपटें गगनांत गुप्त राहुनि घे ॥ ४८ ॥
श्रीरामलक्ष्मण प्रभु  त्या इंद्रजितें शरव्रजें खिळिले ॥
अद्भुत-मोहाऽजगरें  जे होते दिग्गजेंद्रसे गिळिले ॥ ४९॥
केले बिभीषणें प्रभु  मंत्रौषधिनें विशल्य ते, ज्यांचें ॥
नामचि करि पाण्याहुनि  पातळ यश भास्करादि-तेजांचें॥
श्रीराम दिव्य-दृष्टि-  प्रद धनद-प्रेषितांबुनें नयनें ॥
प्रक्षाली अनुजाचीं  मग जीं दिव्यांऽबुज-प्रभा-जयनें॥५१॥
मग सुग्रीवहनूम-  ज्जांबवदंगदमुख स्वनेत्रास ॥
तें दिव्य तोय लावुनि  देति खळाला जयस्वनें त्रास॥५२॥
प्रभुला बिभीषण ह्मणे “  पावेल जया न रावणि कदापी
निज-कपटज्ञा पाणी  जोडी, भोळ्या नरा वणिक दापी ॥
कळवुनि पित्यासि निज जय  ये,तों पाहूनि मेघनादा त्या
कपि-कुळ नाचे वेष्टुनि, नटतें शिखि-कुळ गमे घना दात्या
क्षुब्ध असेंही पाहुनि  आसांदी तर्तुकाम रावणि ज्या ॥
तो श्रीलक्ष्मण बुडवी  त्यासि, जसा सिंधु पामरा वणिजा

१ पाठविलेला. २ सूर्यचंद्रांच्या तेजाला. ३ दिव्य दृष्टि देणारें. ४ कुबेरानें पाठविलेल्या उदकानें. ५ दिव्य कमलाच्या तेजाला जिंकणारीं. ६ सुग्रीव, हनूमान्, अङ्गद प्रमुख. ७ जयाच्या शब्दानें. ८ रावणपुत्र इन्द्रजित. ९ आपलें कपट जाणणाऱ्यास. १० गांठी. ११ तरण्यास इच्छिणारा.

सौमित्रिनें, त्रिंनेत्रें[1] स्मरसा, सुत नामशेष केला हें ॥
परिमुनि दशवदन ह्मणे “ तूंहि मरण भूमि-कन्यके लाहें
खड्गासि ह्मणे “त्वदधिक[2] कोणीहि प्रिय मला असेनाच ॥
चाल प्राशुनि सीता[3] गलगलदसृगासवा[4] असे नाच ॥५७॥
सीतेवरि जातां तो दे लाज पिसाळल्याहि कुत्र्या[5] तें ॥
‘मेल्या रांड तुझी हो’ ऐसें शापी हळूच कु[6] त्यातें ॥५८॥
साधु अविंध्य[7] निशाचर त्यासि ह्मणे “वात कायसी? तेला
हरितां, करितां पतिचा मारीना घात काय सीतेला?५९॥
शक्रा[8] त्वद्घाहूंची जेंवि हरीची इभा गमे लीला ॥
मारूं पाहसि काय ? प्रभु तो तूं भूरिभाग[9] मेलीला ॥ ६०॥
आलें मनांत तें, मग पाप[10] परतला, न जाणता महिम्या॥
काटे मत्ताखु[11] ह्मणे “ खावा स्वकुळासि भक्षिता अहि म्या
मत्तेभरद[12] ह्मणे हित जैसा बालिश सपाम[13], राम-रण ॥
हित मानी रावण कीं. पाडी भ्रांतींत पामरा मरण॥६२॥
गांठिति त्या कपि-कटका खळ-सेना, जेंवि अग्निच्या पुंजा
गुंजा[14], तोहि खळमणी प्रभुला, श्री नृहरिला जसा मुंजा[15]॥
बैसुनि शक्र-रथीं करि विजयश्री-केलि-कुंज[16] राम रण ॥

१ शंकरानें. २ तुझ्याहून अधिक. ३ सीतेच्या कण्ठापासून गळणारें रक्त हेंच मद्य, त्यास. ४ हे खड्गा. ५ कुत्र्याला. ६ पृथ्वी. ७ अविंध्यनामक राक्षस. ८ इन्द्राला. ९ महाभाग्यवान. १० पातकी रावण. ११ माजलेला उन्दीर. १२ माजलेल्या हत्तीचा दांत. १३ खर्जुला. १४ मद्यगृह. १५ कंबरेस मुंज असून जो बुडून भूत झाला तो. १६ विजयलक्ष्मीचें विलास करण्याचें कुंजवन.

तद्देवीहि अनुमोदन दे, द्याया यातु-कुंजरा मरण ॥ ६४ ॥
करि कपट-शत, असो तें, दंड-हताऽहीस न क्षमा यावी
बहुसंख्य रामलक्ष्मण निर्मी तो मोहॅं-दक्ष मायावी ॥ ६५॥
श्रीराम-रावण-समर होय श्रीराम-रावण-समरसा ॥
ते वृष्टि जसे, न करिबि तसि शुचि सशकार-रावण समरसा
गाईस गोपसे, कपि- सेनांसि दशास्य-सायक वळीती ॥
जाणो न वानर-चमू मिटक्या देऊनि साय कवळी ती६७
जिंकील न आत्म-गुणें, गिळुनि सितायुक्तें साय काक पिकां
खळ निज वशा तसा, हें समजुनि भीतील सायका कपिकां
प्रबळ-दशवदन-खर-शर- निकरें सुग्रीव-कटक वितुळे तें
कथितां योजिल दृष्टांऽ निल-बल-भिन्नाऽभ्रघट कवि तुळेतें
त्या प्रभुपुढें समर्थें झाली न स्वावनीं चमू-कवचें ॥
तीं हास्य-फळेंचि जशीं देवगुरुसमक्ष नीच-मूक-वचें ७०॥
उपदेशांहीं खंडी उग्रा मोहासि जेंवि कपिलास्य ॥
तेंवि प्रभु धनु-इषुंहीं अरिला, तें करिति त्दृष्ट कपि लास्यें

१ राक्षसश्रेष्ठाला. २ दांड्यानें दुखविलेल्या सर्पाला. ३ मोह पाडण्यांत कुशल. ४ समरासारखा. समर शब्द पुल्लिंगी आहे. ५ आषाढ. ६ शकारयुक्त रावण म्ह० श्रावण. ७ तुल्या. ८ दुधाची साय. ९ शर्करायुक्त. १० पाहिली आहे, वायुबलानें विसकटलेली मेघमाला ज्यानें, तो. ११ उपमेला. १२ आत्म-रक्षणाविषयीं. १३ हास्य हेंच फळ ज्यांचें तीं ( वचें. ) १४ बृहस्पती पुढें. १५ कपिलमुनीचें मुख. कपिलमुनीनें सांख्यशास्त्र रचिलें. १६ बाणांनीं. १७ नृत्य.

त्यास श्रीराम ह्मणे " रे मंदा सर्वरक्तपापसदा[1] ॥
बाप सदाचारी त्वां लाजविला कीं करूनि पाप सदा ॥
प्राण तुझे स्वपराहित[2] पळही रक्षोधमा[3] न वांचावे ॥
चाविशि जसा खळा तूं खळहि अहि तसा न मानवां चावे
काम-रता मर, पामर सामरसामरसदाप्तलोकातें[4] ॥
मानुनि अहित अहितसा क्षोभे, कीं पावणार शोकातें ७४
ऐसें वदोनि वधिला तो ब्रह्मास्त्राभिमंत्रितें रोपें[5] ॥
सोपें पडलें, बहुधा केलें प्रभु-साह्य जानकी-कोपें ॥ ७५ ॥
वैद्युत[6]-वह्नि-विमर्दित विटपिवरें[7] तसा खचे महाकाय ॥
सुर ह्मणति "अहा झाली दोषें याचीहि गति पहा काय"
सर्वांहीं गणिला तो जयकाळ श्रावण प्रसूनगणीं[8] ॥
क्षणभरि फाल्गुन न असें स्वसुनांसह रावण-प्रसू[9] न गणी
करिती रावण-तनुला आलिंगुनियां विलाप बहु विधवा ॥
ते सकळ एकविध[10] वा सुश्रोते हो असोत बहुविध वा ७८॥
विस्तर-भय नसतें तरि वर्णाया काय सुकविला परवा ॥
प्रभुच्याहि वर्णिति श्री- वाल्मिकि-व्यास-शुक विलाप-रवा
ज्या पापें[11] सुर-वानरें[12]- कृत-घन-जय-रव मूहूर्त लोपविला ॥

१ सर्वराक्षसाधमा. २ आपले व दुसऱ्यांचे शत्रु. ३ राक्षसांमध्यें नीचा. ४ सह-अमर-साम-रस-द इ० ह्म० देवाशीं स्नेहरूप रस देणाऱ्या आप्तलोकांना. ५ बाणानें. ६ विजेच्या अग्नीनें मोडिलेला. ७ मोठा वृक्ष. ८ पुष्पसमूहांनीं. ९ रावणमाता. १० एकप्रकारचे. ११ पातकी रावणानें. १२ देव आणि वानर यांनीं केलेला, गंभीर जयशब्द.

खळ-दार-विलाप-रवा का वर्णिल कवि-मयूर कोपविला॥
लंका बिभीषण-करीं देउनि, द्याया सतीस सुख, निरवी॥
जसि अंधकार नासुनि सुनृप-करीं दे सुरत्नें-खनि रवी ॥
जीच्या सुव्रत-तेजें कंपित व्हावें सदा सदूनीं ॥
त्या जानकीस विनवी सदमात्य अविघ्य दास दूरूनी८२
"रक्षुनि सुगल बिभीषण जेणें स्वयशें सलज्ज शिबि केला
माते या स्वपतिकडे चाल अधिष्ठूनि शुद्ध शिबिकेला"८३
वत्साला सुरभीसी जी निजदासासि पावणारी तें ॥
अनुमोदुनि मग नेउनि कळवी तो साधु रावणारीतें॥८४
जनसंग्रहार्थ तो श्री- राम प्रभु कपटमानव सतीस ॥
बोले"विलोकितों तुज जरि तूं परमंदिरीं न वसतीस ८५॥
रिपु मारुनि सोडविलें कीर्त्यर्थचि तुज, न देवि भोगाया॥
कीं नमुनि ईश्वराला यशचि ह्मणति सुजन दे विभो गाया
परकरग स्वकलत्र स्पर्शोंचि महायशासि वाहविते ॥
कोण प्राज्ञ ह्मणेल श्वा शिवला ज्या तशा शिवा हवितें॥

---

१ सतीस सुख द्याया, लंकाबिभीषणकरीं देउनि निरवी. ह्म० जानकीला सुख देण्याकरितां रावण मारून लंका बिभीषणाच्या स्वाधीन केली. २ उत्तमरत्नांची उत्तम खाण. ३ सज्जनांच्या मांड्यांनीं. ४ सज्जन प्रधान. ५ तें (अविघ्यवचन) अनुमोदुनि, वत्साला सुरभासी, जी निज दासासि पावणारी ती, इ० असा अन्वय. ६ एखाद्या सत्कर्मांत लोकांची प्रवृत्ति व्हावी ह्मणून तें सत्कर्म गरज नसतां स्वतःआचरणें. ७ कपटानें मानव झालेला.

जा स्वैर, ह्मण, स्त्रीच्या सुखदे हो सुप्रसन्न मोकळिके ॥
जी चुंबिली भुजंगें मधुप ह्मणेलचि तिला नमो कळिके"॥
असि अभियोक्ति कर्णीं भूपृष्ठीं तीहि एकदांचि पडे ॥
प्रभुला पाहों नशकति कापि, डोळे जेंवि भानुला चिपडे८९
चित्तीं ह्मणे "प्रभु अहा पडली सहसा गरांत मज्जाया॥
वदलों असें कसें भू- लोकासह सागरांत मज्जाया॥ ९०॥
सावध होऊनि करिशिल जरि लोकप्रत्ययार्थ हे शपथ ॥
प्राणप्रियेसह सुखें आतांचि धरीन मी स्व-देश-पथ" ॥९१॥
सुर ह्मणति "सती मोहें मुखि भरिली आपल्या पहा रे तें"॥
विधि शिव 'ह्मणती अजगर गिळिल कसा तापल्या पहारेतें'
जेंवि व्यसनीं त्रिजगं- नाथस्मृतिचा धरी करीश पथ ॥
ती तेंवि सत्यधर्म- स्मरणपरा जानकी करी शपथ ॥९३॥
"चुकलें असेल तिळभरि तरि शापावें मला सतीव्रातें ॥
भुजगीतें कीं तुमच्या भुजभुजगातें शिवेन तीव्रातें ॥९४॥
स्वप्नींहि तुह्मांहुनि पर- पुरुषीं गेलें असेल हें मन हो ॥
तरि युष्मच्चरण-रजः स्पर्शें मद्देहलोह, हेम न हो ॥ ९५॥
मळलें असेल त्दृदय स्वसतीव्रतनियमलेशभंगोहें ॥
प्रभुजी तरि मन्मस्तक आतांचि तुह्मांसमक्ष भंगो हें"९६॥

---

१ श्रीविष्णुस्मरणाचा. २ गजेंद्र. ३ सत्यधर्माचे स्मरणाविषयीं दक्ष, अशी सीता. ४ पतिव्रतासमूहानें. ५ तुमच्या पदाच्या धुळीच्या स्पर्शानें. ६ स्व-सती-व्रत–नियमलेश-भंग-ऊह ह्म० आपल्या पातिव्रत्याच्या नियमाचा तिलप्राय भंग व्हावा, ह्या कल्पनेनें.

करितां शपथशत असें वाय्वाग्नि-प्रमुख देवता ह्मणती ॥
"श्रीरामा सीतेतें करिती करिलहि महासती प्रणती"९७॥
विधिहि ह्मणे "असि कुलजा अर्पुनि वपु तुजअशाहि कुलतिलकीं
परतेल काय?ऐकुनि हें साध्वींचीं उरेंचि उलतिल कीं"९८
तों दिव्य-विमान-स्थित दशरथहि ह्मणे दशाननाऽरीतें ॥
"वत्सा सतीव्रतबळें ग्रासी कष्टा दशा,न नारीतें॥ ९९ ॥
सीता महासती हे ह्मणुनचि तरलासि तूंहि संदरीतें ॥
जें सर्वव्यसनौषध सद्व्रत आहे इच्याचि पदरीं तें ॥ १००॥
सुर ह्मणति "मज सदा निज- सद्व्रतिद-व्रत-परा सुनेला मा"
कोण न यमदूतांहीं शोकें होतां परासु नेला मा ॥ १०१ ॥
बा हे जरि खळरुद्धा शुद्धाचि सदा सती अगा ईतें ॥
साज्या ह्मणसि तरि यवन- कृत-रोधें सजिति कां न गाईतें ॥
रामा बा माझ्या हे साध्वी साध्वींड्य-सद्गुणा सुहिता ॥
मेघें शंपासी त्वां अंकीं घ्यावी नृपर्षिची दुहिता॥१०३॥
भरत रिपुघ्न प्रियसख सचिव सकळ भृत्य पौर गौरजनी॥
पाडीं गुणें उणें, जें छत्र सुधास्रावि चंद्रगौर उनीं॥ १०४॥
होऊं न दिलें सत्य- भ्रष्ट तुवां स्त्रीजितास मज साधो ॥
साधोरर्णा गजीसी त्वद्युक्ता श्री असो,सुयश साधो१०५

---

१ साधूंच्या शत्रूंना. २ साधूंनीं स्तुत्य गुण जिचे ती. ३ विद्युत्. ४ राजर्षि जनकाची. ५ अमृत स्रवणारें. ६ चंद्राप्रमाणें शुभ्र. ७ स्त्रीनें-कैकेयीनें जिंकिलें ज्याला, त्यास. ८ महातासहित.

सीताचि न त्रिलोकी हर्षविली त्वां दशाननवधानें ॥
या त्वच्चरितश्रवणीं न टिकावें क्षण अघें अनवधानें[1]"१०६
गुरु-देव-वाक्य मान्य श्रीराम करी, सतीस घे अंकीं ॥
अंकीं गण्य न तें सुख, ये बहु मालिन्य इंदुच्या अंकीं[2]१०७
वृत्रारि[3] अमृतसेकें उठवी विगतासुकीशकटकातें[4] ॥
दे देव देवरायां[5] यश दुर्घट काय विश्वघटकातें[6] ॥ १०८॥
श्रीमार्कंडेय ह्मणे " कपि उठले ब्रह्मदेव-वरदानें ॥
हें त्यांसि दिलें यश त्या प्रभुनें सब्रह्मदेववरदानें[7] ॥१०९॥
राम ह्मणे "त्वांचि दिली त्रिजटे ह्मणतों तुलाचि वसुंधा[8] मी
तव उपकार फिटेसें धनदाच्याही नसेल वसु[9] धामीं ११०
फेडील कोण भाग्यें या सीतादानसूपकारातें[10] ॥
केलें सुधाप्रदें[11] जें न घडेचि नळाहि[12] सूपकारा[13] तें ॥१११॥
ऐसेंचि अविंध्यासहि पूजी, कीं नित्य त्यांचि दोघांहीं ॥
व्यसनीं वांचविलेप्रिय- दार जसे जीव मुच्चिदोघांहीं[14]११२
सीता ह्मणे " हनूमन् त्वद्गत सेतुत्व हें न मज्जनकीं[15] ॥

---

१ दुर्लक्ष्यानें. २ आंकड्यांनीं. ३ इंद्र. ४ मृत झालेल्या वानरसैन्याला. ५ इंद्राला. ६ विश्वरचना करणाऱ्याला. ७ ब्रह्मदेवासहित सर्वांस वर देणाऱ्यानें. ८ पृथ्वी. ९ द्रव्य. १० सीतादानरूप उत्तम उपकाराला. ११ अमृत देणाऱ्यानें. १२ नलराजालाही. १३ स्वयंपाक्याला. १४ मुत्-चित्-ओघ ह्म० आनंद व चैतन्य यांच्या ओघांनीं. १५ माझ्या पित्याच्या ठायीं.

घडतेंचि, भेटतासि न, तरि मज विपदर्णवांत मज्जन कीं॥
तूं धन्य महाभागा बा गा भागां तुझ्याचि यश आलें ॥
झालें होतें मद्वपु दशवदनीं घस्मरीं जसें आलें ॥ ११४ ॥
तूं या कीर्तिसुधासरि- दुदरीं स्वानंद-मत्त मासा हो ॥
त्वद्विरहातें क्षणहि न• सिद्धहृदय साधुसत्तमा साहो ११५
भजतील मत्प्रसादें सर्वहि तुज दिव्य भोग संतत रे ॥
त्वद्भक्तिनें तरो जन हरिहरभजनें जसाचि संत तरे"११६॥
श्रीसीता-वात्सल्यें सजिलीच असेल अंजना भानें ॥
सीताही लाजविली बहुधा घनरूपकंजनाभानें ॥ ११७ ॥
सुग्रीवप्रमुखांसह बैसे श्रीराम पुष्पक-विमानीं ॥
त्यासि सकुलालिवरसम- धिष्ठित दिव्यद्रुपुष्प कवि मानी
राम ह्मणे " पावाया शुचि-सुकृत-निवास-मानसे तूतें ॥
तरलों व्यसनीं या अव- लंबूनि शिवासमान सेतूतें॥११९॥
त्वत्पुण्यें टिकला, सति येणें सिंधूंत पळहि न तगावें ॥
शतगांवें कीं हो हा विश्वें होऊनि यासि नत गावें॥१२०
पाहुनि यांसि न वदलों कीं कैसा भेटतो खळप हाहा ॥
जेणें सेतु विरचिला नमितो तुज देवि तो नळ पहा हा॥
सुगलांदि रावले बहु न दुकाळीं तेंवि रंक रावेल ॥

१ वांव्याला. २ खादाडाच्या ठिकाणीं. ३ कीर्तिरूप अमृत-नदीच्या उदरांत. ४ ही मारुतीची माता. ५ मेघरूप श्रीविष्णूनें ६ कुलासहित, भ्रमरश्रेष्ठानें आश्रयिलेलें. ७ शुद्ध पुण्याचा निवास मानसामध्यें जिच्या ती. ८ या नल वानराला. ९ दुष्टशिरोमणि. १० सुग्रीवादि.

अर्पिति नळा नगं, जसे बुध शिवरात्रींत शंकरा बेल२२॥
ऐसें मनःप्रियेसीं बोले विरहोत्थमानसाधींतें ॥
कळवुनि साधावें जें तत्प्रिय देऊनि मान साधी तें ॥२३॥
प्रभु बोळवी चमूतें बहु पूजुनि पितर जेंवि कन्यांतें ॥
दृष्टांत एकदेशी ठावें तत्प्रेम काय अन्या तें ॥ २४ ॥
मग किष्किंधेंत ह्मणे " स्वकरें स्पर्शोनि अंग दासा हें ॥
हा यौवराज्यभर या सुग्रीव-सुखार्थ अंगदा सा हें ॥२५॥
धन दे, परि तात नदे बहु आवड त्याहि अंग दायादा ॥
तत्तुल्य कसा प्रभु जो साक्षादमृताब्धि अंगद यादां २६
त्या श्रीकर-तीर्थपद- प्रभुचा दे भाग्य आयतें पाणी ॥
जें पंककारण अधो- गति त्या देईल काय तें पाणी २७
पुत्रासि ह्मणे "ह्मणते मज सीता, चाल सिद्ध हो तारे"॥
परि लाजे मन, वदल्यें बहु कटु, जैं नाथ विद्ध होता रे ॥
अंगद ह्मणे "सदरिला करितो सोडूनि भल्ल भस्म रणीं ॥
नमितां न रत अघाच्या हा सीता-प्राण-वल्लभ स्मरणीं२९
लोकीं धन्यत्वप्रद या प्रभुचे पाय हे तुह्मां तारे ॥
यापरि न सुखद होती पति अथवा काय-हेतु ह्मातारे ॥
बा हूं चाल शिरोब्जें वाहूं राम-प्रसू-पदीं राहूं ॥

१ पर्वत. २ विरहानें उत्पन्न झालेल्या, मानासिक चिंतेला. ३ वडिलोपार्जित द्रव्याचा हिस्सा घेणारा पुत्र इ० ४ जलजंतूला. ५ लक्ष्मीदायक;तीर्थ,पदीं ज्याच्या तो.६ हात.७चिखलास अ०पापाला कारण.८अंगदाला.९हे वालिस्त्रिये. १०सज्जनांचे शत्रूला. ११ देह देण्यास कारण. १२ शिरःकमलें. १३ राममातेच्या पायीं.

पाहूं अभिषेकोत्सव, लाहूं सुख,सवतिलाहि दे वाहूं॥३१॥
मीतेसवें विमानीं बसतां मानी पुरास द्वं तारा ॥
न निवे, न भुले कोण, प्रेक्षुनि त्या कापुरा सद्वतारा३२
चढली अजा गजशिरीं, फळली सद्मृतफळेंचि कटुतुंबी॥
तें हेंचि, जें ह्मणति कवि ऐसें विधुला पिपीलिका चुंबी॥
दावी प्रियेसि अग नग गगनग खग मृग नवे नद नद्या या
बहु-वर्णनीं अनुज्ञा भरतस्मृति मज न दे वदन द्याया ॥
श्रीराम ह्मणे "वत्सा अक्षारे शीघ्र धांव बापा हूं ॥
करितोसि कसें व्यसनीं रक्षुनि भरतासि नाव बा पाहूं ३५॥
आलों ह्मण भरताचें वपु पावो सुमहिमा नव पुन्हा तें ॥
होय रुचिर न कसें जें अमृतघनें दह्यमान वपु न्हातें ॥
मार्गे पित्यासि सांडी जरि त्यासि असे सदा सवे गमनीं॥
आपुलियाचि वसे तो पंडित जाणों तदा सवेग मनीं"३७
श्रीरामचंद्र त्याचा कर तो कपि सर्व ताप वाराया ॥
धांवुनि भेटे व्यसनीं भरत-शिशुचकोर तूर्ण ताराया ३८॥
"आला सदार सानुज कुशली श्रीराम जो स्व-जनकवच"
ऐसें वदे पवनसुत वाटे भरतासि तें स्व-जनक-वच ॥३९॥
प्रेमें भुलला नमता भरत कपिहि राम-पद्-रजःप्रवण ॥
सारि राज्यपारितोषिक देतांही त्यासि वारिता कवण ॥
आला 'श्रीराम, असें भरत पुसे पांच सातदां साचें ॥

१ कैसल्येच्या सवतीला—कैकयीला. २ वन. ३ साधूच्या अवतार अशा रामाला. ४ कडु भोंपळी. ५ अक्षशत्रो हे मारुते. ६ नम्र. ७ राज्यरूप बक्षीस.

उत्तराहि तसेंचि करी आवृत्ती पांच सात दासाचें ॥ ४१॥
जाणों निववायास्तव तो चातक होय दाससा मोरा ॥
बोधुनि घेउनि गेला सांभाळुनि तोयदास सामोरा ॥ ४२॥
प्रभुकारुण्यचि धांवे होउनि पुष्पकविमान भरभर तें ॥
कीं व्हावें न व्याकुळ वाहुनि दुर्वाह्य राज्यभर भरतें४३॥
भेटी प्रभुभरतांची स्मरतांचि श्रोतृकोटिला निववी ॥
जिववी मृता सुधा जी तीस इचें यश इच्या पदा शिववी
जो पीडिला रडविला देउनि माथां स्वराज्यभर तातें ॥
तदधिक कसा नव्हे प्रभु जो दे सुख हरुनि भार भरतातें
मज वर्णवेल तें सुख अथवा वदवेल काय हो यश तें ॥
कीं जें अपार तेथें गुरु-शेपांच्याहि काय होय शतें १४६
जशि अब्जिनी प्रमुदिता उदिताऽर्कातें विलोकितां होती
तशि हर्षली अयोध्या पाहुनि रघुवंशभूषणा हो ती१४७
पावे चंद्रेंहि तसें कुमुद न अर्कैंहि तोख राजीव ॥
मज हें कळे कलेवर पुर पुरतें,राम तो खरा जीव १४८
जाणों केले येणें शुष्कसरोमीन संनिधं नदानें ॥
धनदानें सुखवाया कीं केवळ निर्धनासि धन-दानें॥१४९॥
न पुरी प्रकाशली भू- प्रभुरविनें हरुनि अंधकारा ती ॥
आला जाणों दीनो- द्धारोद्यत सांब अंधकाऽराती १५०

---

१ बृहस्पति व शेष यांच्या. २ आनंद. ३ शुष्कसरोवरांतील मासे. ४ जवळ. ५ कुबेरानें. ६ द्रव्यदानानें. ७ दीनांचा उद्धार करण्याविषयीं उद्युक्त ८ शंकर.

कर्दम-शेष-सरीं जों न्हावें व्यसु शुष्क-काय यादानीं ॥
तों जाणों घन वर्षे, पुण्य यश स्वल्प काय या दानीं १५१
जें सीतेचें कैंचें तें स्वर्गींच्या सुभाग्य वल्लीला ॥
प्रभुलाहि लाजल्या हो शतकोटिवदान्यभाग्यवल्लीला १५२
प्रेमाश्रुवृष्टि करितां लाजे घनकोटि दृष्टिला ज्यांच्या ॥
त्या पौरवधूंच्या किति कविजन वर्णील वृष्टि लाजांच्या
बहु हर्षे पाहुनि वनं- वास-निवृत्त-स्वकायजा माता ॥
सुखविल सासूसि तसे यमगेहागताहि काय जामाता १५४
कैकेयीस नमी रघु- सिंह पळे तों तदीय ताप-ससा ॥
सुखधन द्याया धनदचि जरि वरी वेषें करूनि तापससा ॥
हर्षविली जी भ्याली संकोचा जेंवि अंधकारा तीं ॥
अन्वर्थ रामचंद्र, ध्यातो यास्तवचि अंधकाऽराती॥१५६॥
त्या मंथरेसहि ह्मणे " वेड्ये त्वां सर्वथा न लाजावें ॥
हें सद्यश जोडाया मद्बुद्धी न ह्मणती मला जावें॥१५७॥
भरता, तरि राज्य करिन, जरि तूं ह्मणसिल न ईस भाजीन
कीर्ति करी कैकेयी, हे पुण्याची नई सभांजीन"॥१५८॥

---

१ ज्यांत चिखल शेष राहिला, त्या सरोवरामध्यें. २ गत-प्राण. ३ शतकोटी दात्यांच्या भाग्यसंपन्न लीला. ४ लाह्यांच्या ५ वनवासांतून परत आलेल्या आपल्या पुत्राला. ६ यमाच्या गृहांतून परत आलेला. ७ ताप हाच ससा. ८ कैकेयी. ९ यथार्थ. १० श्रीशंकर. ११ नदी. १२ पूंजीन.

तो साधु ह्मणे, अमृता- हुनि आर्यनिदेश[1] गोड कळला हो
जरि हा सुगुरु तदापि जन यासि वहाता न मोडकळ लाहो
राज्याऽभिषेक[3] उत्सव सुमुहूर्ती होय हो यथाविधि तें ॥
कल्याण-पर्व भुलवी गिरिशासह हंसवररथा[4] विधितें १६०
सिंहासनीं जिहीं प्रभु सीतेसह देखिला, तिहीं प्राज्य[5] ॥
वरिलें धन्यत्व, तसें न सुरांचें द्यावया शके राज्य॥१६१॥
तेव्हां गंधर्वमुखीं जिकडे तिकडेहि तननन तननं ॥
मुनि ह्मणति, "वानराणा- मपि न नराणां सुमंगलं जननं॥[6]
परशब्द[7] न साकेतीं, स्वर्गींही आयकों न दे वाद्य॥
या गजरेंचि निवेचि न तप तप हें आयकोन देवाद्य६३॥
ईशहि नाचे, पावे वृद्धि प्रीतीहि देहभा नाचें ॥
किति अप्सराः न मांडे गौरी-चित्तींहि देहभांनाचें ॥६४॥
शतलक्षकोटि खंडी कल्पतरूंचीं फुलें उडविलीं हो ॥
तीं सुरभोग्यें कांपनीं पौरांनी पुरपथीं तुडविलीं हो॥१६५॥
कविकोटिला न वदवे लवहि श्रीरामदेव-राज्याचा ॥
रस कामधेनुचाही रसिकासि वदों न दे वराज्याचा ६६

१ वडिलांची आज्ञा. २ अत्यंत जड. ३ राज्यस्वीकार-समयीं अभिषेक ज्यांत तो (उत्सव) ४ हंसश्रेष्ठ रथ ज्याचा, त्यास. ५ पुष्कळ. ६ नराणां जननं सुमंगलं इत्येवन. वानराणा-मपि नरांचेंच जन्म उत्तम आहे असें नाहीं, तर वानरांचेही जन्म उत्तम आहे. ७ मोठा शब्द. ८ अयोध्येमध्यें. ९ शंकर. १० शरीर-कान्ति. ११ देहस्मृतीचें.

वेंडावले महाकवि वर्णूं जातां धरूनि आवांके ॥
तेथें मयूर-मति किति जी प्रेमभरें करूनि आ वांके॥६७॥
ऐसें चरित्र सांगुनि मार्कंडेयें सबंधु तो धर्म ॥
विज्वर[1] केला कोण न पावे प्रभुचरण सेवितां शर्म[2] ॥६८॥

# अध्याय १३ वा.



## सारांश.

मार्कंडेय ह्मणतात, राजा धर्मा, मद्रदेशांत अश्वपति या नांवाचा राजा होता. त्यानें सावित्रीदेवीची आराधना केली. देवीच्या वरें करून त्या राजास एक कन्या झाली. ती साक्षात् सावित्रीच होती. राजानें तिचें नांव सावित्री असें ठेविलें. तिनें शाल्वदेशाचा राजा द्युमत्सेन याचा पुत्र सत्यवान् यास वरिलें. सत्यवान् अल्पायु होता. विवाहानंतर एका वर्षानें त्याच्या प्राणोत्क्रमणसमयीं स्वतः यम त्याचे प्राण न्यावयास आला. सावित्रीनें त्या समयीं यमाची स्तुति केली. यम प्रसन्न झाला. त्यानें तिला चार वर दिले. पहिल्या वरानें सावित्रीनें श्वशुर अन्ध होता त्यास नेत्रप्राप्ति मागितली. दुसऱ्या वरानें आपल्या राज्यभ्रष्ट श्वशुरास राज्य मागितलें. तिसऱ्या वरानें आपल्या

१ तापरहित. २ सुख.

पित्याला शंभर पुत्र मागितले. चवथ्या वरानें आपल्यास शंभर पुत्र मागितले. शेवटीं यमानें तिचा पतिही सोडिला. व तुझा पति तुझ्यासह चारशें वर्षें राज्य करील असा पांचवा वर देऊन यम स्वस्थानास निघून गेला. या प्रमाणें सावित्रीनें उभयकुलोद्धार केला. तुझी पत्नी द्रौपदी ही तशीच आहे. तुह्मी लौकरच सुखी व्हाल.

धर्म पुन्हा त्याशि ह्मणे "मार्कंडेया मुनीश्वरा आर्या, ॥
आढळली तुज लोकीं सत्वाढ्या[1] आमुची जशी भार्या १॥
मुनि त्याशि ह्मणे होती सावित्रीनाम अश्वपति-तनया ॥
तच्चरित श्रवण करीं, ऐकाया योग्य साधु.पतित[2] न या[3]२॥
होय प्राप्त विधिस्त्री[4]- सावित्रीच्या वरेंचि ती राया ॥
यत्कीर्ति[5] जना ह्मणती कर देत्ये रे, अघाब्धितीरा[6] या॥३॥
झाली भक्त-सुता ती श्रीसावित्रीच उद्धरायाला ॥
श्री[7] क्षीरधिला जन्मुनि जें दे यश तेंच शुद्ध रायाला॥ ४ ॥
बहु लाजवी वराला[8] तीचा कुल-शील-रूप-महिमा गा ॥

---

१ सत्वगुण संपन्न ह्म० संकटसमयीं गंभीरवृत्तीची. २ पातकी. ३ या चरितश्रवणाला. ४ ब्रह्मदेवाची स्त्री सावित्री, तिच्या. ५ जिची कीर्ति. ६ पापसमुद्राच्या तीराला. ७ लक्ष्मी. ८ नवऱ्या मुलांला.

मागां ह्मणे गिरीशचि, न जड-गिरि स्वस्तरूपमहिमागा"
अश्वपति ह्मणे, वत्से "चिंता मज हेचि एक परमा गे ॥
झालीस दान-योग्या; परि कोणीही तुला न वर मागे ॥६॥
जा शोधुनि ये वत्से, वरुनि मतें मानल्या कुलीनातें ॥
कीं तुजकडेचि आहे शतपुत्रांचेंहि गे मुली नातें" ॥ ७ ॥
'स्ववर पहा जा' ऐसें 'योग्य जनीं तोचि, तीसचि वदाया
गुरुच्या वचनें गेली आपण घेऊनि ती सचिव दाया ॥८॥
अनुरूप वर विलोकुनि आली, तों त्या नृपा परमहर्षी ॥
सांगत होता सुकथा श्रीनारद जो कृपापर महर्षी ॥ ९ ॥
ती दोघांतें वंदी तों तीस ब्रह्मकायभू पाहे ॥
सस्मित असें पुसे कीं "त्वत्तनया होय काय भूपा हे ॥१०॥
कोठें गेलीहोती श्वशुरगृहाहूनि काय आणविली ॥
हा सचिवांनीं आजुनि दानोचितता इची न जाणविली"११
भूप ह्मणे "परिसावें तेंचि तुवां सर्व-साधु-कुल-गीतें॥
म्यां पाठविलेंहोतें स्ववर पहाया स्वयें स्व मुलगीतें॥१२ ॥
वद वत्से, काय कसें वर बरवा पाहिला, न लाजावें ॥

१ याचा कर्ता महिमा. २ शंकर. ३ स्वस्तरु ह्म० कल्पवृक्ष, त्याची उपमा ज्यास, अशा हिमवान् पर्वताला. ४ आत्मस्वरूपानंदी. ५ ब्रह्मदेवाचा पुत्र नारद. ६ सावित्रीचा विवाह अद्याप झाला नाहीं. ती स्वतः वर शोधण्यास गेली होती असें नारदास समजल्यावर तो आश्चर्य पावून ह्मणतोः सचिवांनीं वराला इची दानोचितता कां जाणविली नाहीं ? ७ सर्व साधुसमूहानें गाइलेल्या अशा नारदानें.

ह्या गुरुनें धन्य असें ह्मणुनि स्वमुखें तुला मला जावें॥१३॥
सांगे ती सावित्री नृप द्युमत्सेन शाल्वपति आहे ॥
जरि वृद्ध अंध रिपुहृत[1]- राज्य वनस्थाहि न काळजी वाहे ॥
कुल-शील-सत्व-गुण-निधि तो पुत्रकलत्रमात्र[2]परिवार ॥
परि वारं[3] सर्व सम त्या, कीं मथिला स्वान्तरस्थ[4] अरिवार[5]॥
तो श्वशुर मानला मज, चित्तें त्याचा कुमार म्यां वरिला॥
जरि लाजविति सख्या, अनु- सरली गौरी हरा, न त्या हरिला"
नारद ह्मणे "नृपा हे चुकली योजूनि सत्यवान् नवरा॥
न वरावा जरि गुणवान्, योजू अन्या, असे उणें, न वरा" १७
भूप ह्मणे "सर्वज्ञा, देवा, उमजे असेंचि सांग मला ॥
गुणवान् युवा कुलज वर जरि, तरिहि तुला अयोग्य कां गमला
काय इणें न धरावें अधनत्वें भूप-जन[6]-वरा जीवीं ॥
कां न प्राशावें मधु मधुपीनें कूप[7]ज-नव-राजीवीं"॥ १९ ॥
मुनि सांगे "वर्षान्तीं येइल त्या भूप, पुत्रका व्यसुता[8]॥
अन्य वरू, वृतं[9]हि कच त्यजुनि वरी भूप-पुत्र काव्य[10]सुता"
भूप ह्मणे "न वरावा वत्से जरि सुगुणसागर लवायु[11]॥
शीतल मंद सुगंधहि वद सेवावा कसा गरल-वायु[12]" २१॥
ती सुमति ह्मणे "ताता, न त्यजुनि पयोधिला नदी परते

१ शत्रूंनीं हरण केलें राज्य ज्याचें तो. २ पुत्र व स्त्री एवढाच परिवार ज्याचा तो. ३ दिवस. ४ आपल्या अंतःकरणांतील. ५ कामक्रोधादिशत्रुसमूह. ६ राजपुरुषश्रेष्ठाला. ७ विहिरीमध्यें झालेल्या नवीन कमलाचे ठायीं. ८ मरण. ९ वरिलेला. १० शुक्राचार्यांची कन्या देवयानी. ११ अल्पायुषी. १२ विषयुक्त वायु.

न पतंग-चित्त-वृत्ति क्षणही रवीं, त्यजूनि दीप, रते ॥२२
वरिला तो वरिलाचि स्पर्शावा या न अन्य कायातें ॥
हा दृढ निश्चय माझा सवितील कुलीन कन्यका यातें २३
आयुष्य असो कितितरि मज तदितर पुरुष तुज-समचि राया
मन न चळेलचि, येइल जरि चरचर हा गळा यम चिराया,
देवर्षि ह्मणे "त्यासचि दे साध्वी-व्रत-परा सुता राया ॥
शुचि-निश्चयाहुनि अधिक अमृतरस नसे परासु ताराया ॥
हे बहु धन्या कन्या अन्याय-न्याय-धर्म-भाव-ज्ञा ॥
किंबहुना स्वल्पा तरि करि आद्य-सतीहि वल्लभाऽवज्ञा२६॥
होतें सद्धर्माच्या कांसेला लागतां सदा शिव हो ॥
येतों, बसा, प्रसन्न प्रभु मृत्युंजय तुह्मां सदाशिव हो"२७
गेला मुनि जो भगवत्- कीर्ति-महा-कामधेनुचा दुहिता ॥
नेउनि दिली नृपें ती सद्विधिनें सत्यवंत्-करीं दुहिता॥२७॥
माता तात परततां बहु रडती, परि रडे न सावित्री ॥
सुमृदु सुमंत्रीहि ह्मणुनि त्यांशि ह्मणे नामगा नसावि त्री"
झाली तपोवनांत स्वीकारुनि वल्क तापसी ते, तें ॥

१ पतिव्रतेच्या आचरणाविषयीं दक्ष. २ मृत. ३ श्रीगौरी. ४ मृत्यूला जिंकणारा. ५ भगवंताची कीर्ति हीच महाकामधेनु, तिचा. ६ दूध काढणारा. ७ सत्यवानाच्या हातीं. ८ कन्या. ९ सावित्री ह्या नांवांतील. १० 'सावित्री' ह्यांतील 'त्री' हें अक्षर गेल्यावर 'सावि' असें राहतें. सावी--सहावी. मला 'सावित्री' ह्मणूं नका. 'सावि ह्मणा, असें गुरुजनास सावित्रीचें ह्मणणें. मातापिता सासु श्वशुर, व पति हे पांच सुखरूप असले तरच मी सहावी, हें तात्पर्य.

अद्भुत सत्व तिचें,बा, ितका नव्हताचि ताप सीतेतें॥२९॥
वेद श्वशुर,श्वश्रू स्मृति, ती स्वाचारपद्धतीच सती ॥
मुनि ह्मणति "या नृपाच्या उटजीं सिद्धि स्नुषामिषें वसती"
तो सत्यवान् ह्मणे "हे पितृ-राज्यश्री तपोवनांत पती ॥
हो आपन्मुक्त ह्मणुनि बहुधा आपणहि यांमिषें तपती॥३२॥
तत्सद्गुणें प्रमुदितें झालीं केवळ मनांत न तिघें तीं ॥
सकळें सदेवतापस- वृंदेंहितपोवनांत नति घेतीं ॥ ३३ ॥
ती स्वमनांत ह्मणे "तुज तनु रडविल सर्वकाळ जीवा हे॥
सोड इला, वेडया, बुध न कुसंगति धरुनि काळजी वाहे३४
आद्यनळें त्हन्मणिकीं काळाचा कवल व्हावया शिजशी॥
जीवा क्रिया सुटेना केली जे प्राप्त व्हावयाशि जशी"३५॥
ऐसें चित्तीं बोले मोजी उर्वरित दिवस महिने ती ॥
नसतें तसें तरि सुखें वय भोगुनि तदधिक श्रमहि नेती॥३६॥
उरतां चार दिवस ती करि वांचाया पति व्रतारंभा ॥
तन्नियमीं प्रियवाक् ती, शुकीं विलोकी न तीव्रता रंभा ३७
श्वशुर ह्मणे "त्रिदिन-व्रत झालें, कीं वंश धन्य केला गे ॥
कर पारणीं क्षुधा बहु पूर्व-वयामाजि कन्यके लागे"३८॥

१ सदाचाराचा मार्गच. २ पित्याची राज्यलक्ष्मी. ३ संकटापासून मुक्त. ४ या सावित्रीच्या रूपानें. ५ देवां सहित तपस्विजनसमूह. ६ नति घेतीं ह्म० सावित्रीचा नमस्कार घेणारीं. ७ चिताग्नीनें. ८ त्हदयरूप मडक्यामध्यें. ९ शिल्लक राहिलेले. १० त्या व्रताच्या नियमांत. ११ मधुर भाषण करणारी, रंभा उर्वशी. १२ व्रताचरणसमाप्तीचे वेळीं जें भोजन ती.

"ती संकल्पीं आहे सूर्योऽस्तीं पारणा करायाची" ॥
ऐसें श्वशुर-श्वश्रु- चरणांतें जोडुनी करा याची ॥३९॥
फलमूलार्थ निघे पति त्यासि ह्मणे "मजहि सत्तमा न्या हो
वन पाहिन, तुह्मां हे न प्रथम-प्रार्थना अमान्या हो ॥४०॥
चित्राश्व ह्मणे "दयिते गमली वनसरणि काय कोमळ ती ॥
श्रमशिल शिबिकास्थाही दुर्गवन-पथांत बाधको मळती॥४१
उपवास तीं दिसांचा तूं आधींच प्रिये सुमृदुला गे ॥
त्यावें कसें चरण-युग नवनीतापरिसही सुमृदु लागे ॥४६॥
मज सोसेल कशी? जी न पाहवे स्त्रीव्यथा नरा नीचा ॥
श्रमदा प्रमदा-हृदया कथितीहि कवी कथा न रानींच्या ॥
येणारचि तरि माध्वी श्वश्रू-श्वसुरांसि पुस, मग, ये तें॥
योग्य तुज, मजहि,मानिनि गुर्वाज्ञाधिक सुबुद्धि न गयेतें"॥
सावित्री त्यांच्याही आज्ञेतें तत्प्रमाद माधुनि घे ॥
उटजांतूनि सतीसह वंदुनि तो स्वपितृपाद साधु निघे ॥
ती न स्त्री रक्षाया स्वामि निघे आत्तमूर्ति जनकाशी ॥
परम शिवं जीत नांदे ह्मणुनि जिला ह्मणति सुज्ञजन काशी
जे पक्षी जे श्वापद-संघ अधिष्ठुनि कानना वसती ॥
त्यांचें तद्वचनाऽमृत- पानार्थ पुसेल कां न नाव मनी॥ ४७॥

१ प्रार्थी. २ सत्यवान. ३ अरण्याचा मार्ग. ४ क्लेश पावेत. ५ दुःखदायक ( कथा.) ६ वनलें आहे रूप जिनें ती. मूर्तिमंत. ७ पित्याचा आशीर्वाद. ८ शंकर, पक्षीं कल्याण. ९ ज्या आशीला १०सत्यवानाचें भाषण हेंच अमृत, त्याच्या प्राशनार्थ.

पात्र भरूनि फळांनीं　काष्ठें फोडी वनांत, सत्वरतें ॥
पाहूनि तत्कलत्रें　स्मरलें मुनिवच मनांत सत्वर तें ॥ ४९ ॥
जों साध्वी हळुच ह्मणे,　हा नाथा नियत-मानदा रुचिरा ॥
मूर्ति श्रमत्ये, भ्रमत्ये　मति, कीं जी प्रियतमा, न दारूं चिरा
तोंचि ह्मणे तो "उठल्या　करित्या स्मृतिहानि वेदना, लागे
शूल-शत शिरीं, जाणों　सखि अक्षम हा निवेदनाला गे५०
तुझिया मृदु-शीतांऽकीं　शिर ठेवुनि वाटतें निजावें गे ॥
त्वत्स्पर्श अमृत ह्मणउनि　या सत्तापें पळोनि जावें गे" ५१
मांडी देउनि पतिचें　मस्तक हस्त-कमळें सुधी रगडी ॥
दे धैर्य सतीस तिचा　निज-निश्चय जो खरा सुधीर गडी५२
सीता दशकंठा जसि　तशि सत्वें भी न तीव्र-तापा हे ॥
तों पाशपाणिपुरुषा-　प्रति पति-पार्श्वीं पतिव्रता पाहे ५३
क्षितिवरि पतिशिर उतरुनि सविनय झडकरि उठूनि कर जोडी
नमुनि ह्मणे "देव तुह्मी　अशि कैंची अन्य-दर्शनीं गोडी५४॥
केलेंचि धन्य दर्शन-　दानें येऊनि कानना मातें ॥
अजि देवेश, निवावे　बहु हे सेवूनि कान नामातें"॥५५ ॥
देव ह्मणे "सति यम मी, कां आलों, न्यावया तुझ्या पतितें॥
हें दूत-कार्य कीं जी,　जें सेवक-कृत्य, वेगळें सति तें॥५६॥
हा सत्यवान् सुकृतवान् गुणवान् न्यावा न सेवकानीं कीं ॥
ज्या कर्मीं योग्यत्व स्वामीचें,　तें न सेवकानीकीं ॥५७॥

१ सत्वगुणसंपन्न अशा ( कलत्रें ) २ नारदवचन. ३ नित्य मान देणाऱ्या ह्म० माझ्या वचनाचा कधींहीं भंग न करणाऱ्या. ४ लांकूड. ५ पाश हातांत ज्याच्या, त्या पुरुषाला. ६ पुण्यवान्. ७ सेवकसमूहांत.

अंगुष्ठमात्रपुरुषा- प्रति यम पाशीकरूनि आकर्षी ॥
तैं हाय हाय ह्मणती बहु सद्गद-कंठ साश्रु नांकर्षी ॥५९॥
त्यातें बांधुनि घेउनि यमधर्म प्रभु निघे अवाचीतें ॥
भ्याला सतीस बहुधा जें ब्रह्मलिखित बरें न वाची तें॥५९
त्या मागें तीहि निघे, धर्म ह्मणे "भागलीस जा परत ॥
स्नेहऋण फेडिलें त्वां, करुनि स्वपति-क्रिया रहा स्मरत"
साध्वी ह्मणे "प्रभो पति जिकडे, जावीच मूर्ति हे तिकडे॥
स्वगुरु-व्रत-प्रसादें मद्गतिसि न रोधितील हेतिकडे ॥ ६१॥
संत ह्मणति, सप्तपदें महत्रासें सख्य साधुशीं घडतें ॥
सन्मित्रचि न व्यसनीं अन्यों खिल-मित्र संकटीं पडतें६२
तुज संत ह्मणति पितृपति समवर्ती धर्मराज बापा हें ॥
सत्य यश, ह्मणुनि याही कन्येसि दयाकरूनि वा पाहें ॥६३
ऐसें सती वदे, तो बोल शशी, देव तोहि सागरसा ॥
प्रेमें उचंबळे हो, धरि कारुण्यें द्रवासि साग रसा॥ ६४ ॥
धर्म ह्मणे "साध्वी बहु श्रमलीस, स्वाश्रमासि जा मागें॥
जो मागशील तो वर देतों, घे, इष्ट तें मला मागें"॥६५॥
देवा, व्हावे चक्षुः- स्तेज:संपन्न आश्रमामाजी ॥
मामाजी, ऐसें द्या, मति साहेनाचि त्या श्रमा माजी ६६

१ देवर्षि. २ दक्षिण दिशेला. ३ ब्रह्मदेवानें मस्तकीं लिहिलेलें. ४ माझ्या वडिलांच्या व माझ्या व्रताच्या सामर्थ्यानें- ५ शत्रें व पर्वताचे कडे. ६ साधु आहे मित्र ज्याचा, तें. ७साधू वांचून इतर मित्र ज्याचे, तें. ८समदृष्टि ठेवणारा. ९.यमदेव. १० पर्वत-सहित, ११ पृथ्वी. पृथ्वीलाही करुणा आली, असा भाव १२ नेत्रांच्या तेजानें युक्त.

दिधलें, धर्म ह्मणे, परि जातचि होती तशीच मागूनी ॥
देव ह्मणे पुनरपि" जा वत्से, घे वर दुजाहि मागूनी"६७
ती सुमति "ह्मणे राज्य- भ्रंशें बहु खिन्न सासुरा होतो ॥
पावुनि भवत्प्रसादें निज-पद बहु-काळ सासु राहो तो" ॥
'होइल जा' धर्म ह्मणे परि करि अनुगमन सबहुमान सती
कीं जी हंसी, हंसा- वांचुनि मानील नबहु मानस तीं६९
पुनरपि मार्गी काढी जें धर्मरहस्य जेंवि नव पुसती ॥
तें होय वशीकरणचि कीं भासों दे तथापि न वपु सती॥
धर्म ह्मणे"गे बाई, करिसी कां व्यर्थ या श्रामास? तिजा
वर घे, नकोचि मागों, आलीस सुदूर, आश्रमा सति जा
सासि ह्मणे " सावित्री संपन्न असो पिता सुतनयशतें ॥
हा लक्ष्मीसुत-कवि किति लिहिल सतीचें उमासुत न यश तें
उडुपा उडुसें धर्मों- दार्या लाजोनि अभ्रं मुरडे हो ॥
सावित्रीच्या सुयशीं न दिसे पति ह्मणुनि अभ्रमु रडे हो
ऐसें शिरोनि चित्तीं: घेउनि भारीहि, तीन वर, देवा ॥
सोडीना, सोडविल्या वांचुनियां ती सती नवरदेवा ७४

---

१. आपल्या कृपेनें. २ जीवन्त. ३ मागून जाणें. ४ मानससरोवर. ५ कागदावरील पुस्ती. ६ वपु न भासोंदे ह्म० देहभान राखिलें नाहीं. ७ मयूरकवीच्या आईचें नांव लक्ष्मी असें होतें. ८ श्रीगणपति. ९ चंद्राला. १० नक्षत्रसें. ११ मेघ. १२ मागें हटे. १३ ऐरावताची स्त्री. सावित्रीचें यश सर्वत्र पसरलें. यश फारशुभ्र, ऐरावत ही शुभ्रच. तो यशांत बुडाला, ह्मणून दिसेना. ह्मणून अभ्रमु रडूं लागली.

देव ह्मणे "तूं स्वच्छा स्वच्छायाशीच मागती, मति घे,
वर घेउनि जा चवथा, देतों मागोनि मागतीस तिघे॥७५॥
नमुनि ह्मणे "ती वरदा; तुजला अति भार न चवथा न पिसा
स्वरगा आधि,सुरभिचें भागे द्यायाशि न चव थान पिसा
व्हा सुप्रसन्न, वत्से, 'तुज हो सुतशत' असें वदा, त्या हो
सुयशोराशि स्वर्गी, लज्जाप्रद सुरनगा वदान्या हो॥७७॥
भुलला धर्म द्युतिला धृतिला मतिला तिच्या तथा स्तुतिला
न करुनि विचार,जावी मागें,ह्मणउनि ह्मणे 'तथाऽस्तु'तिला
हळुचि ह्मणे" सावित्री पावेन वरें करुनि संततिला ॥
तुमचा प्रसाद ह्मणुनि प्रेमें गातील सर्व संत तिला ॥७९॥
तरि सत्पति मज द्या, कीं तुमची पावल मान सत्या गी॥
यश रक्षाया प्राणहि सत्य गुणासक्त-मानस त्यागी"॥८०॥
रोमांचित धर्म ह्मणे " वाइ गातिल तुझा प्रभाव सती ॥
पतिशीं अविनाभावें वसशिल, रविशीं जसी प्रभा वसती॥
राज्य चतुःशत वत्सर करिल तुझा कांत, सोडिला जा गे
हा त्वन्महिमा जागो सीतेनें जेंवि जोडिला जागें"॥८२॥
तें वृत्तवर्तमान स्वल्पहि न तिच्या कळे वरा, पाशीं ॥
जातां यम, सावित्री धांवत आली कळेवरापाशीं ॥८३॥
पुनरपि तशीच बसली अंकीं घेउनियां स्व-पति-शिर ती॥

१ पवित्रा. २ माझ्या सावलीप्रमाणें. ३ मागून येणारी. ४ तिघे वर मागोनि चवथा मागतीस, तर देतों. घेउनि जा. ५ कल्पतरुला. ६ सत्याविषयीं तत्पर मन ज्याचें, तो. ७ अवियुक्तपणानें. ८ आलेली गोष्ट. ९ यमपाशांत.

जशि चेतना धवांगीं, होय इची जीवितांत मति शिरती
वनदेवता ह्मणति त्या, बा गा मूर्च्छोत्थिता चकोरा हो ॥
स्वस्थ, जोत्स्ना कीं हे द्रुत उठचि, नमावया नको राहों॥
नेत्रें उघडुनि पाहे तो दयितेच्या मुखासचि,वनीं ती ॥
दे त्यासि,जसि नृपासि व्यसनीं देती सुखा सचिव-नीती
स्त्रीस ह्मणे "सुभगे त्वां मृदु मांडी मांडिली उशी,रमला ॥
आत्मा निद्रेशीं,रवि मावळला,लागला उशीर मला॥८७॥
पुरुष श्यामं महौजा ओढित होता बळेंचि मजला जो ॥
तो कोण?पुसेन तया, नसतां स्वप्नोत्तमर्ण मज लाजो ८८
"कथिन उद्यां,झाली बहु रात्रि,वळ असेल तरि उठा राया
देत्यें हात,चला जी, घेत्यें फळ-भाजना कुठारा या॥८९॥
नेत्रें पुसोनि पदरें पतिस ह्मणे " भेटतील मामाजी ॥
बाई ह्मणतां रडतां पडतां दाटून कां श्रमामाजी ॥ ९० ॥
भेटवित्यें ताताला मातेला,या उठा,असें वदली ॥
आली घेउनि, अद्भुत वाटे, कलभासि सांवरी कदली९१॥
ये स्नेहहंस जाणों ईप्रति, सोडुनि तदीय-मातेला ॥
कीं दूर वाहवुनि ने ती सत्व-महानदी यमा तेला ॥९२॥
आला प्रकाश नेत्रीं अंधत्वाचा वरें नुरे गंध ॥
परि भूप पुत्र-मोहें केला पहिल्यापरीसही अंध ॥ ९३ ॥
त्याला ह्मणती गौतम दाल्भ्य भरद्वाज धौम्य तापस "हा
बा गा उगा मुहूर्तो- पस्थित दुर्दैव-दत्त ताप सहा ॥९४॥

१पतीच्या देहांत. २मूर्च्छा गेल्यावर उठलेल्यास. ३ अतितेजस्वी. ४स्वप्नांतील सावकार. ५हत्तीच्या छाव्याला. ६क्षणभर प्राप्त झालेलें.

सावित्री शुभलक्षण- गुणसंपन्ना महासती बा हे ॥
जी जी साध्वी स्वधवा- नुमतें, द्वास्था महासं ती बाहे ॥
वाखाणिति बहु, पाहति मुनि-दारहि भासुरव्रत तिला जे
साध्वीच देवता ही, साध्वीला बा सुरव्रतति लाजे ॥९६॥
शोकें रडतां डोळे जावे, गेले कधीं न यावे गा ॥
दिसतें कल्याण पुढें होऊंचि नको अधीन या वेगा"९७॥
ऐसें समजाविति त्या राजाला जों दयापर महर्षी ॥
तों झाले अवलोकुनि सावित्रीसह तया परम हर्षी ॥९८॥
मुनि ह्मणती "हा आला नेत्रें उघडुनि पहा सदारा या ॥
मोठा भाग्याचा तूं प्रमुदित यांसह रहा सदा राया॥९९॥
दे आलिंगन, अंकीं घे, मस्तक-पद्म हुंग,वाराया ॥
आत्माऽऽत्मज-तापातें दे आशी राजसत्तमा राया ।१००।
पुसतां विलंबकारण चित्राश्व ह्मणे " शिरोव्यथा-शयन
'मुनि ह्मणति, हें नव्हे, वद,वत्से, हो तूंचि आमुचें नयन॥
सावित्रीनें कथिलें तें वृत्त अशेष साधुसंद नमुनी ॥
तेव्हां झाले अतुल- प्रीति-क्रीडेशि केलि-सदन मुनी १०२
मार्कंडेय म्हणे बहु वर्णावें काय? जेंवि शिवसेवा ॥
मज कालापासुनि, तसि मुक्त करी त्याशि ती मनुजदेवा

१ आनंदाला. आनंद, पतिव्रतेच्या दारांत सतत दूतासारखा उभा असतो, हें तात्पर्य. २ उत्तमव्रत ज्यांचें, ते. ३ आपल्यास व आपल्या पुत्रास झालेल्या दुःखाला. ४ कपाळशूळ उठल्यामुळें निजणें. ५ साधूंचा समुदाय. ६ हे धर्मा.

दुसरे दिवसीं प्रकृति प्रार्थिति येऊनि आपुल्या पतितें ॥
'या राज्य करा'सचिवें वधिला,हरिली स्वभूमि ज्या पतितें"
मुनि म्हणति 'अनुभवावें स्वस्थ-मनें राज्यपद नता राया॥
न तपोवन वर तुज बहु, सावित्रीयुक्त सदन ताराया१०५॥
सिंहासनीं बसविला सावित्रीच्या व्रतेंचि हा नियम ॥
वर-सामर्थ्य म्हणा परि गेला होता करूनि हानि यम१०६
सावित्रीनें केला उभयकुलोद्धार हा असा राजा ॥
कृष्णाहि अशीच,स्तुति येती न मुखाशि या असारा ज्या
राम-घन-मयूर म्हणे " निववाल्यचि सुरसिकाशि केकाहो
शंभुहि म्हणे"न सेविति मंद म्हणुनि झुरसि काशिके कांहो

# अध्याय १४ वा.



## सारांश.

एके दिवशीं रात्रीं कर्ण निजला असतां, स्वप्नांत, सूर्यानें येऊन त्यास सांगितलें कीं, उद्यां इंद्र विप्रवेषानें येऊन तुझीं कवचकुंडलें मागेल ; तीं तूं त्यास देऊं नयेत. तीं दिलीं असतां तुझा नाश होईल. कर्णानें तें सूर्यवचन ऐकिलें नाहीं. शेवटीं सूर्यानें सांगितलें कीं, इंद्रापासून अमोघ दिव्य शक्ति तरी मागून घे. तें कर्णानें मान्य केलें. मग सूर्य अन्तर्धान पावला.

१ प्रजा. २ राम हाच मेघ, त्याविषयीं उत्कंठित, मोर. अर्थात् मयूरकवि. ३ हे मयूरशब्दहो. ४ हे काशीक्षेत्रा.

कर्णाचा नियम असा होता कीं, मध्याह्नीं पाठ तापेपर्यंत सूर्यमंत्राचा जप करीत बसावें. तो जप होऊन सूर्यास नमन करिते समयीं ब्राह्मण जें मागेल तें त्यास द्यावयाचें. ती संधि साधून ब्राह्मणवेषानें इंद्र कर्णाकडे आला. त्यानें त्याकडे कवचकुंडलें मागितलीं. तेव्हां कर्णानें इंद्रापासून वासवीशक्ति घेऊन त्यास आपलें शरीर तासून कवचकुंडलें दिलीं.

कवचकुंडलें दिल्यावर इंद्र संतुष्ट झाला. त्याच्या वरानें कर्णाचा देह देदीप्यमान दिसूं लागला. त्याचें यश सर्वत्र पसरलें. कर्णासारखा दाता होणार नाहीं, असें सर्व ह्मणूं लागले. बलिराजासारखाच कर्ण हा आपल्या दातृत्वगुणानें भवसमुद्रापासून तरला.

**स्वप्नीं द्विजरूपी दिन- कर कर्णाला ह्मणे "अगा राया॥**
**कांहीं विहितहित[1] तुला आलों सांगावया अगा राया॥१॥**
**तूं ब्रह्मण्य[2] वदान्य- श्रेष्ठ[3] असें विश्व सुमहिमा गातें ॥**
**ह्मणतें त्वन्मुख, न क्षम ज्या द्याया स्वर्द्रुमहि, मागा तें॥**
**विप्रांसि ह्मणसि इच्छित तें,द्या हा मात्र वर्ण न वदा,न्या**
**करिति कवि तुझें होउनि रोमांऽचित-गात्र वर्णन वदान्या**
**देयार्थें[4] पात्रेच्छा- पूर्ति[5] बुध म्हणेल वा कशास न हो ॥**
**पारि वंचाया विप्र- च्छद्में येणार पाकशासन[6] हो ॥ ४ ॥**

---

१ योग्यहित. २ ब्राह्मणाविषयीं दयाळु. ३ दात्यांमध्यें श्रेष्ठ. ४ देण्यास योग्य अशावस्तूनें. ५ सत्पात्र अशा याचकाची तृप्ति. ६ इंन्द्र.

अमृतोद्भव कुण्डल-युग सहज कवच हें तया न ओपावें ॥
तदितर सर्वस्वार्थी जो विप्र तया ह्मणोनि ओ पावें" ॥५
कर्ण ह्मणे "कोण तुह्मी" विप्र ह्मणे "मी तुझा पिता सविता
तळमळतो वाराया अहिता, साधावया हितास, विता" ॥६
कर जोडुनि कर्ण ह्मणे, करिति न गुरुवर्य कूपदेशाला ॥
नेतो न मानसींच्या निजशिशुतें हंस कूपदेशाला ॥ ७ ॥
हा केल्या शुद्धव्रत सख्यातें करुनि पातळ मळेल ॥
स्वामी मन तुमचेंही पाहुनि मज निस्त्रपा तळमळेल ॥८॥
स्वर्द्रु सुरभि चिन्तामणि वश ज्याला, जो सुरांत सुपदेश ॥
सत्पात्र विमुख नोहे ऐसाचि करा सुतासि उपदेश ॥ ९ ॥
हानि नसो उपदेशें तुमच्या बहु वृद्धि मद्यशाला हो ॥
सत्कीर्तिअमृतशाला, गुरुजी अपकीर्ति मद्य-शाला हो ॥
शोभा यशोंचि, न असी लोकीं धृत-दिव्यकुण्डलें कानें ॥
जोडुनि अयश न व्हावें पितृ-हृदयीं अग्निकुण्ड लेंकानें" ॥
भास्कर ह्मणे "बुडावें त्वच्छोकविषार्णवांत पुत्रा म्या ॥
हें वाटेल उचित तरि दे कुण्डल-कवच-दान सुत्राम्या" १२
कर्ण ह्मणे "जो अयशा गुरु-शोकद तोचि मन्द नर मेला
विष्णुहि ह्मणेल व्हावा सुयशा शोकदहि नन्दन रमेला" ॥
सूर्य ह्मणे "मागावी वा दिव्याऽमोघशक्ति हरिकरगा ॥
वत्सा स्ववधेच्छुधनं- जय-वध-साहित्य हेंचि तरि कर गा" ॥

१ आंगचेंच. २ सर्वस्व मागणारा. ३ विणारा-जनक. ४ वाईट उपदेशाला. ५ हा केल्या ह्म० हा उपदेश ऐकिल्यास. ६ श्रेष्ठ पदाचा स्वामी इंद्र. ७ इंद्राला. ८ यशोहीन. ९ इंद्राच्या हस्तांतील. १०तुझा वध इच्छिणाऱ्या अर्जुनवधाचें साधन.

हें करिन, हरिन अरि-नर- देवप्राणहि, विंचिन्त तूं जा गा"
ऐसा स्वप्न विलोकुनि तो श्रीमान् कर्ण जाहला जागा१५
स्वस्वप्न-वृत्त कथितां करुनी आपृष्ठतापं जप नमन ॥
कर्ण मन-दृष्टि मिळतां सप्रत्यय होय, तप्त तपन-मन॥ १६॥
द्विज-काम-पूर्ति-पर्वीं मन्त्र जपाच्या जपोनि अवसानीं ॥
ये द्विज-तनु हरि, दुर्लभ ज्याचें दर्शन जनासि नवसानीं१७
शक्र ह्मणे "तुजचिपुढें 'दे, हें उच्चारितां न भी.कवि भो॥
साधो ह्मणउनि आलों कांहीं मागावयाशि भीक विभो"
कर्ण ह्मणे "कर जोडुनि पुसतो हा विप्र-दास, कळवा जी
काय तुह्मां द्यावें म्यां धन कन्या ग्राम वा सकळ वाजी"
ब्राह्मण ह्मणे "अदेय स्वप्राणहि वा बुधा न दात्यातें ॥
जें सत्कवि-यश, कैंचें जीवनदाही सुधा-नदा त्या तें ॥२०॥
निज कवच-कुण्डलें मज दे, दात्या याविणें नको कांहीं ॥
तापदाहि मानिजेतो, तापं-हराहि सेविजे न कोकांहीं"२१॥
कर्ण स्मित करुनि ह्मणे "ऐसें द्यावें तुह्मींच वरदानीं ॥
आजि देवेश्वरहो मज कां योजितसां अशक्य-वर दानीं२२

१ शत्रूभूत राजांचे प्राण. २ निःशंक. ३ स्वस्वप्नवृत्त कथितां इ० ह्म० जपानंतर आपला वृत्तान्त सूर्यास सांगतांना. ४ पाठीला ताप होईपर्यंत. ५ कर्ण सप्रत्यय होय ह्म० कर्णाला सूर्याचा साक्षात्कार झाला. ६ सूर्याचें मन. ७ ब्राह्मणांची इच्छा पूर्ण करण्याच्या समयीं. ८ मेघाला. ९ सूर्यही. १० चन्द्रही. ११ चक्रवाकांनीं.

द्यावें कसें स्वजीवन- हेतु सरोदान मीन यादानें[1] ॥
द्यावेंहि कसें जलदें, देवा वांचेन मीन या दानें ॥ २३ ॥
होईन वध्य मी, तूं उपहास्य, असें करूं नको, पावें ॥
प्रभुनें काय न्याय- व्रत-र्वति-च्छळ[2] करून कोपावें ॥ २४ ॥
घ्या कवच कुंडलें ग्रह- णाग्रह[3] जरि, परि असें तरि करा जी
द्या शक्ति ती अरिवधीं, बहुमान्या अरिधरा[4] हरि-करा जी'
शक्र ह्मणे " घे देतों मागें कोणासही न दिधलीला ॥
कृत्यां-व्याल्यऽशनींच्या[5] दावितसे शक्ति नैकविध लीला
सोडावी हे प्राण- व्यसनीं एकीं, करील कृत्यांशी[6] ॥
नाहींतरि परतोनि त्वत्प्राणांतें हरील कृत्याशी[7] ॥ २७ ॥
एक रिपु वधुनि येइल मद्धस्ता, श्री जशी स्वकरवीरा[8] ॥
स्मरण असों दे, ईच्या मोक्षीं बरवा विचार कर, वीरा" २८
कर्ण ह्मणे "मी समयीं ईतें एकीं नरींच सोडीन ॥
मग हे जाऊ, मज न त्यागी ऐशी सुकीर्ति जोडीन" २९॥
शक्र ह्मणे " परि जपतो जो सम सर्वत्र परमहि तेदवना[9]
लोकीं प्रभुप्रियत्वें होय गुणें अल्प पर महित दवना[10] ॥ ३० ॥
कापूनि कर्ण दे, जें वज्रसम अभेद्य सहज-कवच रणीं ॥
ऐसोंचि सत्व-शीळ श्रीवर वाहे स्वनेत्र भवचरणीं[11] ॥ ३१ ॥

---

१ मत्स्यरूपी जलजन्तूनें. २ नीतीच्या व्रतानें वागणाराचा छळ. ३ घेण्याचा आग्रह. ४ सुदर्शनचक्र धरणाऱ्याला. ५ उग्रदेवता, सर्पिणी आणि वज्र, यांच्या. ६ कार्याला. ७ उग्रदेवतेसारखी. ८ आपल्या कमळाच्या ठायीं. ९ कीर्तिरक्षणाला. १० दवणा नावांची वनस्पति. ११ शंकराच्या चरणावर.

त्या शुचि सत्व-समुद्रा, दात्यांच्या नायका, पिता काय,॥
धन्य ह्मणे हरिहि मनीं, तो जेव्हां होय कापिता काय ॥
त्या कवच-कुंडलांतें घेउनि, बहु करुनि वर्णन, वदे हें" ॥
साधो, तुझ्या वरावा आतांचि सुरम्य-वर्ण नव देहें" ३३
दातृत्व-व्रत अद्भुत 'कीं गुर्वाज्ञेशि जें हठें मोडी ॥
पहिल्या-परीस पुष्कळ सयश सद्वर्ण कर्ण तो जोडी ३४॥
सज्ञान ह्मणति "तरला बलि कीं हा साधु कर्ण न बुडाला
खळ तळमळति जसे घट-झष पडतां छिद्र सूक्ष्महि बुडाला"

# अध्याय १५ वा.



## सारांश.

वनवास संपल्यावर द्वैत वनांत पांडव असतां एके दिवशीं एक हरिण एका ब्राह्मणाच्या अरणी शिंगास अडकवून घेऊन गेला. त्या आणून देण्याकरितां पांडव हरिणाच्या पाठीस लागले. पण हरिण सांपडला नाहीं. तेव्हां ते दमून एका वटवृक्षा खालीं विश्रान्तीस बसले. नकुल एका सरोवरावर पाणी आणण्याकरितां गेला. तो पाणी पिणार तों एक यक्ष गुप्तरूपानें त्यास ह्मणाला, माझ्या प्रश्नांचीं उत्तरें दिल्यावांचून पाणी पिशील तर मरशील. तें न ऐकतां नकुल पाणी प्याला. व

तत्काल गतप्राण होऊन भूमीवर पडला. मागून सहदेव भीम, अर्जुन आले. त्यांची ही तीच दशा झाली. मग धर्म आला. चारी बंधु पडलेले पाहून फार शोकाकुल झाला. पाणी पिऊन मग ह्याचें कारण शोधावें असें मनांत आणून पाणी प्यावयास, गेला. तों यक्ष आपलें पर्वतप्राय रूप दाखवून त्यास ह्मणाला तुझे बंधु मीं मारिले. तूंही माझ्या प्रश्नांचीं उत्तरें न देतां पाणी पिशील तर मरशील. मग धर्मानें यक्ष प्रश्नांचीं उत्तरें दिलीं. तेणें करून यक्ष संतुष्ट झाला. चारी बंधु उठले, मग यक्षानें मी यमधर्म आहें असें ह्मणून आपलें रूप प्रकट केलें. मीच हरिण झालों होतों. असें ह्मणून अरणी धर्माच्या स्वाधीन केल्या-मग अज्ञातवासाला तुह्मी विराटनगरांत. जा तुह्मांस कांहीं विघ्न येणार नाहीं. असा आशीर्वाद देऊन यम अंतर्धान पावला.

सरला वनवास मग द्वैतवनीं पांडुनंदन वसति तें ॥
दिवसांत वांकुल्या शत दावित होतेंचि नंदन-वसतितें॥१
विप्राशि आधि तेथें बहु दे जो हरिण हरुनि अरणीतें ॥
तन्मारणीं करिति ते कौशल, केलें कधींहि न रणीं तें२॥
शृंगाऽग्रविलग्नोऽरणि तो मृग गेलाचि, लागले होते ॥
त्यामागें जे फारचि, पांचहि, नरसिंह भागले हो ते॥३॥
भेटे वनीं अकस्मात् तापाऽपह साधुसाचि एक वट ॥
तच्छीतच्छायेतें सेविति ते तृषित वीर एकवट ॥ ४ ॥
धर्मचि धैर्य साहे सोसील व्यसन काय दुसरा तें ॥

१ घर्षण करून अग्नि उत्पन्न करण्याची पिंपळाचीं लांकडें.
२ शिंगाच्या अग्राला लागल्या अरणी ज्याच्या तो.

नकुळ तदाज्ञा घेउनि आणाया तोय जाय सुसरांतें ॥५॥
उष्णें झाला होता तप्त तृषित जेंवि धेनुसुत डागें ॥
धांवे तरंग-हस्तें जाणों पाचारिलाचि सुतडागें ॥ ६ ॥
तों यक्ष ह्मणे " बापा आधीं सेवूं नकोचि तोयातें ॥
मत्प्रश्नोत्तर-दाता प्याया न्यायाहि योग्य तो यातें" ॥७॥
करुनि अनादर पीतां पडला तो धैर्य-मेरुही नकुळ ॥
किमपि न बदे न पाहे ' पतित श्रीमंत जेंवि हीन-कुळ ८॥
मग सहदेव धनंजय भीमहि पडले तसेंचि जळपानें ॥
गमले वधिले ते त्या स्वह्रदतटिं कालियाख्य-खळपानें ॥
धर्म ह्मणे " हा देवा न कळे झाला अनर्थ काय कसा
मज बंधु एक तरि जळ द्याया यावाचि शीघ्र सायकसा
हा रे कितवा धर्मा स्वकृतें निज-जीवितासि आंचव घे, ॥
धिक् धिक् ह्मणोनि विटते द्यूत न करितास बंधु कां चवघे"
ऐसें ह्मणोनि जाउनि धर्मे ते बंधु पाहिले शवसे ॥
साधूंत अहंताशी ज्यांमध्यें चेतना न लेश वसे ॥ १२ ॥
हा भीम हा धनंजय न स्वर्गीं सुख पहाल हा नकुळा ॥
हा सहदेवा दोष त्यजितां मज काय हा लहान कुळा १३॥
गेलासि केंवि भीमा त्यागुनियां मज गुरुमति ज्ञात्या ॥
त्यजिल्या सुयोधनोरु-ध्वंसादि कशा गुरु प्रतिज्ञा त्या॥१४॥
वत्सा न भंगलासि प्रभुशींहि करुनि तशाहि विपर्म-रणा

• १ उत्तम सरोवराला. २ बैल. ३ कालियनामक दुष्ट शिरोमणीनें. ४ बाणासारखा. ५ शंकराशीं. ६ भयंकर.

कालविलें काय जळीं त्या दुष्टांहीं वशांऽहिविष मरणा
विष कालविलें असतें तरि सलिलीं करपतीं न कां नलिनें
अलिनें त्यजिलीं असतीं होतीं तुमचींहि आननें मलिनें॥
गेलां स्वर्गासि बरें जा, परि कवणासि हा निरविला हो
अत्यद्भुत हें ह्मणतिल न कधींही पद्म हानि रविला हो
विजयि चतुर्बंधु चतु- र्भुज लीलेकरुनि आक्रमीन रसा ॥
ऐसेंचि ह्मणत होतों परि झालों आजि दीन मी नरसा ॥
यामागें न व्यसनीं आजि बुडालों जळीं महोपळसा[1] ॥
रे मुग्ध जीव-शुक जा सोडुनियां लुब्ध या न हो पळसा
मेले कसे अकस्मात् तेज असे ह्मणुनि होय न व्याधी ॥
तर्क न चाले बहुधा माझी तृष्णाकुलाचि भव्या धी २०
प्रिय-बंधुमरण-कारण शोधूं, जलपान करुनि तर्कश तें॥
जें क्षुतृट्प्रतिबंधा न गणी मुनिचेंचि हृदय कर्कश तें" ॥
चिंतुनि ऐसें प्याया गेला जों साधु दक्ष तोयातें ॥
विनिवारी तोंचि सर- स्तट-गत बकरूप-यक्ष तो यातें ॥२२
" रे कौंतया केले अनुज तुझे प्रेतरूप म्यां चवघे ॥
तू तरि वांच हठें जळ सेवुनि मरतां उगेचि कां अवघे ॥
मत्प्रश्नाचें उत्तर दे जळ सेवूनकोचि थांब कसा" ॥
धर्म ह्मणे " ऐसा तूं, कोण प्रभु जाहलासि कां बकसा"
'मी यक्ष' असें सांगे दावी प्रकटुनि शरीर पर्वतसें ॥
पूर्वी कधींहि झालें प्राप्त न आश्चर्य-भीति-पर्व तसें ॥२५॥

---

१ वश केलेल्या सर्पाचें. २ मोठ्या दगडासारखा.

धर्म ह्मणे " अग्निपुढें पांडित्य करील काय कापूस ॥
कळल्या उत्तर देइन पुसणें तें यक्ष-नायका पूस" ॥ २६ ॥
यक्षातेंचि न निववी नृपदत्त प्रश्न-शत-समुत्तर तें ॥
सुश्रोतृवृंद ज्याच्या श्रवणें होऊनि बहु समुत् तरतें॥२७॥
यक्ष ह्मणे " कौंतेया या पांडित्यें गुरूहि तुज लाजो ॥
झालों प्रसन्न चवघां- माजि उठो, एक इष्ट तुजला जो"॥
धर्म ह्मणे "नकुळ उठो" यक्ष ह्मणे " मान्य जे शतक्रतुला
भीम नको, विजय नको, आवडलें त्यजुनि अमृत तक्र तुला'
धर्म ह्मणे "बा यक्षा मज तों माद्री पृथा समा नावें ॥
दोघींचीहि असावीं म्यां अधिक उणें कधीं न मानावें३०
उरलों मी कुन्तीचा माद्रीचा ज्येष्ठ-पुत्र उरवा हो ॥
स्वर्गीं न अश्रुधारा त्या मातेचें कदापि उर वाहो" ३१॥
यक्ष ह्मणे "बा साधो तूंचि परम धन्य भरत-सन्तानीं ॥
तुझिया यशीं निवाया निरत असावेंचि भरत सन्तानीं३२
पाहसि समभावें अनु- जांसि, सुतांसहि असें न बा पाहे॥
सुप्तोत्थितसे भ्राते चवघेहि तुझे उठोत बापा हे" ॥३३ ॥
त्या यक्षवरें उठले सुखसुप्त तसे पळांत चवघे ते ॥
फार निवाले पांचहि अमृताची जेंवि देव चव घेते॥३४॥
भूप ह्मणे " यक्ष न तूं, कोण प्रभु, अद्‌भुत-प्रभावांचे ॥
लीलेनें असु हरिले न तुजपुढें आमुची प्रभा वांचे"॥३५॥

१ आनंदयुक्त, २ शिरत. ३ महापराक्रमी अशा माझ्या बधूंचे.

पुसतां ऐसें प्रेमें सांगे तो त्या नृपास मज तात ॥
धर्म असें जाण सुता कवि ज्याची सम कृपा समजतात ॥
झालों प्रसन्न वत्सा धर्मात्मा तूंचि धन्य मत्तनया ॥
वर माग मत्प्रसादा पात्र मला होय अन्य मत्त न या" ३७
भूप ह्मणे "हें द्या ज्या हरिण-हृता सांपडोत त्या अरणी॥
धर्म ह्मणे "या घे वा कैंचा मृग ? आमुचीच ती करणी ३८
माग दुजा वर बा गा द्यावें सर्वस्व हें असे नातें ॥
वत्सा तुला न द्यावें ऱ्यां तातें वस्तु जें असेना तें" ॥३९॥
राय ह्मणे "संवत्सर दुर्घट अज्ञातवास हा तातें ॥
हो निर्विघ्न असा वर द्यावा ठेवुनि शिरीं स्व हातातें" ४०
पितृपति ह्मणे "विराट- क्षितिपति-नगरीं तुह्मीं विशंक रहा
गुप्त असाल, उगाचि न वर, गुरुवर अतुललील शंकर हा
तिसरा वर माग, तुझ्या भुललों मी साधुनायका महिम्या"
वन्दुनि ह्मणे युधिष्ठिर "जिंकावा लोभ कोप कामहि ऱ्यां
ऐसे सद्वर देउनि आशीरमृतें यथेष्ठ वर्षोनी ॥
स्पर्शोनि शिरीं झाला अन्तर्हित धर्मराज हर्षोनी ॥ ४३ ॥
पाण्डव त्या विप्राच्या ठेविते आधीं शिरोंबुजें चरणीं ॥
मग अर्पिति धर्मप्रभु- दर्शनवरलाभ-हेतु त्या अरणी ४४ ॥
सहवासी ब्रह्मसभा विनवुनि घेउनि सुखें तदाज्ञा ते ॥
गुप्त वसाया गेले सरला वनवास जैं तदा ज्ञाते ॥ ४५ ॥

१ यम. २ आशीर्वादरूप अमृतानें. ३ गुप्त. ४ यमधर्माचे दर्शनाला आणि वरप्राप्तीला कारण, अशा. ५ ब्राह्मणसमुदाय.

खगमृगवनदैवत दारि-सरिदद्रि-सरांसि हात जोडूनी ॥
रडले पांडव जातां सहवासी ब्रह्मवृन्द सोडूनी ॥ ४६ ॥
एवं भक्तमयूरें श्रीमद्राम-प्रसाद-घनपर्वी[1] ॥
केलें तांडव तोषें श्रीमद्भारत-तृतीय-वनपर्वी ॥ ४७ ॥

१ श्रीरामाचा प्रसाद 'हाच मेघ, त्याचें पर्व ह्म० प्रावृट्काल, त्यांत.

मुम्बई मध्यें.
" श्री हरिवरदा " प्रिंटिंग प्रेस.

# वनपर्व.

| पृ. | ओ. | अशुद्ध. | शुद्ध. |
|---|---|---|---|
| ५ | १९ | कज | कंज |
| ६ | १२ | दावी | दावीं |
| १० | १३ | खळला | खळाला |
| ११ | २ | मैत्रय | मैत्रेय |
| १२ | २१ | माडा | मांडा |
| ,, | २२ | पक्न्न | पक्वान |
| १४ | ८ | बानवासास | वनवासास |
| १५ | १६ | महाविनें | महाथिनें |
| १६ | ६ | पूर्वाभ्यासीं | पूर्वाभ्यासी |
| १९ | ११ | हि | चि |
| २२ | १२ | अम्नाय | आम्नाय |
| २३ | १८ | जनासा | जुनासा |
| २४ | १० | दुर्व्यनीं | दुर्व्यसनीं |
| २४ | १० | तापा तें | तापातें |
| २६ | १२ | सद्विद्या | सद्विद्या |
| ३१ | १६ | दें त | देंत |
| ३८ | ११ | विरल् | विरल |
| ४० | ९ | बृहदश्व | बृहदश्व |
| ४० | ९ | तुह्माहुन | तुह्माहून |
| ४० | १७ | भ्रंश | भ्रंश |
| ४२ | १० | निर्वेदीन | निर्वे दीन |
| ४३ | १९ | प्रभावातें | प्रभवातें |
| ४४ | २ | त्याहुनि | पाहूनि |
| ४५ | ६ | मान वसुतनये | मानवसुतनये |
| ,, | २० | श्रीष्णाचा | श्रीकृष्णाचा |
| ,, | २० | मुरप | सुरप |
| ४७ | १३ | गाती | गा ती |
| ४८ | ७ | अवघे | अवघे |
| ५१ | २ | सकलो पा· लाला | सलोकपाळा- ला |
| ५२ | ४ | भजे | सजे |
| ५२ | ७ | पुष्करार्शि | पुष्करासि |
| ५३ | १ | सदारपणें | सुदारपणें |
| ,, | ६ | देती न दिन | देति न नदी |
| ,, | १५ | वस्त्र हर | वस्त्रहर |
| ५४ | ११ | वस्त्र | वस्त्रा |
| ५४ | १२ | वस्त्र | वस्त्रा |
| ५५ | १७ | पाद तळ | पादतळ |
| ५६ | ५ | होंचिरिता | होंचि रिता |
| ५८ | २२ | सुनश | सुनंदा |
| ५९ | ८ | अंगुष्ठामात्र | अंगुष्टमात्र |
| ६३ | ४ | असोंचि | असेंचि |
| ६३ | १७ | नशेय | नेय |
| ,, | १८ | वियोगाधि | वियोगार्थी |
| ६४ | ७ | आनां | असतां |
| ६७ | ९ | वार्ष्णेयांच | वार्ष्णेयांचे |
| ६७ | २४ | व तु | वस्तु |
| ६९ | २ | महा यशा | महायशा |
| ७२ | ९ | बिनवुनि | विनवुनि |
| ७३ | २१ | अश | अशीं |
| ७६ | ८ | विलासचा | विलासाचा |
| ७७ | २ | पुण्य श्लोक | पुण्यश्लोक |
| ,, | ९ | श्लोक यशें | श्लोकयशें |
| ,, | १७ | लोम | लोमश |
| ७९ | १६ | भयात्रात्या | भया त्रात्या |
| ८० | ६ | श्री- | श्री |

| पृ. | ओं. | अशुद्ध. | शुद्ध. |
|---|---|---|---|
| ८० | १७ | अर्ध्या | अर्धा |
| ८२ | १६ | वर्षा | र्वर्षी |
| ८३ | २ | त्मन्माता | त्वन्माता |
| ८३ | १३ | हरि तजें | हरि-तेजें |
| ८६ | १३ | कांपिंत | कपितें |
| ८७ | १२ | अटोपाया | आटोपाया |
| ८९ | ७ | सैगंधिक | सौगंधिक |
| ९३ | ११ | काल केय | कालकेय |
| ९४ | ८ | सतबन | सबत |
| ९६ | १४ | रक्षः स्कंध० | रक्षः-स्कंधा |
| ९८ | ७ | नेवें | नेत्रें |
| १०० | २० | क्रिम | क्रिमत |
| १०६ | १६ | दिग्विज | दिग्विजय |
| १०९ | २३ | अवि | आवि |
| १११ | ११ | खळ- | खळ-वळ |
| ११५ | २२ | दान | दानव |
| ११७ | २३ | मागार्चा | मार्गाचा |
| ११८ | १२ | पायास | पयास |
| ११९ | ५ | अनमा | अनघा |
| ,, | १२ | पहयास | पहायास |
| ११९ | १६ | वर्म | धर्म |
| १२० | ६ | रणगणांत | रणांगणांत |
| १२१ | २० | माडें | मांडें |
| १२४ | २ | आठावला | आटविला |
| १२४ | २० | अवकाशला | अवकाशाला |
| १२६ | १७ | सहस्र | सहस्र |
| १२६ | २२ | हिमनान् | हिमवान् |
| १२८ | ५ | बालोनि | बोलोनि |
| १३० | १२ | फळ | पळ |
| १३१ | २२ | आगावरील | अंगावरील |
| १३२ | १० | स्पर्शया | स्पर्शाया |
| १३६ | १० | रकीं | नरकीं |
| १३६ | २१ | रूप्र | रूप |
| १३९ | ६ | दासासमंजत्वें | दासासमंजस० |
| १४२ | १६ | त्रिभूवनेंहि | त्रिभुवनेंहि |
| १४३ | १२ | महीध्र भुप-धर | महीध्र-भूप व. |
| टी. | १२ | पर्वत | पर्वतश्रेष्ठ |
| | | | [ करणारा ] |
| १४३ | १३ | राजास धारण | हिमालय पर्वत |
| १४४ | ४ | सुरदु | सुरद्रु |
| १४४ | १२ | षांषु | पांषू |
| १४४ | १९ | खिकांवलेली | शिकाविलेली |
| १४५ | १८ | अलंध्य | अलंघ्य |
| १४६ | १८ | शिखर | शिखरें |
| १४७ | ५ | मुर्धगाहि | मूर्धगाहि |
| १४७ | १५ | योजी | यो जी |
| १४८ | १८ | अज्ञेस | आज्ञेस |
| १५२ | ४ | दाखावे | दाखवावें |
| १५४ | ५ | लमक्षणानीं | लक्ष्मणानीं |
| १५५ | १३ | रंध्रे | रंध्रें |
| १५५ | १८ | पाहातां | पहातां |
| १५५ | २० | मत्रांतील | मंत्रांतील |
| १५९ | १६ | वळें | खळें |
| १६० | ३ | असे | असें |
| १६० | ११ | दक्षिण | दक्षिण |
| १६२ | २० | हांशील | होशील |
| १६३ | १८ | मगन | गमन |
| १६५ | १५ | कारिता | कारितां |
| १६५ | २० | अंगाकारिता | अंगीकारितां |
| १६६ | २० | अंकार | अंधकार |

| पृ. | ओ. | अशुद्ध. | शुद्ध. | पृ. | ओं. | अशुद्ध. | शुद्ध. |
|---|---|---|---|---|---|---|---|
| १७० | १९ | मुक्तना | मुक्तता | १९४ | २३ | आल्यायुषीं | अल्पायुषी |
| १७१ | २ | इद्रानें | इंद्रानें | १९६ | १ | अद्गुत | अद्भुत |
| १७१ | ६ | रामन्द्र | रामचन्द्र | १९६ | २२ | उर्वशी | अप्सरा |
| १७१ | १२ | दुर्वशान | दुर्दशा न | १९७ | २ | श्वश्रु | श्वश्रू |
| १७२ | १६ | आ | आणि | १९७ | ४ | आमान्या | अमान्या |
| १७३ | ३ | रचिलें | चिरलें | १९८ | ११ | सर्वे | सर्वें |
| १७६ | १५ | लयाला | ल्याला | १९८ | १५ | वशर्न | दर्शन |
| १७६ | १९ | भृत | घृत | १९९ | ३ | यमधर्भ | यमधर्म |
| १८१ | २० | सुरभासी | सुरभीस | १९९ | ११ | वर्मराज | धर्मराज |
| १८६ | ७ | सा हे | साहे | २०२ | ३ | वुत | द्रुत |
| १८७ | १४ | श्रीरामचंद्र | श्रीराम चंद्र | २०६ | १८ | सुयशा शांकत | सुयशाशांकत |
| १८७ | २१ | कैंसल्या | कौसल्या | २०७ | ४ | कर्ण मन | कर्णमन |
| १८९ | ८ | तसे | तसें | २०७ | ११ | सुधा | क्षुधा |
| १८९ | १० | वरी | वरि | २०८ | २ | मीन | मी न |
| १८९ | ११ | अंवकारा | अंधकारा | २११ | १८ | मांमा | भांमा |
| १८९ | १८ | सपन्न | संपन्न | २१२ | १२ | तर्कश तें | तर्कशतें |
| १९१ | १ | वैडावले | वेडावलें | २१२ | १३ | क्षुतृट् | क्षुत्तृट् |
| १९४ | १५ | वृत्ताहि | वृत्तांहि | २१४ | १५ | यथेष्ट | यथेष्ट |

॥ श्री ॥

# श्रीमयूरकविकृत



भारतांतर्गत

# विराटपर्व.



बाबाजी अनंत तेंडुलकर.

यांनीं आपल्या

" श्रीहरिवरदा " छापखान्यांत छापिलें

मुंबई.



१८९०.

# भारत.

[ विराटपर्वांतील आर्या. ]



## अध्याय १ ला.

### सारांश.

पाण्डव अज्ञातवास करण्याकारितां विराटनगरास जाण्यास निघाले त्या, वेळीं गुरुधौम्यऋषीनें त्यांस राजाजवळ कोणत्या रीतीनें रहावें याबद्दल उपदेश केला. व तो द्रुपदपुरास निघून गेला.

मग पाण्डव विराटनगरांत गेले. त्यांनीं आपलीं नांवें व वेष बदलिले. धर्मराज कंक यानांवानें विराटाजवळ न्यायधीश होऊन राहिला. भीम बल्लव झाला. अर्जुन स्त्रीवेष घेऊन बृहन्नडा यानांवानें विराटराजकन्येला नृत्यगायन शिकविण्यास राहिला. नकुल ग्रंथिक या नांवानें अश्वपाल होऊन राहिला. व सहदेव तंतिपाल नामें करून गोरक्षकांचा नायक झाला. द्रौपदी ही सैरंध्री होऊन राजाची स्त्री सुदेष्णा इच्याजवळ राहिली.

सैरंध्रीचें सौंदर्य पाहून राजाचा श्यालक कीचक मोहित झाला.

त्यानें द्रौपदीला स्पर्श केला. तेव्हां भीमानें गुप्तरूपानें त्यास मारून टाकिलें. तसेंच उपकीचक, जे कीचकाचे शंभर बंधु, त्यांनींही द्रौपदीचा छळ केला ह्मणून भीमानें त्यांसही मारून टाकिलें.

वत्सल[1] ताताऽधिक जो गुरु धौम्य ज्ञान-पुण्य-राशि कवी॥
अतिहगन राज-सेवा- धर्म तया कुरुकुलेश्वरा शिकवी॥१॥
धौम्य द्रुपद-पुराप्रति जातां घेऊनि अग्निहोत्रास ॥
प्रार्थूनि ह्मणे " न शिवो या यजमानासि अग्नि हो त्रास२॥
सशतांग[2] इंद्रसेना- द्यनुचर कृष्णाऽश्रयासि धाडून ॥
पाठविला द्रुपदपुरा- प्रति दासी-दास-वर्ग झाडून ॥ ३ ॥
गेले विराट-नगरा पांडव अज्ञातवास-कामुक ते ॥
चुकतें भावि, तरि सुखा मुज्ञ श्रीकांत- दास का मुकते॥ ४॥
जी तच्छस्त्र-त्राणा आश्रय, त्या संकटांत होय शमी ॥
शिव-मूर्तिसी श्मशानीं तीचें वर्णू न काय हो यश मी ॥
भेटोनि विराटासि प्रथम युधिष्ठिर वदे मनोज्ञ असें ॥
"नामें[3] कंक द्विज मी, धर्माश्रित अक्ष-केलि- दक्ष असें"६॥
ठेवी विराट-नृप बहु- मानें सभ्यांत याहि सभ्यास ॥
वर्ते नृपाश्रितांत नृ- पाश्रितसाचि नसतांहि अभ्यास॥७॥
मग भीम ह्मणे "राया मी धर्माश्रित लहानसा, माजी ॥
आख्यीं बल्लव, सेवा होती प्रभुच्या महानसांमाजी[4]"॥८॥

१ दयालु. २ रथसहित. ३ नांव. ४ पाकशालेमध्यें.

स्व- महानसीं विराट स्थापी पूजूनि बल्लवाला हो ॥
हळहळुनि ह्मणे धर्म "स्वपदा हरिपाद-पल्लवा, लाहो"९॥
होऊनि मलिनवेषा जातां राजप्रियेकडे कृष्णा ॥
चित्तीं ह्मणे "अहा! वहु अवघड हे उंबरे कडे कृष्णा"१०
पाहुनि पुसे सुदेष्णा "बाइ कवण तूं असी दशा कां गे"॥
"कृष्णाश्रिता भुजिष्या सैरंध्री मी" असें तिला सांगे११॥
राज्ञी ह्मणे "पहाया रूप असें ईश्वरीस नवसावें ॥
कोण सचक्षु ह्मणेल स्वगृहीं तुज सुंदरीस न वसावें॥१२॥
परि निश्चयें त्यजिल मज पाहुनि तुज भूप सुकर्मनीयेतें ॥
वाटे विलोकिता जरि हें अद्भुत रूप शुक, मनीं येतें ॥
काय करावें त्यां तरि जरि सुंदरि अनुसरेल पति तूतें ॥
वद कोंवि आवरावी अमृत-फलद्वता रसज्ञ-मति तूं तें"१४॥
"दैवें सैरंध्रीपण हें कांहीं काल पातलें पदरा ॥
पांचां गंधर्वांची पत्नी मी, पावल्यें कधीं न दरा ॥१५॥
स्पर्शों न देचि बाई स्वप्नीं ही मन्मना विवेक मला ॥
गगनमणि-करींच्या तम केव्हां तरि काय हो शिवे कमला
हें वपु पर-भोग्य नव्हे जो पुरुष बळेंचि हात लाविल या
पावेल लय ज्योति- स्पृग् जेंवि पतंग- मातला विलया१७
उच्छिष्ट चारितां मज, मजकरवीं धुवविनांचि चरणातें ॥

---

१ दासी. २ दुर्गेला. ३ सुन्दरीला. ४ मनीं येतें ह्म० त्याच्या मनांत विषयवासना उत्पन्नझाली असती. ५ सूर्य. ६ ज्योतीला स्पर्शकरणारा.

नर कीं नारी पावे मत्पतिपासूनि सद्य मरणातें" १८
तीतें ह्मणे सुदेष्णा "मन्निकट स्वस्थ तूं सये राहें ॥
त्वत्सख्य-भाग्य दुर्लभ यावें स्वप्नांतही न येरा हें" ॥१९॥
मग तंतिपाल-नामें राहे सहदेव होउनि खिलारी ॥
हे लीला कौरव किति न बहु हरिजनीं स्मरादिनिखिलारी
स्त्रीवेष क्लीबत्व स्वीकारी शक्रभू, पतन येतें ॥
इतरां, परि तो नचळे शिकवी नृत्यादि भूपतनयेतें २१॥
रक्षाति हरिहररूपें पक्ष्में ज्या अतिशय-प्रिया बुबुळा ॥
नामें बृहन्नडा तो होय धरुनियां करांत कंबु बुळा ॥२२॥
नकुल ह्मणे "मी ग्रंथिक- नामा' हय-शास्त्र जाणता राया॥
तो शालिहोत्र कीं हा तुल्याचि अश्वांसि जाण ता राया ॥
ज्याच्या ठायीं नांदे सन्नीति, जसी दयाऽधिका रामीं, ॥
राया, करीत होतों त्या धर्माच्या हयाधिकारा मी" ॥२४॥
मत्स्य ह्मणे "आश्रय मी तुज, पल्वल जेंवि मानस-मराला॥
नरयान त्यापुढें किति कामा ये जें विमान समराला२५।
धर्माश्रितांसि आश्रय मी, लोकां हांसवितिल काविराट॥
परि शोभेलचि, भासत होता लोकांस वितिलक विराट" ॥
ग्रंथिक ह्मणे नरेंद्रा "एथेंही स्पष्ट तोचि धर्म असे ॥
ऐसें नसतें, तरि हे येते न प्रार्थितां कशास असे" ॥२७॥
अज्ञात- वास-काळीं त्यांची कष्टा दशा वदावि किती ॥

१ तत्काल. २ श्रीकृष्ण आणि मारुति, ह्या रूपाचीं. ३ डोळ्याच्या पापण्या. ४ शंख, अर्थात् शंखवलयें. ५ अश्वपरीक्षा-शास्त्रकर्ता एक पुरुष. ६ तिलकरहित. ७ अर्जुन.

द्रव्यार्थ भीम अर्जुन अर्थे लब्धांऽबरें तदा विकिती ॥ २८ ॥
वरचेवर दे धर्म द्यूत-विजित-पण-धन स्व भावांस ॥
समयज्ञ कावि न ह्मणतिल कृपण असें त्या घनस्वभावांस॥
एकांतीं गुप्तपणें भेटे, चोरासि जेंवि चोरसखा ॥
सहदेव ह्मणे बहुकृश दिसतां व्हा तुष्ट पुष्ट गोरस खा ३०
स्वामीपासुनि नकुळहि जोडी भ्रात्रर्थ धन हयां सजुनी ॥
अंतःपुरीं मिळालीं बस्त्रें अर्जुनहि दे तयांस जुनीं॥३१ ॥
दयितांसि द्रुपद-सुतां भेटे भलत्या मिषें,न दे विरहा ॥
तन्मति तिला ह्मणे "पति अतिमृदुल,न भेटतां न देवि रहा'
तें अमृतवर्ष दर्शन त्यांसि, अदर्शन चिरांटन गरांत ॥
एवं मास-चतुष्टय ते क्रमिती त्या विराट-नगरांत ॥३३॥
ब्रह्मोत्सवांत तेथें ये साक्षान्मल्लकाळ जीमूत ॥
ज्याची आणी बहुतां भुज रण-निपुणांसि काळजी मूत॥
आहे कोण्ही मजशीं भांडेसा हें सगर्व मल्ल वदे ॥ ३५ ॥
रंगीं तया क्रियोत्तर राजाज्ञेनें सशंक वल्लव दे ॥ ३५ ॥
काळासींहि कराया सिद्धचि तो धीर-वीर भीम रणा ॥
कळतां सुयोधन पुन्हा व्यसनीं पाडील याचि भी मरणा॥
भीम-भुजांऽशनि-पातें बाहुरणीं दुष्ट मल्ल तो चिरडे ॥
रंगीं बहु-गर्वें जो हांसे फुगवूनि गल्ल तोचि रडे ॥ ३७ ॥
धरिती घडींत शतदा तैं ग्लानि विकास सर्व मल्लास्यें ॥

१ दीर्घकाल परिभ्रमण. २ क्रियारूप उत्तर. ३ भीमभुज हाच अशनि ह्म० वज्र-त्याच्या प्रहारानें. ४ मल्लांचीं मुखें.

जिष्णु ह्मणे न धरावा जन-रंजन-रंग-गर्व मल्लास्यें॥ ३८॥
फिरवुनि शतदा केला पिष्ट क्षितिवरि सलील आपटुनी॥
तें प्राशिलें नियुद्धाऽ- मृत नयन-मुखेंकरूनियां पटुनी ३८॥
रायें प्रसन्न होउनि देतां निज-वस्त्र- रत्न-धन-दानें॥
'हाय' ह्मणे भीम जया पूजावें यत्न करुनि धनदानें॥४०॥
मग भीम करी हर्षें पुरवाया राजदार-काम रण॥
कृष्णा ह्मणे "सख्या हरि देशि न मज तूं उदार का मरण"
दश मास क्रमिति असे प्रभुमम मत जे सदार विश्वास॥
अत्युष्ण दीर्घ सोडी ज्यांसि विलोकुनि सदा रवि श्वास ४२
कीचक-नामा सेना- पाल श्याल प्रसिद्ध राजाचा॥
भंगू पाहे कृष्णा- व्रत, वांछी अभ्युदय धरा ज्याचा॥४३॥
भगिनीस "ह्मणे पूर्वीं आढळली या नहे मला भवनीं॥
वाटे-जन्मदरिद्रा झाला बहु-कोटि-हेम-लाभ वनीं॥ ४४॥
मोहेल इला पाहुनि शक्रहि, मग अन्य का न नर मोहे॥
मजसीं अधःकराया अहि-सुर-नर-कन्यकाऽननें रमो हे ४५
लब्धतदनुमोदन तो जंबुक सिंहीस, कीं सकाम ससा॥
व्याघ्रीस, सतीस बळें, शांतीस वरावयासि तामससा॥४६॥
रावणसा बहु विनवी प्रेम प्रत्यक्षरींहि नव दावी॥
कीचक नीच कलुषनिधि त्याची आर्यांत गोष्ट न वदावी॥
मळवूं पाहे स्वबळें या श्रुतिला, काय नीच कलि हा ता॥

१ माझ्या नृत्यानें. २ राजस्त्रीची इच्छा. ३ खालीं करण्या- करितां. ४ नाग, देव आणि मनुष्य, यांच्या कन्यांचें मुख. ५ सुदेष्णेचें अनुमोदन ज्यास मिळालें तो. ६ पापसमुद्र.

दशमुखे-मुख-मल-जल-निधि-खल-पति-पंक्तींत कीचक लिहावा
कृष्णा ह्मणे "अहाहा बुडती तरि भजति नीच कामातें ॥
सावध हो,गा वधहो न, व्याली जाण कीचका मातें॥४९॥
पर-दारा मी, मत्पति गंधर्व, प्रबल उग्र शिवशील ॥
मागें सरशिल,तरशिल, मरशिल जरि मज बळेंचि शिवशील॥
प्रिय पांचजन्य जीस प्रिय तदितर त्या भुजेसि कंबु कसा ॥
झिडकारिला सतीनें सिंहीनें दुष्टबुद्धि जंबुकसा ॥ ५१ ॥
बंधु भजो, पति न भुलो, ह्मणउनि, नसतां परस्वें सामान्य॥
ती त्या कार्यासि करी, जरि न करावें परं, स्वसा मान्य५२
ती तीस ह्मणे "कीचक- सदना जाऊन आण गे हाला"
धाडी बळें वृकाच्या घालुनि हरिणीस आण गेहाला॥५३॥
कृष्णा ह्मणे "न जाइन- जेंवि मृगी वृकबिळा विटागारा॥
साधु-गृहा धाड, परम- तप्ता तत्पथ-शिळा विटा गारा॥५४॥
उचित शुचि तरिच नृ-वपु व्रतविघ्न ह्मणोनि देवि टाळावें ॥
ह्मणति विट विटाळावें परि वेद ह्मणो न दे विटाळावें"॥५५ ॥
निवबी ऐसें बहु परि तीस सुदेष्णा ह्मणे तरी 'जाच' ॥
फारचि बरी निरयगति परवशता शतगुणें करी जाच ५६
ती आपणा ह्मणे "हे द्रौपदि तुजवरि हरीच विटला गे ॥
चुकलीस तूंचि, नमतां पदरीं अघ, पाटिला नविट लागे५७॥
ज्या श्रीकृष्ण-सखीनें योग्य नमाया सुरासुर सतीतें ॥

१ रावणादि जे पापसमुद्र, अशा दुष्टशिरोमणीच्या पंक्तींत. २ शिवसदृश स्वभावाचे. ३ विष्णुभुजेला. ४ दुसऱ्याचें धन. ५ तथापि. ६ मद्य. ७ जारगृहाला.

प्रेषी आणाया ती राज्ञी मानुनि सुरा सुरस तीतें॥ ५८॥
जातां परार्थंही बहु तापातें पावली सुरामा ती ॥
न करील कां पित्यांची दुर्गतिची माउली सुरा माती॥ ५९
कीचक विलोकुनि ह्मणे त्रिजगद्गुरु-विष्णुच्याहि आलीस॥
"रंभाचिं सुदति तूं या नलकूबर-मंदिरासि आलीस" ६०॥
त्या संकटीं सतीनें दीनाचा बंधु कृष्ण आठविला ॥
त्या सवितृ-मंडलस्थें राक्षस रक्षार्थ गुप्त पाठविला ॥ ६१ ॥
"सर्वस्व अर्पितों तुज देवि, करीं पूर्ण काम, हो दारा ॥
विकत मिळतां स्मित-सुधा- लेशें घेशी न का महोदारा" ६२
इत्यादि नीच कीचक दुष्कर्माची धरूनि आस वदे ॥
कृष्णा वदे "सुदेष्णे- करितां पात्रीं भरूनि आसव दे" ६३॥
तों कर धरुनि खल ह्मणे "दासी आहेत फार अन्या या॥
बैसा शयनीं, राज्ञी करिते करवूनि दास्य अन्याया" ६४॥
कर आसुडितांचि पडे धडधड वात्यासवें जसा विटपी ॥
कैंचें तेज बल तशा दुर्वृत्तीं जो सुरारसा विट पी ॥ ६५ ॥
तंव ते उठोनि धांवुनि पळतां कवळूनि नीच कबरीतें ॥

१ मद्य. २ मद्याच्या दोषाविषयीं कवीची अतिशयोक्ति-द्रौपदी, दुसऱ्या करितां मद्य आणावयास जात असतांही दुःख पावली. मग मद्य पिणाराची माती होणार नाहीं काय? ३ पिणाराची. ४ रंभा-उर्वशी. ५ हा कुबेराचा पुत्र. ६ सूर्यमंडलांत राहणाऱ्या श्रीविष्णूनें. ७ मन्दहास्यरूप अमृतांशानें. ८ महाउदार. अशा मला. ९ सुदेष्णा. १० वावटळी बराबर. ११ वृक्षः

नृपतिसमक्षहि पाडी   लत्ता हाणोनि कीचक वैरीतें॥६६ ॥
तों तो राक्षस पाडी   मागें ढकलूनि कीचकालाही ॥
जाणों गरुडें उडवुनि   आपटिला मत्त नीच कालाही॥६७॥
पाहे विराट-निकट-   स्थित धर्म तदंतिकस्थ भीमहि तें ॥
न सतीस लात बाधे   जेंवि पुनररण्यवास भी महितें॥६८ ॥
आस्तिक-शपथ अहीचें   कीं हरिचें आवरी बल खलीन ॥
धर्म तसें भीमाचें,   तो ह्मणतां भूखलीं खल खलीन ॥६९॥
भीमांऽगुष्ठासि धरी   स्वांगुष्ठें धर्मराज दडपून ॥
नाहीं तरि तेव्हांचि   श्येनतसा मारिताचि झडपून ७०
रोधी युधिष्ठिराज्ञा-   वेला भीमार्णवाचिया वेगा ॥
नाहीं तरि जगदंतक   पूर तया तेधवांचि यावे गा ॥ ७१ ॥
कृष्णा रडत ह्मणे "या   रायावरि धर्म-नीति विटताहे ॥
कैसी उपेक्षितां हो   सभ्यस्त्री-कीर्ति-हानि विटतां हे॥७२॥
प्रेमें रक्षितिल सदा   ह्मणुनि दिलें मी जयांसि मत्तातें ॥
ते गंधर्व उपेक्षिति   मज कां? कां मारिती न मत्तातें॥७३॥
शुचि वपु तें योग्य नव्हे   सेवाया योग्य कीचकमलानें॥
जें राजहंस-सम्मत   तुडवितसे काक नीच कमलातें ॥७४ ॥
ज्या नीति सतीची बुध-   मान्या अत्युच्च पायरी, तीतें ॥
दासीपरि पाहे हा   नुमजेचि विराट-राय रीतीनें"॥७५ ॥

---

१ साध्वीला. २ कालसर्प. ३ त्याच्या समीपभागीं. ४ भूमीला. ५ घोड्याचें. ६ लगाम. ७ भूपृष्ठभागीं. ८ रता. १० कीचकरूपी मळाला.

भूप ह्मणे "मज तुमचें कलि-कारण न समजेचि तर्क-शतें ॥
नुमजुनि मधुरहि वदतां लागे गाळीपरीस कर्कश तें" ७६॥
कंक ह्मणे "मुझे जा त्वां न अनाथासमान वरडावें ॥
गे गांजितां पर स्व-स्त्रीतें न ह्मणेल मानव रडावें ॥ ७७ ॥
गंधर्व त्वत्पति कीं जरि ते सुसमर्थ:देशसमयज्ञ ॥
थोरां न अन्य मान्य श्रितरक्षण-कीर्ति-लेश-सम यज्ञ" ७९॥
तेथुनि राज्ञीपाशीं जाऊनि ह्मणोनि तात अंब रडे ॥
फोडी जैशीं व्याघ्रवि- मुक्त कुलभ्रष्ट धेनु हंबरडे ॥ ७० ॥
कळतां ह्मणे " सुदेष्णा नाहींच विचार कीचकीं अधर्मी
सखि उगि, जरि ह्मणसिल, तरि करिन तवसुखार्थ बंधुचा वधमी।
कृष्णा ह्मणे "वधावा भ्राता त्वां कां?तुझा न अपराधी॥
पति गंधर्व न दुर्बल माझी प्रार्थील किमपि न परा धी' ८१
निजदुःखाहुनि केवळ कनकनगासहि गणी लहान सती ॥
तें द्वारकापुर तसें आणी बहुधा मनीं महानस ती ॥८२॥
जाय निशीथीं साध्वी दावी तिस तत्प्रभाचि वाट तमीं॥
चित्तांत ह्मणे " भीमा दयिता दयिता नसेन वाटत मी॥
पाहून ह्मणे " भीमा आश्रय तुज काय हें महानस हा ४
न यशोहानि महा गा सुज्ञा, सह-काय हेम-हानें सहा ८॥
साश्रु गळां पडुनि ह्मणे " मेलां किंवा तुह्मी अह्मां सासू
होतें ह्मणत व्याली माझीच रिपुक्षयावहां सासू ॥ ८२ ॥

---

१ कळपांतून चुकलेली. २ मध्यरात्रीं. ३ देहसहित. ४ स्वर्ण-हानि. ५ सोसा. ६ शत्रुक्षय कर्त्या पुत्रांना.

मी काय, भली निद्रा- सुखदात्री, काय हा लहान सखा॥
गमलें वपुचि यशोधिक तरि अन्नचि धरुनि हें महानस खा
निजलां काय मृतापरि, व्हा जागे, सिंहसे उठा, राहो॥
निद्रा, कीर्ति वरा हो द्रौप्रद हा बाहु भृगुकुठारा हो"॥८७॥
भीम गडबडोनि उठे अंकींच निवास तीस दे वामीं ॥
चित्तीं ह्मणे " बहुदिसां आतळलों या सतीस देवा मी८८
दयिते कां आलीस? 'प्रमदे हा आर्द्र कां पदर जाये॥
भ्यालीस भीरु, भय कां- भेटे,त्यालाचि कांप,दर ज्या ये
तूं काय भार भामिनि उतरसि मांडीवरूनि कां बस ये॥
झालें काय?वद सुदति सुमुखि मति रडूं नकोचि थांब सये'
देवी ह्मणे "पुसतसां जाणुनिही खेद काय मातें हो ॥
विनवा तुह्मी तरि सुकृत जें बंधच्छेदका यमा तें हो ९१
पुसतां,नसे स्मृति ह्मणुनि, बहु उत्तम, सांगत्यें, बरें परिसा
परि साच निजा नाकीं लोहाची भीड काय जी परिसा॥
कृष्ण-सखी द्रुपद-सुता धर्म-स्त्री सून पांडुराजाची॥
कविगण गणपति गाती कीर्ति सुधासिंधुपांडुरा ज्याची॥
कवि जीस राज-सूया- माजि, व्यापुनि मही नभा,गाती
झाली विराटसदनीं सैरंध्री परम हीन-भागा ती ॥९४॥
जी कुरुसभेंत नेली द्युतजिता किंकरी ह्मणुनि अरिनीं॥
बहु घाबरीच केली जसि देउनि हाक हस्तिनीं हरिनीं
कीचक नीच कर तिचा धरि,परि हरिची मखी न अनुसरली

१ अमृतसमुद्राप्रमाणें शुभ्रवर्ण. २ दुर्दैवी.

कर आसुडितां, पडतां खल,तेथुनि दूर ती सुतनु सरली॥
खल दुर्दशार्थ सोडित होताचि सजुनियां दया लुगड्या ॥
स्मरतांचि भीड पडली जीची दीनाचिया दयालु गड्या॥
पळतां पाठि सतीच्या लागे वेणी धरूनि दे हिसके ॥
स्वकराऽग्रेंहि शिवाया न रवि जिच्या कांतिसंपदेहि सके
लत्ता हाणुनि मूर्च्छित केली सुकुमार मूर्ति भूपातें॥
अजि सोसलें कसें पति- हृदया! तोसो ससभ्य भूपातें ॥
पक्वा बुद्धि करितसे सुयशाची वृद्धि, मृत्तिका काची॥
हरिनीं श्व-वृत्ति वरिली कीं,हंसांनींच वृत्ति काकाची१००
तेज तुह्मां असतें तरि उरता हाणोनि न विट लातेला ॥
अहितायुला न पीतां तेजस्वी दीप न विटला तेला१०१
देवा वांचाया,हे स्त्री,मातीसीच तुडविली,लाजो ॥
तोहि पती उद्धरिना अरिनें व्यसनांत बुडविलेला जो ॥
हे स्त्री नव्हे, प्रतिष्ठा तुमची, जरि ईस सोडितां पाणी॥
धर्मेचाऽर्थेचअसें वदलां कां प्रथम जोडितां पाणी १०३
निस्तेज मीहि, दीपकें- वर्तिहराचि तो खराखु रामेला ॥
श्रीरामाच्या हरितां तत्तेजें खल खराखुरा मेला ॥१०६ ॥
मज मरण, सुसह परि हें दुःसह बहु धातया,न रामेला ॥
रक्षी वरूनि जो जन ह्मणती बहुधा तया नरा मेला"१०५
दावी रडोनि झाले जे गंध उगाळितां स्वहात किणी ॥

---

१ भूमीवर पडण्यानें. २ शत्रूच्या जीविताला. ३दिव्याची वात नेणारा. ४ प्रखर उन्दीर. ५ वट्टे पडलेले.

भीम ह्मणे "विधिलेखनि लेखनि नच वचकलीस घातकिणी"
नेत्रें पुसोनि कवळुनि भीम सतीला ह्मणे " उगी न रडें॥
अज्ञातवास नसता तरि अरिचें तैंचि मुरडितों नरडें१०७
धर्माज्ञेतें भ्यालों मी साध्वि न अंधनंदन-गदेतें ॥
सुख गुरुवचोनुगाचि वपु दे, न सुरसगंधनंदनग देतें१०८॥
एकांत नृत्यशाला- शयनीं भेटे असेंचि कर जाये ॥
येइल तसेंच माझ्या नृहरीच्या यश जसेंचि करजा ये ॥
काळाहि न भीतिस जी स्त्री तूं भ्यालीस काय अल्पा या
कल्पाया सत्य, स्मित कर,ह्मण नृत्यालयस्थतल्पा या११०
कल्पाग्निपुढें कूपीं कृष्णे राहील काय ओल्हावा ॥
गरुड ह्मणतां प्रतिभटा वांचेल कसा ह्मणोनि ओ लावा॥
उत्साहभरें हृदयीं पर्वीं पाथोधिसाचि वाढत मी ॥
पूर्वींच नृत्यशाला-शयनीं जाउनि बसेन गाढतमीं॥ ११२ ॥
मुळमुळ रडों नको सति, सीतेसहि सोडिलें न भोगानें
तेज असोनिहि वरिले कालकृताऽभ्युदयलय नभोगानें ११३
हरि-भक्त-च्छल करितां तत्काल उलेल कां न नीचोर ॥
निश्चय सद्धने हरितां निजमार्ग भुलेल काननीं चोर"११४
करवुनि खलवध-निश्चय तेथुनि गेली सती स्वशयनातें ॥

---

१ गुरुवचन पाळणारें. २ मधुरगन्धयुक्त नन्दनवनांत राहणारें. ३ नखांला. ४ अमावास्या व पूर्णिमा ह्या तिथींमध्यें. ५ सागरासारखा. ६ कालसत्तेनें प्राप्त झालेले उदयास्त. ७सूर्यानें. ८दुष्टाचें हृदय.९साधूचें द्रव्य.

कंठी क्षपा स्मरोनि प्राणसख्या पुंडरीकनयनातें॥ ११५॥
गांठी तिला पुन्हा तो खल, जेंवि पतंग दीप-कलिकेला ॥
प्रार्थुनि ह्मणे "सुमुखि मज भज, तुजसीं म्यां चुकोन कलि केला
सुंदरि विराट राजा नांवाचा जाण, साच मत्स्यप हा॥
शृंगारसतरंगिणि तळमळतो संगमार्थ मत्स्य पहा॥११६॥
जरि हा विराट राजा तरि कांहीं काल कां न वदला गे
वृद्धकलत्र युव्या मज हें तेंवि पहावयासि पद लागे" ११८
त्यासि खरें भासेसें प्रिय-शिक्षित सस्मितं स्वयें वदली ॥
परि कांपली सतीची तनु जैसी मंद-मारुतें कदली ११९॥
खळ पाय धरूं पाहे सुमति ह्मणे " कासया नतिःसरा हो
परि पात्र निजरहस्या भ्राता वा दास या न तिसरा हो"
तें वाटे त्या हाला- पानाद्यतिपातकायना सत्य ॥
मग मनि ह्मणे " पित्याचा पाहतसे हात काय नासत्य"॥
केल्या संकेतानें ती निजरमणासि सूचवी रमणी ॥
चित-दृष्टि ते कलशीं भावी स्वनखांत मूचि वीरमणी१२२
त्या शून्यनृत्यशाला- शयनीं सांजेचि गुप्त भीम निजे ॥
जागति ते स्वाकारें भुजगांच्या नित्य देति भी मनि जे॥
झाली शाला केवळ कृष्णा पोपूनि अंधकारा ती ॥
जाणों तुयशोर्थ तमो- गुण धाडी तेथ अंधकाराती १२४

---

१ रात्र. २ कमलनेत्र श्रीकृष्णाला. ३ तण्टा. ४ ह्मातारी स्त्री. ५ तरुणाला. ६ भीमानें सांगितलेलें. ७ मद्यपान ३० अति पापाच्या स्थानाला. ८ जे भुज. ९ शंकर.

चित्तीं भीम ह्मणे "सुर- वर घे ह्मणऊनि 'हा सुरापमदा'
धिक् धिक् छी छी ह्मणवुनि घेइल लोकांत हा सुराप मदा
आला त्या साध्वीसीं इच्छुनि जो परम नीच कामरण ॥
प्राप्त न होईल कसें त्या मद्यमदांध-कीचका मरण॥१२६॥
पाहे शयनीं निजला . होता जो कांत कीर्तिवरटांचा ॥
बसल्या ज्याच्या दुर्जन-नागफणारूपकीर्तिवर टांचा॥१२७॥
जो चांचपी तयाच्या- मृगपतिच्या जेंवि फेरु आंगातें ॥
करिती करकर जाणो ह्मणति जडवरासि कां भरसि गातें
"आलों तुज भेटाया घेउनि सर्वस्व हें उपायन हो ॥
प्रमदे त्वत्प्राप्तीस्तव बहु केला विफल हा उपाय न हो१२९
असता दीप तरि सुमुखि मानुनि मज मूर्त-मदन रमतीस
लटकी ह्मणुनि हृदया-माजि न देतीस पद नरमतीस।३०।
हळुच ह्मणे " भीम तुह्मी सुमहागुणनदनदीप,काशाला॥
दीप? प्रकाशली कीं पावुनियां वदन-दीपका शाला ॥
तुमचें लोकांत अहो कीचक सामान्य काय हो शील ॥
परि तूं वरटेसि करटे- नीच कसा मान्यकाय होशील१३२
भंगासि उर्वशीच्या स्वप्नीं तरि काय गा दवो लाहे ॥
सैरंध्री वीर-वधू या तुज नरकाय गाढवाला हे॥ १३३ ॥
नारद ह्मणे मिळविलें यश निर्मुनि हेंची रत्न मत्तातें ॥

१ देवांतील अधमा. २ मद्य पिणारा. ३ कीर्तिरूप हंसींचा. ४ कोल्हा. ५ कावळ्यांमध्यें अधम. ६ मान्य आहे शरीर ज्याचें, तो. ७ सान्निद्ध्यास निदेनें दवा ह्मणतात. ८ माझ्यापित्यानें-ब्रह्मदेवानें.

बंदात्रे माथां कीं तुडवावें त्वां धुळींत मत्ता तें ॥ १३४ ॥
धरितोसि जीविताशा तूं-गरलपं मंद नीच काशाला ॥
त्वद्रक्त-कर्दमें ही आतांचि भरेल कीचका शाला ॥१३५॥
भगिनी रडेल तुज अनु- मोदुनि नरकालयासि पाठउनी॥
दुर्मंत्रीं मुख पावे जी हेमंतांत जेंवि पाठ उनीं ॥ १३६ ॥
ऐसें बोलुनियां धृत- खळगलं बलजलाधि तो भला बुकली
पावेल जय कसा प्रभु- सेतुसवें करिल जो अलाबु कली
प्राणा मुकेल इच्छुनि सिंहीचे गजाहि सबहुमान मुके ॥
कां न मुक केल्हा? कां छी ह्मणतिल त्या जनरधमा न मुके
प्रबलाभीं करिल स्त्री- स्तव आमृति कां न नीच मूढ कली
मुकविहि दशमुख निजतनु- सह काल-वृकाननीं चमू ढकली
ब्रह्मयाकरवीं स्मरवी मधुसूदनचरित जें पवनभू तें ॥
कांपवि शेषफणेतें न विराटाच्याचि त्या भवन-भूतें १४०
दावी दुरूनि नरक- ग्रामाची भीम कीचका वेस ॥
कलिमाजि लघुत्वप्रद शक्तीस तमेचि नीचकांवेस॥१४१॥
जें सुयश पाकशाला मिरवी न हतेभकेसरिगुहा तें ॥
हे किति? असो, नियुद्धा-विषयीं याची नये सरि गुहातें १४२
जातां भीम ह्मणे गे अपराध तुझा करूनि पर मेला ॥
वांचेल नीच कीचक कैसा लावूनि पाय परमेला॥१४३॥

१ विषपिणारा. २ धरिला दुष्टाचा कण्ठ ज्यानें तो. ३ श्रीरामाचे सेतूबराबर. ४ भोंपळा. ५ मरण येईपर्यंत. ६ भीम. ७ मारिला गज ज्यानें, अशी सिंहाची गुहा. ८ कार्तिकस्वामीला. ९ श्रेष्ठ अशा तुला. १० नीचाच्या रोषाला.

त्या सीतेला वासावि- वायससा तुजहि कीचक विटाळी॥
त्या याहि दंडितो प्रभु, साहे दोषासि नीच, कवि टाळी
व्यसनीं प्रभु रक्षी, मी काय, विसरलीस काय गे हरितें॥
तत्स्मरणदीप नसतां व्यापिल तम कां न कायगेह रितें॥
ऐसेचि खल विदारुनि देइल बहु लाज भीमकर पविला॥
ज्यांहीं न हाचें चित्तीं तोहि सतीकांत भीम करपविला"॥
गुर्वाज्ञा ह्मणउनि ती जाय सती मृतविटासि लक्षाया॥
मानी दिधला काळ- व्याघ्राला मांसपिंड भक्षाया॥१४७॥
स्मित करुनि ह्मणे "पापा कां रे प्राणादिसर्वहानीच्या॥
बीजा,व्यभिचारित्वा भजलासि धरूनि गर्व हा नीचा"॥
साध्वी तेथूनि निघे चित्तीं पतिभुज मनांत हरिर्मारे॥
राजसभापाळांतें दूरूनि ह्मणे"समस्त परिसा रे॥१४८॥
मत्पति गंधर्व, तिहीं मोडविलें वधुनि कीचका मातें॥
मेले दशाननादिक नरि वश होतात नीच कामातें" १५०
सैरंध्रीनें कथितां कीचकवधवृत्त धांवले लोक॥
तदनुज उपकीचक शत ससुदेष्ण विराट पावले शोक॥५१
तें देखत खांबाला आलिंगुनि दूर राहिली होती॥
कृष्णा मृतबंधूंनीं साश्रूंत निरश्रु पाहिली हो ती॥५२॥
बहुधा काळ ह्मणे तिस" मारिन खळ तव बळें नसें दूर॥

१ जयंतकाकासारखा. २ शरीररूप गृह. ३ हा भीम. ४ शंकर. ५ सिंहासारखे. सारा, हा सादृश्यार्थी शब्द आहे. ६ मृत झाला बंधु ज्यांचा ते. ७ रडणाऱ्या लोकांत.

अरिरक्त पहा दकूमिथ गणपमुखस्थहि असा न सेंदूर" ॥
खल ह्मणति "सस्मित-मुखी ही सैरंध्री पहा उभी, मरण॥
गुरु पावला यदर्थे करुनि पतीसीं जिच्या सुभीम रण ॥
हूं आणा बांधा हो एकाकी वीर हा न सेघु चिता ॥
मेला स्वसंग-कामें तत्सहगति कसि इला नसे उचिता॥५५
भावोजी जेणें या दासीस प्राप्त होय सुरता तें ॥
वाइट काय, ह्मणा हूं, स्वर्गी दोघे करूत सुरतातें" ॥५६॥
चालविली कृष्णसखी बांधुनि जसि ती स्वबंधुची किरडी
चिरडी तत्काळ न त्यां भीम विवेकी भला,न हो चिरडी
नेतां सती ह्मणे "जरि वधितां मज,मारिता न हा कामी॥
गंधर्वराजसुत हो दीनापरि मारित्यें न हाका मी ॥१५८॥
धांवा उडीच घाला, मानी घाली, न नीच कासे रणीं ॥
रक्षा स्वकीर्ति, घालूं पाहति मजसहित कीचका सरणीं"॥
श्रमला, परि भीम उठे, सुचवी,व्याकुळ नहो,असें तिजला
गज गांजितां व्रजस्थां सिंही, राहेल सिंह कां निजला६०
निजवेषासह टाकी प्राकारावरुनि तो उडीला हो ॥
कां जीव ह्मणेल पतन जरिहें लाहेल तरि कुडी लाहो६१

१ गणपतीच्या मुखावरील. २ भयंकर. ३ फक्त इच्याच संभोगाच्या इच्छेनें. ४त्याच्याशीं सहगमन. ५ या दासीला सुरता (देवपणा) प्राप्त होऊन भावोजी (ज्येष्ठबंधुकीचक) प्राप्त होईल. ६ चिरडखोर. ७ कांस. ८ कळपांतील. ९ तटावरून.

घाया त्या दुष्टांच्या  जणु अंतः[1]पूर्वपुरविलापाला ॥
जाउनि पुढेंचि भीमें  तरु उपटुनि त्यासि नुरविला पाला
बा विटलासि सुविरुदा[2]  केंवि? असें केशवास हसतीला[3] ॥
जाळावयासि घेउनि  गेले जों ते शवासह सतीला १६३॥
तों तो गर्जोनि ह्मणे. "  हा आलों सर्व मारितों खळ गे॥
हे केवळ कंटक या  राष्ट्रीं न बरे जसे पथीं खळगे"१६४
बहु खळबळ खळबळ करि पाहुनि कुरुनायका द्रवे, यश तें
अद्भुत, पक्षिपतिपुढें  ठकावें काय काद्रवेयशतें॥ १६५ ॥
त्यजुनि पळाले पंचो-  त्तर शत मनुजाकृती पशु चितेतें ॥
अजि साहतील कैसें  शुचिदु:सह तेज जें अशुचि ते तें१६६
भीमप्रतापतपनें  झाले बहु शुष्क ते जसे पळवे ॥
पळ वेचे तों गांठी,  हरिणाला हरिपुढें कसें पळवे ॥१६७॥
वधिले खल अपराधी  गरुडें अहिसे न लागतां पळ ते ॥
वधिताचि भीम गांठुनि  जरि लंघुनि सप्तसागरां पळते ॥
पुष्पोत्कटाचि दुसरी  गणितील अजानें कीचकविततीतें ॥
जी कृष्णा साध्वी कां  ह्मणतील न जानकीच कवि तीतें
भीम ह्मणे "करिन तुझें सति मर्दुनि रिपुशतांऽयुतें हित मी
बुडवी बळें अकाळीं  सद्द्वेप महाशतायुतेंहि तमीं॥१७०॥

१ अंतःपूर्वपुर ह्म० अंतःपुर. २ उत्तम प्रतिज्ञेला. ३ हसणाऱ्या द्रौपदीला. ४ दुष्टसमूह. ५ भीमाला. ६ पळे. ७ सुकलेले पाल. ८ रावणमाता. ९ अज्ञान. १० कीचकमातेला. ११ शतसहस्त्र शत्रु. १२ देवांचीं शंभरवर्षें आहे आयुष्य ज्याला, त्याला.

छळिले दशाननें परि झाले प्रभुदार[1] काय कौतर[2] ते ॥
भीती द्वंद्वांसि[3] कसे हरिजन भवसिंधु-नायका तरते॥७१॥
जें कर्म सिंधु इतरां, मज हरिदासासि आड[4] वाटे तें ॥
जा तूं आल्याचि पथें जातों मी धरुनि आडवाटेतें" ७२
जोडुनि यश मिरवे जन, परि भगवज्जन कशास मिरवेल
बहु पानवेल मिरवी, तेंवि न मिरवी यशास मिरवेल[5] ७३
ज्या स्तवुनि ह्मणति हरिभुज[6] कविहो आह्मांत पौरवां[7] धाला
त्यासि जसे ते भ्याले स्वप्नींहि तसे न पौर वाघाला॥७४
भाद्रचतुर्थी कृष्णा- देहचि, बहुधा कलाप[10] हा, याला ॥
स्त्री बाळ वृद्ध साधुहि पुरजन बहु धाकला पहायाला॥७५
स्त्रीस विराट ह्मणे " गे सैरंध्रीला निरोप दे, विनवीं ॥
ह्मण तीस त्वदतिक्रम[11]- जन्यें यावीं भयें न देवि नवीं ७६
भुलविल गंधें, रुचिर- स्त्री मूर्तिमती सुरा न राहो ती ॥
दुःसह काम विकार स्त्रीरत्नास्तव सुरा, नरा होती॥७७॥
गंधर्वभयें काळिज धडधड उडतें करें पहा गे हें ॥
त्वद्बंधूंचीं झालीं युगपत्[12] शून्योत्सवें[13] महागेहें"॥ ७८ ॥
येतां मार्गीं पाहे यद्द्वारीं[14] भीम तें महानस ती ॥
स्वविवाह-मंडप गणी मानी वृत्तोपयम[15] महान सती ॥७९॥

---

१ रामस्त्री सीता. २ भयभीत. ३ सुखदुःखादि, परस्पर विरुद्ध मनोभावांना. ४ विहीर. ५ मि-यांचीं वेल. ६ सिंहाचे भुज. ७ भीमाला. ८ गणना करा. ९ गणेशचतुर्थी. १० चंद्र. ११ तुझ्या अमर्यादेपासून उत्पन्न झालेलीं. १२ एकदम. १३ उत्सव-रहित. १४ ज्याच्या द्वारांत. १५ झाला विवाह ज्यांत तें.

स्मित करुनि ह्मणे "त्या त्या गंधर्वाधिपा असो नमन
विसरेल कसें व्यसनीं अभयें सुख पावलें असोन मन"८०
बल्लव ह्मणे " विराजे पाणि श्रितसमवनें न वलयशतें ॥
केलें कलत्ररक्षण पतिनें, तरि काय हो नवल यश तें"८१
ये उत्तरा पहाया सांडुनि गाण्यास नाचण्यासहित ॥
केंवि ह्मणेल रसज्ञा सोडुनि शालीस नाचण्यास हित ८२
रोमांच तिच्या देहीं विजयश्रवणीं उभारती. वाटे ॥
भेट खळ-बळ-विजयी साक्षाद्देवीस भारती वाटे ॥ ८३ ॥
गे सखि सैरंध्रि कसें झालें? कसिगे सुटोनि आलीस" ॥
ऐसें बृहन्नडाही तीस पुसे जेंवि आलि आलीस ॥ ८४ ॥
तीस ह्मणे " सैरंध्री तुज मजसीं काय उत्सवद नातें ॥
स्पर्शेल वृत्त वदतां खळनाम प्राप्तकुत्स वदनातें ॥ ८५ ॥
तुज लाभ काय यांत व्यासंग सजुनि नृत्यगानाचा ॥
जा, सकळा मद्वृत्त- श्रवणानें काय कुश, गा नाचा" ८६
बोले बृहन्नडा "प्राक्- सहवासें दुःख सुख तुझें शिवतें ॥
नेणे जनमन, साक्षी विश्वाचा एक जाणता शिव तें"॥८७
गेली राजगृहीं तों तीस सुदेष्णा ह्मणे "न कोपावें ॥

---

१ शोभे. २ हात. ३ आश्रितांचे रक्षणानें. ४ शंभर कड्यांनीं ५ जिह्वा. ६ दुष्टांचें सैन्य जिंकणारी. ७ प्रत्यक्ष दुर्गेला. ८ सरस्वती. ९ माझ्या वृत्तानें तुला आनंद होण्यासारखें तुझें माझ्याशीं नातें आहे काय? असा सैरंध्रीचा भाव. १० प्राप्त झाली कुत्सा ह्म० निंदा ज्याला तें. ११ पूर्वपरिचयानें. १२ शंकर

सैरंध्री, भूप भितो तूं या नगरीं वसों-नको, पावें" ॥ ८८॥
कृष्णा ह्मणे "त्रयोदश- दिवस वसोंदे असेंचि वद राजा॥
अयश न यावें तुमच्या यावें अस्वल्प[1] सुयश पदरा ज्या
तेथुनि नेतील मला गंधर्व, बहु-प्रसाद करितील ॥
हरितील ताप तुमचे ज्ञाति सपूर्वजांहि[2] कीर्ति वरितील"९०
वदतां असें समंजस मग केंवि ह्मणेल तीस तीं जाच ॥
अपराधलवहि नसतां कां हो सोशील ती सती जाच ॥

# अध्याय २ रा.



## सारांश.

पाण्डव अज्ञातवासांत असतां, त्यांस शोधण्याविषयीं दुर्योधनानें पुष्कळ यत्न केले. पण ते सर्व व्यर्थ गेले. अज्ञातवास संपत आला, आतां काय करावें अशा विचारांत दुर्योधन असतां, त्यास, विराटापासून अत्यंत त्रास पावलेला त्रिगर्तदेशांचा राजा सुशर्मा ह्मणाला, कीं, पांण्डवांचा शोध करण्यांत कांहीं फायदा नाहीं. सांप्रत विराटदेश फार संपन्न आहे. त्या देशांत कोणी महावीर राहिला नाहीं. कीचकाचा विराटास मोठा आधार होता, त्यास गंधर्वांनीं मारिलें. तर आपण त्या देशावर स्वारी करावी. हा सुशर्म्याचा विचार दुर्योधनास पसंत पडला. त्यानें सुशर्म्यास सैन्यासह विराटनगराच्या दक्षिणेस पाठविलें. व आपण स्वतः भीष्मद्रोणकर्णादिकांसह विराटनगराच्या उत्तरेस गेला.

१ वद. २ [illegible] ३ [illegible]

*इकडे सुशर्म्याबरोबर लढण्याकरितां विराटराजा पाण्डवांसह* आला. सुशर्म्यानें विराटाचा पराभव केला व तो त्यास बांधून नेत होता. इतक्यांत धर्माच्या आज्ञेवरून भीमानें सुशर्म्याचा पराभव करून विराटराजास सोडविलें.

गन्धर्वांनीं वधिला सिंहांनीं चपळ नीच कपि साच ॥
होता मद्यप[2] निस्त्रप[3] परयोपित्सक्त[4] कीचक पिसाच ॥ १ ॥
तो आपणचि न केवळ. पावे सानुज[5]हि पातकी नाश ॥
देतो सकुटुंबाही पापरता नरकपात कीनाश[6] ॥ २ ॥
ऐशी वार्ता परिसुनि गेले दुर्योधनाकडे चर[7] ते ॥
जे पांडवशोधार्थ क्षितिवरि सर्वत्र नित्य संचरते ॥ ३ ॥
ते चर कथिती त्या धृत- राष्ट्रसुता पांडवप्रभार्ता[8]र्त्ता ॥
हे मात्र कीचकाची तदरिहृदंबुजरविप्रभा[9] वार्ता ॥ ४ ॥
कीचकनिधन[10] परिसतां तो पांडवशत्रु परमकर्कश[11] तें ॥
कोणाचें कृत्य असें पाहे शोधुनि मनांत तर्कशतें ॥ ५ ॥
मग बोले "सर्वत्र भ्रमले निरलस[12] सुदास[13] हे रानीं ॥
पांडव-शोध कराया चित्त न केलें उदास हेरांनीं[14] ॥ ६ ॥
कर्णा, ते मेले कीं गेले योगें सकार्य[15] बाहेर ॥

१ वानर. २ मद्य पिणारा. ३ निर्लज्ज. ४ परस्त्रियांचा अभिलाष करणारा. ५ बंधूसहित ६ यम. ७ दूत. ८ पाण्डवांच्या प्रतापानें पीडित झालेल्या. ९ तत्-अरि-हृद्-अंबुज इ० त्या दुर्योधनाचे शत्रु पाण्डव, त्यांच्या हृदयकमळास सूर्यप्रभेसारखी संतोषदायक. १० कीचकाचा मृत्यु. ११ फार भयंकर. १२ आलस्यरहित. १३ उत्तम दूत. १४ गुप्त बातमी काढणाऱ्या दूतांनीं. १५ देहसहित.

हे शोधितील असतां, नसतां करितील काय बा हेर॥७॥
बोला हो सभ्य तुह्मी योग्य वदागा प्रतिप्रति ज्ञाते ॥
हरितिल न पद, प्राणहि, नेउनि सिद्धिप्रति प्रतिज्ञा ते॥८
सुचली युक्ति करावी, मग जरि दैवें न होय शोध, न हो॥
अज्ञातवास उरला अत्यल्पचि कीं.अहो यशोधनहो ॥९॥
दूर चढोनि पडावे ते गोमय-गोलकार कीटकसे ॥
अस्खलित उच्च-पदवी- प्रति लंघूं पाहतात नीट कसे"१०
कर्ण ह्मणे " प्रेषावे ते, देवा देवपतिसमा, हेर ॥
ज्यांच्या वाटे प्रभुचें लघुहि गुरुहि कार्य मतिस माहेर ॥
न दिसति ह्मणउनि केवळ काय नसति गुर्जरीस कुच राजा
वेडाचि तो, नदिसले भूमिगतहि पांडुपुत्र कुचरां ज्या"॥
तों दुःसासन बोले "ते भोगुनियां श्रमा न वांचावे ॥
कां न मरावे व्यसनीं ज्यां आधिमहाहि मानवां चावे" ॥
श्रीद्रोण ह्मणे " शिव शिव मरतील महानुभाव कां गा ते
व्यसनीं जरि गडबडते साधु, तरी यांसि सुज्ञ कां गाते॥
रवि नदळेचि,गिळी परि उगळी खळ मलिन मंद राहु टळे
गुर्वापदेंहि साधु न भी, न चळे, जेंवि अचळ वाहुटळे ॥
त्या आधिस्तव होइल आवडि भलसाहि काय हो मरणीं
तैशा धीरां वीरां करणारां स्वपरकायहोम रणीं ॥१६ ॥

---

१ बुद्धिवादाला. २ यश हेंच धन (प्रियवस्तु) ज्यांची, ते. ३ शेणाचे गोळे करणारे. ४ इंद्रसदृशा. ५ अधम दूताला. ६ चिंतारूपमहासर्प. ७ महाधीर प्रकृतीचे. ८ सोडी. ९ मोठ्या विपत्तीनें. १० आपल्या व परक्यांच्या देहाचा होम.

नपडो दृष्टि परांची म्हणुनि तपःसिद्धिनें स्वपदरानें ॥
ते झांकिले न दिसती, पांडव गेले मरोनि न दरानें"१७
भीष्म ह्मणे "या कुरुगुरु- सम हित मित अन्य बोलका नाहीं
हित-कामें माशावे याचेचि, न अन्य बोल कानाहीं१८॥
जरि विश्वगुरुत्व असे. कर्तृत्वास्तव अजा तरि पुराणा ॥
ज्या पुरुषा ध्यातो सा कृष्णासहि मत अजातरिपु राणा
जेथें ते, तेथें कृत- युगधर्म समस्त तोचि वरे देश ॥
ऐसा तन्महिमा कीं त्यां हरिहरही प्रसन्न वरदेश ॥२०॥
धर्मस्थिति तेथें कृत- युगगुण, हे स्पष्ट दाविली खुण गा॥
उमगा बरें चतुर हो तो साधु तपःसमृद्धिचा कुणगो २१
प्रासाद सद्गुणांचे ते पांच, तसीच ती सभा सावी॥
त्यांची भेटि अशुचि जी दृष्टि न झालीच, तीस भासावी
उघडहि निधी अभाग्या, न दिसे मलिना जनाहि अत्रिज गा
तेजस्वी कां मरतिल भीतिल ते कोपल्याहि न त्रिजगा २३
अज्ञातवासपण ह्मण- उनि सुनिपुण गुणसमुद्र ते जन हो ॥
लावाया वेड तुह्मां ह्मणतात प्रकट आत्मतेज नहो"॥२४
कृपहि ह्मणे " कुरुवर्या तन्मार्गण तों अशक्य दक्षमतें ॥
जें पाळवाल यावरि चतुर चरप्रवरलक्ष अक्षम तें ॥२५॥
अज्ञातवास दुष्कर परि तदवधि निपट अल्प उरला गा॥

१ भयानें २ हितेच्छूनें. ३ सृष्टि उत्पन्न करण्यास्तव. ४ ब्रह्मदेवाला. ५अनादि (पुरुष) ६ मान्य. ७ धर्मराजा. ८पाण्डव. ९ श्रेष्ठ १०वर देणारांचेनायक. ११गुप्त मांडवल. १२श्रीदत्तात्रेय. १३ त्या पाण्डवांचा शोध. १४ चतुराच्या मतानें. १५ श्रेष्ठ दूत. १६ असमर्थ. १७ त्याचा अवकाश

त्वच्छस्त्रांस ह्मणेलचि भीमाचें वज्रकल्प उर लागा॥२६॥
गांठी तुह्मांसि त्यांसीं पाडीलचि वाढला विरोध रणीं॥
वाटे ह्मणालचि असृक्- सिंधूंत विरेल तरि विरो धरणी॥
शोध कराल तरि करा सत्वर सिद्धा कराचि परि सेना॥
गुरुसुत्द्दाप्रोक्तातें राया हितकाम कोण परिसेना" २८॥
बोले त्रिगर्तराज प्रस्तुत पांडवदशा विराटा हो॥
प्राप्ताहि त्यजुनि ह्मणे न शिखंडीचा परा विरा टाहो२९।
मेला कीचक घेता पीडुनि बहुधा करा त्रिगर्तांच्या॥
त्याचा आह्मां, तेंविन पांथा बहु धाक रात्रिं गर्तांचा३०
कीचक-रहित विराट स्पष्ट जसा सर्प नीरदर्न दीन॥
अल्प अनल्प बळें तो, तूं संप्रति जेंवि नीरद नदीनं"॥३१
कर्ण ह्मणे "त्या मत्स्या ग्रासूं आह्मी तुह्मी समस्त बक॥
बहु सुखशोभाप्रद न स्वस्तरुचाही यशासम स्तबकं॥३२॥
पांडव मेले गेले त्यांची आतां वृथा कथा राहो॥
निर्दीप निलयं जैसा अंधारा, आधिला न थारा हो"३३
राजा ह्मणे "बहु बरें पात्र तुह्मी या यशा सुशर्मा ह्वा॥
प्रेषी पुढें कराया गोग्रहण खळा-नृपा सुशर्माह्वा॥ ३४ ॥
आपण सकर्ण सानुज जींत गुरु द्रौणि शांतनव कृप तीं ॥

१ वज्रासारखें. २ रक्तसमुद्रांत. ३ विराटाला पाण्डवांची दशा प्राप्त होवो, असा भाव. ४ प्राप्त झालेला सर्प. ५ मोराचा. ६ विरघळून जा. ७ खांचाचा. ८ दंतरहित. ९ मेघ. १० समुद्र ११ कल्पवृक्षाचाही. १२ गुच्छ. १३ गृह. १४ उत्तम सुखाला १५ सुशर्मा या नांवाच्या.

सर्वास्र-शूरपूर्णा सेना घेऊनियां निघे नृपती ॥ ३५ ॥
संपूर्ण पांडवांचा नुगता अज्ञातवास सरला, जों ॥
लागे विराटनगरा तों प्रविकासोन्मुखाब्जसर लाजों ॥३६॥
सेनानी कीचकसा तो ये चित्तास कंक राजाच्या ॥
श्रीरामाच्या तैशा बहु मान्या रीति शंकरा ज्याच्या॥३७॥
इतुक्यांत तो सुशर्मा दंडाहतपन्नगोग्र हानीच ॥
व्हाया स्वकीर्तिची करि पावोनि विराटगोग्रहा नीच॥३८
परिसे त्रिगर्तपतिकृत गोग्रहण विराट गोपवदनांहीं ॥
रदनांहीं अधरातें चावे. रिपुसम असह्य गद नाहीं ॥३९॥
न रणा भ्याला त्याला क्रोधानळतप्तकाय तो कवच ॥
प्रियही जीवित वीरा; धीरा भुलवील काय तोक-वच ४०
देउनि रथादि घेता- झाला कंकादिकांहि चवघांस ॥
वीर स्वशक्ति चतुरां कळविति गंधेंचि जेंवि चव घांस ॥४१
ते गांठिले त्रिगर्त द्युमणिर्विरामींच मत्स्यसेनाहीं ॥
केले भट सुभटांहीं प्रबळांहीं अबळ मत्स्यसे नाहीं ॥ ४२ ॥
उग्र, परि सुखद शिवसा, सुकवींस न वर्ण्य काय संगर तो
कीं जो ह्मणे सकळ जन पावुनि सुरयुवतिकायसंग रतो४३
करिते झाले दारुण-रण ते दोघेहि सिंहसम राजे ॥
पाहति कौतुक तेथें उरले होते करूनि समरा जे ॥४४ ॥
धरिला विराट राजे, वरि नकरी कंधरा त्रिगर्तात ॥

---

१ विकासयुक्त कमळें ज्यांतील, असें सरोवर. २ सेनापति ३ ज्या कंकाच्या. ४ दांड्यानें ताडिलेल्या सर्पाप्रमाणें भयंकर. ५दांतांनी. ६ रोग. ७ बालवचन. ८ सूर्यास्तीं. ९ देवांगनांचा उपभोग. १० मान.

नेणे कर्तव्य जसा पडला अतिअंध रात्रि गर्तांत ॥ ४५ ॥
धर्मा न सोसवे, जें धरि गोरक्षणपरा सुशर्मा तें ॥
कीं साधुहि दुःखातें पावे भंगें, परासु शर्मातें ॥ ४६ ॥
धर्म "ह्मणे भीमा हूं हो व्यसनाब्धींत नाव गा त्यातें ॥
भलत्यातेंहिनुपेक्षी बुध हरिचें जेंवि नाव गात्यातें ४७ ॥
बा अन्नद आश्रयद, व्यसनीं जो, केंवि तो न सेव्य जना
पालक तापहरत्वें मान जडा अन्यथा नसे व्यजना॥ ४८॥
त्यां भीमें द्विज तो त्वां रक्षावा हाहि अंतकाननग ॥
चापचि हो पात्र यशा दुष्टांच्या मूर्त अंतका न नग४९॥
भीम "ह्मणे हो त्याचा लेखा आह्मांसि कायसा राया ॥
सिद्ध समस्तहि आहों युष्मत्कार्यार्थ काय साराया"५०॥
ऐसें वदोनि धांवे, अरिवर गेले न राम-बाण तसे ॥
साधुमनांत गुरुकथित हरिनाम तसेंचि काम बाणतसे ५१॥
क्षुद्र विलंघील कसा त्या पौरवसत्तमा कडा हो तो ॥
हेमाद्रिचा, न हरिसहि लंघ्य, कसा मत्त-माकडा होतो५२
गांठी भीम जसा अहि- पति हरितां सुप्रभा वरमणीला
टपतो सुकीर्तिला बहु- तर तेंवि न सुप्रभाव रमणीला॥ ५३
झाला भग्न सुशर्मा हरिसीं पडतांचि गांठि सिंधुरसा ॥
रस मिसळोनि स्वबलें जिंकीसा कवण लवणसिंधुरसा५४
अरि धरिला असतांही असि शक्ति धनुष्य पूर्णशर भाते

---

१ गाईच्या रक्षणाविषयीं दक्ष, अशा विराटाला. २ मृत. ३ सुखाला. ४ त्या शंकरानें. ५ मार्कंडेय. ६ मृत्युमुखांत जाणारा. उत्तम कांतियुक्त अशा. ७ हत्ती सारखा.

खरतराहि नखर हरिचे करितिल समरांत काय शरभा ते ५५
उग्रा त्रिगर्तपाळ- व्याळा तो वीरवर सुपर्ण कुटी ॥
दे ताप तापसाला करुनि तयाची तनू सुपर्णकुटी ॥ ५६ ॥
भीमें धर्मापासीं ओढित नेला धरूनि शेंडि खळ ॥
झाला सुमृदु विराला उदकीं केवळ विरे जसें डिखळ॥५७॥
सुटला गरुडें धरिल्या श्येनापासूनि काय तो लावा ॥
कीं शरभधृतमृगेश्वर- मुक्तेभासीच राय तोलावा. ॥ ५८ ॥
भासे तो शंभुपुढें स्मर, यूपाजवळ कांपता पशु कीं ॥
धर्मी भूतदयेस्तव उठले जैसेचि कांप ताप शुकीं ॥ ५९ ॥
भीम ह्मणे "उघड दिसे हेंचि खरें काय जी वदा नातें" ॥
धर्म ह्मणे "हा याचक तूं दाता कायजीव-दानातें ॥६०॥
जोंवरि नसे कवळिला तोंवरि मंडूक दापितो भुजगा ॥
जो स्पर्शिला रणीं त्वां न धरी कंडू कदापि तो भुज गा६१
हा वीरश्रीस कर- स्थित अनुचित,भारतीस वायसमा ॥
सोड, वधावा सिंहें केला अपराध ह्मणुनि काय मसा"६२
भीम ह्मणे "मी तुमचा दासअसें स्पष्ट बोल पापी हूं" ॥
धर्म ह्मणे "जाऊंदे शंकें मी या धृतत्रपा पाहूं ॥ ६३ ॥
नमन पुरे रे जारे, ध्याव्या गाव्या, दिसोत गाईशा ॥
शिवमूर्ति किरे यांचें लंघन सोसेल काय गा ईशा"६४॥

१ गरुड. २ शरभानें धरिलेल्या सिंहापासून सुटलेल्या हत्तीशीं. ३ यज्ञस्तम्भाजवळ. ४ देहयुक्त प्राण दानाला. ५ हातांत असलेला. ६ सरस्वतीस. ७ हे पातकी सुशर्म्या. ८ धरिली लज्जा ज्यानें, त्यास. ९ मनांत चिन्ताव्या.

अभय दिल्हें परि काढी नमुनि विराटा निकाम नीच पळ
वोधीं बाहेर निका होय, परि नव्हे निका मनीं चपळ६५॥
यश सोडवूनि वसविति पावुनि विजयोत्सवा रणाजिर तें॥
अभिमान हरिमि ज्यांचा कैसें तद्वस्तु वारणा जिरतें।६६॥
पांडुसुतांतें पूजुनि मत्स्यपति ह्मणे "दिली तुह्मां महि म्या॥
हे काय प्रत्युपकृति? गाइन तुमच्याचि नित्य या महिम्या॥६७
कंका हो राजा, हे बल्लवमुख सचिवराय होऊत ॥
तुमचें यश शुचि, याहुनि दुग्धाचा अधिक काय हो ऊत ६८
हे क्षिति किति? योग्य तुह्मी भोगाया सार्वभौमपद्वीतें ॥
ऐशा सुयशस्तीर्था ज्या तुमचें सत्व-विष्णुपद वीतें" ॥६९॥
कंक ह्मणे "आह्मांला राज्यादिक सर्व पावलें नृपते ॥
ज्यां करद स्खलनीं जे त्यांचीं नमिताति पावलें नृप ते७०॥
स्वाश्रय-भजन स्वभजन, न परार्थ स्वार्थयत्न हा राजा ॥
त्या आपुल्याचि केल्या सत्कृति चिंताख्यरत्नहारा ज्या॥
आधीं निजविजय पुरीं चार प्रेपूनि शीघ्र कळवावा ॥
नरसिंहा क्षिप्र सुहृत्- त्हृदयसरोगाधिनाग पळवावा" ७२

१ यथेच्छ. २ गाईच्या रूपानें गेलेले यश. ३ रणांगण. ४ श्रीकृष्णाला. ५ सुशर्मरूप गजाला. ६ उलट उपकार. ७ बल्लव आदिकरून. ८ उत्तम यश हेंच तीर्थ. ९ सत्वगुणरूप विष्णुपद. १० हे विराटराजा. ११ हात देणारे. १२ पतनांत. १३ आपल्याला आधार ज्याचा त्याचें सेवन. १४ चिन्ता हें नांव ज्याचें तो चिन्तामणि. हींच रत्नें, त्यांचा हार, अशा विराटा. १५ मित्रांचें हृदय हेंच सरोवर, त्यांतील चिन्तारूप हत्ती.

राय ह्मणे "चर हो जा चिंतार्तटिनींत तें न पुर वाहो
मागोनि विजय निजजन- कर्णसुधापानकाम पुरवा हो ७३
नगर अलंकृत करवा अमरीकृतपुष्पवृष्टिला ज्यांची ॥
शोभा विपक्ष ऐमी स्त्रीनिकर करूत वृष्टि लाजांची॥७४ ॥
कथिलें पुरामि धांवत जाउनि तें विजयवृत्त हेरजनीं ॥
पुरजन ह्मणती चिंता सरली परि कामि सरल हे रजनी७५

# अध्याय ३ रा.



## सारांश.

विराटनगराच्या उत्तरे कडे हल्ला करून दुर्योधनानें विराट-राजाच्या साठ हजार गाई हिरावून नेल्या. हें वर्तमान विराट-पुत्र उत्तर यास कळतांच तो बृहन्नडेला सारथि करून कौरव-सैन्यावर चालून गेला. पण तें सैन्य पाहून तो फार भ्याला व पळूं लागला. त्यास अर्जुनानें धरून आणिलें आणि तो त्यास ह्मणाला तुला भय वाटत असेल तर तूं माझें सारथ्य कर. मी युद्ध करितों. त्यानें तें मान्य केल्यावर अर्जुनानें शमीवृ-क्षावर ठेविलेलीं आपलीं शस्त्रें त्याकडून खालीं काढविलीं. व अर्जुन तो मीच असें ह्मणून स्त्री वेष टाकून पुरुष वेष धारण के-

१ चिन्तारूपी नदींत. २ स्वजनांचे कर्णांची अमृतप्राशन करण्याची इच्छा. ३ देवांगनांनीं केलेल्या पुष्पवृष्टीला. ४ शत्रु. ५ स्त्रीसमूह. ६ दूतजनांनीं. हेर शब्द संस्कृत आहे.

ला. आपलीं दहा नांवें व तीं पडण्याचीं कारणें त्यास सांगितली. हातांत गांडीव धनुष्य घेऊन त्याचा टनत्कार केला. तेव्हां हा खास अर्जुन अशी उत्तराची खात्री होऊन त्यानें त्यास नमस्कार केला. मग अर्जुनानें पूर्वेकडे तोंड करून अस्त्रांचें स्मरण केलें. तों तत्काल अस्त्रें प्रकट झालीं.

**मत्स्यपुरोत्तरभागीं[1] प्रातःकाळींच ये सुयोधन हो॥**
**ज्यासि जयप्राप्ति[2] मनीं ह्मणती भीष्मादिही सुयोध न हो**
**सहसा व्रजांत[3] गांठुनि बहु ताडुनि करुनि बद्धभुज[4] गवळी**
**षष्टि-सहस्त्र[5] सुगोधन[6] तो कुरुकुळचंदनद्रुभुजग[7] वळी ॥ २॥**
**गोपाध्यक्ष[8] रथावरि बैसुनि धांवे नृपासि[9] सांगाया ॥**
**चित्तीं ह्मणे "बुडाया कुर्वधमा[10] हरिसि धेनु कां गा या" ४**
**तो राजगृहीं जाउनि रायाच्या उत्तराख्य-तनयातें[11] ॥**
**नमुनि ह्मणे हो "नेतो दुर्योधन धेनु करुनि अनयातें॥ ४॥**
**गोधन षष्टिसहस्त्र व्रज ओस करूनि नेतसे कुटिल ॥**
**कुटिल प्रजाहि "जो गो- पीडक[12] तो ब्राह्मणां न कां कुटिल[13]**
**कवची[14] धन्वी[15] खड्गी[16] व्हा, चित्तीं रामचंद्राहि असा ध्या[17]॥**

१ विराटनगराच्या उत्तरे कडे. २ अर्जुनाची प्राप्ति किं० यशःप्राप्ति. ३ गवळवाड्यांत. ४ बांधिले भुज ज्यांचे ते. ५ साठ हजार. ६ उत्तम गाईचा समूह. ७ कौरवांचा वंश हाच चंदन वृक्ष, त्या वरील सर्प दुर्योधन. ८ गवळ्यांचा नायक. ९ विराट राजाला. १० कौरवांतील नीचा. ११ उत्तर ह्या नांवाच्या मुला ला. १२ गाईला त्रास देणारा. १३ ठोकील. १४ कवच धारण करणारे. १५ धनुर्धर. १६ तरवार धरणारा. १७ स्मरा.

वैसा रथीं जयश्री गोविप्रावनपरांसि न असाध्या"॥ ६ ॥
उत्तर ह्मणे "असें जरि मी एकाकी लहान, परि सवतें ॥
यश जोडितोंचि असता सारथि तरि,कथन मज न परिसवतें
होता परम निपुण परि त्या रणांतरणांत सारथि गळाला
झांको छिद्र भलतसें, अडले ह्मणतात सार थिगळाला ॥८
कर्णादिकांसि देता समरीं वैराटिकेसरी करिता ॥
जिष्णुपुढें असुरजनीं कोण्ही वैरा टिके सरी करिता ॥९ ॥
मिळवा कोण्ही तरि हो धैर्याचा मात्र उदधि सारथि जो ॥
कुरुभटसमूह पाहुनि मज जेंवि हिमांसि सुदंधिसार थिजो"
ऐसे बहुतचि बोले तो बालिश बोल बायकांमाजी ॥
चित्रपटकटकेंस शिशु- आपण येईल काय कामा जी ॥११॥
तें परिसुनि एकांतीं पार्थ "ह्मणे देवि कृष्णसखि जावें ॥
उत्तर-सारथि होऊनि म्यां, त्वां मजवरि कदापि न खिजावें"
कृष्णा ह्मणे "वहुबरें वहा मारुत हो पल्लाले खळबळ तें ॥
मद्धृदय न अभिमन्ये, तुमच्या दैन्येंचि फार खळवळतें"१३॥
त्या उत्तरासि सांगे "सारथ्य बृहन्नडा करिल, यानें ॥
सूत करुनि विजयानें नेलें बहु खांडवीं अरि लयानें ॥१४
सारथ्य-गीत-नृत्य- प्राप्तीचा हेतु जिष्णुसहवास ॥

१ गोब्राह्मणप्रतिपालकाला. २ एकटा. ३ वेगळें. ४ एकवलें असतें. ५ त्रिगर्तांशीं झालेल्या प्रसिद्ध युद्धांत. ६ श्रेष्ठ. ७ विराटपुत्र हाच सिंह. ८ गजत्व. ९ इन्द्रापुढें. १० तूप-लोणी. ११ चित्रपटावर काढिलेल्या सैन्यासारखें. १२ अर्जुन. १३ हे द्रौपदी. १४ भूस. १५ अर्जुनानें. १६ अर्जुनाचा संगति.

पूर्णत्वाचा लागे 'पशुपां भ्रमतांहि विष्णुसह वास ॥ १५॥
भगिनीमुखेंचि विनवा, तन्मतिला उत्तराचि वळवील ॥
अतिसहवासिंवच मना कतकं कलुपितां वनां निवळवील"
उत्तर ह्मणे "कुरुकटक न पशूंस, यशासहि, स्वसे नेतें ॥
अवकाश पळहि नाहीं कळवाया वृत्त हें स्वसेनेतें ॥ १७ ॥
माझें सारथ्य करो तुझिया वचनें बृहन्नडा गमला ॥
हाचि सदुपाय, वत्से लागो अपकीर्तिचा न डाग मला"१८
ती धांवत जाय ह्मणे " गानादिक हें बृहन्नडे राहो ॥
समयीं सारथ्य-गुणा नुधडूनि कदर्युचा न डेरा हो ॥ १९॥
गोधन षष्टिसहस्र स्वपुरा नेतो हरूनि कौरव हो ॥
गौरव हो न बुधजनीं त्या मेल्याला अनंत रौरव हो॥२०
त्यावरि जातो उत्तर त्याचें सारथ्य ये करायास ॥
सुखद इहामुत्रंहि गो- विप्रत्राणोत्थ जे करायासें ॥ २१॥
देता झाला पूर्वी तुज निजसारथ्य सव्यसाची हो ॥
मरंभ्रीची वाणी व्हावा गोवत्सभव्य साची हो ॥ २२ ॥
उठल्या उत्साहाच्या त्या शांतश्रीमदुदधिवरि लहरी ॥
धरितां हनु न नु ह्मणतां प्रणताचें कां न सुदधि वरिल हरी

१ गोपाळांना. २ कृष्णासह. ३ अतिपरिचयांतील मनुष्याचें भाषण. ४ निवळीची बी. ५ गढूळ झालेल्या. ६ उदकाला. ७ हे भगिनी उत्तरे. ८ कृपणाचा. ९ रौरव नरक. १० ह्या लोकीं व परलोकीं. ११ गोब्राह्मणांच्या परिपालनानें उत्पन्न झालेलें. १२ हातांचे श्रम. १३ अर्जुन. १४ गोवत्सांचें कल्याण. १५ शान्त अशा अर्जुनरूप समुद्रावर. १६ हनु धरितां, हरी, नु न ह्मणतां, प्रणताचें सुदधि कां न वरिल, असा अन्वय. १७ नाहीं.

देवातें भक्ति तमी पार्थातें ने करूनियां वश हो ॥ २४ ॥
त्याच्याहि मनीं होतें कीं विश्वामाजि आपुलें यश हो ॥
उत्तर ह्मणे "बहु बरें देउनि वचनास मान आलीस" ॥
बोले बृहन्नडा स्मित- पूर्वक "विटवाल कोण आलीस ॥
वाद्य असो नृत्य असो हो अभिनय किमपि गान अथवा हो
जाणोनि कसें ह्मणतां समरांत बृहन्नडाचि रथ वाहो॥२६॥
वैराटि ह्मणे "नर्तक हो. कीं वादक तथैव गायन हो॥
सारथि हो या समयीं एकहि वश कौरवांसि गाय नहो"
ऐसें वदे कवच दे त्या श्रितकुशलावहास ल्यायाला ॥
तद्धारणीं चुके तो कन्या पाहोनि हांसल्या याला ॥२८॥
ज्याचें किरातरूपि- प्रभुधिक्कृतिगर्भ गायें नाके वच ॥
हांसे आपणहि, ह्मणे "ठावें मज काय गायना कवच"२९
लेवविलें राजसुतें जाणों त्याला कधीं न तो कवच ॥
सच्चरित अप्रगल्भहि हृदयहर जसें स्वधीन तोकवचं॥३०
होउनि सिद्ध रथावरि चढतांचि सहोत्तरा तिच्या आली
ह्मणती "बृहन्नडे तुज वीरश्री गौरवावया आली ॥ ३१ ॥
दिव्य-रुचिर-वस्त्रांतें आण करायासि बाहुल्या, कटकें ॥
जिंकुनि अरिचींहि तुह्मी बहु शोभाया स्वबाहु ल्यां कटकें"

१ हाव भाव. २ एखादें. ३ विराटपुत्र उत्तर. ४ नाचणारी. ५ वाजविणारी. ६ तसेंच. ७ गाणारी. ८ आश्रितांस सुखदायक अशा अर्जुनाला. ९ तें कवच धारण करण्यांत. १० किरातरूपी प्रभु शंकर, त्याचा धिक्कार ज्यांत, तें (वच.) ११ गातो. १२ स्वर्ग. १३ अप्रौढही. १४ अतिस्वाधीन. १५ बालभाषण. १६ उत्तरासह अर्जुनाला. १७ सैन्यें. १८ धारणकरा.

"उत्तर आणिल तें जें निर्माया तुज सुबाहुल्या लागे ॥
मज कवच लेववुनि हा अपणचि पहा सुबाहु ल्याला गे"
ऐसें बोलुनि हांकी उत्तररथरत्न कृष्णसाराथि तें
सांगे स्वदास्य सिंहा हरवावया तेज कृष्णसार थितें॥३४॥
ह्मणती स्त्रिया प्रयाणीं "तुजला मंगल बृहन्नडे हो तें ॥
जें खांडववनदाहीं नरसारथ्यांत जाहलें होतें"॥ ३८ ॥
द्विज ह्मणति "या यसस्वी होउनि जयदायि आज्यैजिरतें हो।
खलबल सदाश्रितजनीं, दहनीं पुष्कळहि आज्य, जिरतें हो
सत्वर बृहन्नडा नृप- सुतरथ नेऊनि जाय बाहेर ॥
त्यासि ह्मणे " हेरावें ह्मणसी कुरुकटक काय बा हेर"
आपण चित्तांत ह्मणे " मेळवितों आजि नीच हो यश मी
शिवमूर्तिसी स्मशानीं अस्मज्जयहेतु तींच होय शमी" ॥
कुरुकटकासि पहातां तो उत्तर बाळ फार गडबडला ॥
स्वपरबळाबळ नेणुनि वालिश बहु बायकांत बडबडला
बोले "बृहन्नडे हें कुरुबळ कल्पांतसिंधुसें गमतें ॥
ने रथ पुरांत, माझें मन नयनाहि पाहतां बहु भ्रमतें॥४०॥
दुर्योधन दुःशासन कर्ण कृप द्रोण भीष्म ज्या कटकीं ॥
त्यांत मरेनचि शिरतां कांटयांवरि घालितां चिरे पॅट कीं
एकाकी मी, रिपु बहु, ह्या ऐशा कीर्ति काय हो मरणीं
पेश्वर्यें केंवि करूं सर्वपुमर्थदसुकायहोम रणीं ॥ ४२ ॥

१ श्रीकृष्ण सारथि ज्याचा तो अर्जुन. २ काळवीट. ३ असलेलें. ४ रणांगण. ५ आपली व दुसऱ्याची सबळदुर्बळता. ६ प्रलयकालच्या समुद्रासारखें. ७ वस्त्र. ८ गाईकरितां. ९ सर्व पुरुषार्थदायक उत्तम शरीर.

आज्ञा नसतां आलों रागें न भरेल काय हो तात ॥
रोमांच घर्म कंप प्रकट व्यापूनि कार्य होतात"॥ ४३ ॥
पार्थ ह्मणे " राजसुता आतां वदतोसि हें अहा काय ॥
शय्येवरि न पडाया योग्य, रणक्षितिवरीच,हा काय४४॥
तेव्हां स्त्रियांत तैसें 'बोलुनि आतां असें कसें वदसी ॥
एकहि बाण न सुटला नाहीं अद्यापि झळकला सदसी ॥
गोमुक्त्यर्थ न शिरतां धैर्यें या वीरनायकानीकीं ॥
करिजेल हास्य आस्यें प्रेक्षुनि नगरांत बायकानीं कीं४६
देउनि सारथ्य मला घेउनि आलासि काय उत्साहें ॥
नेणसि काय पलायन करितां लोकांत होय कुत्सा हें ४७
निजवृत्तिरसीं लोभी हो, साधो बुद्धि अन्यथा न करीं ॥
निजहितलोभें धरितो शिशुहि मुखीं एक अन्य थान करीं
सैरंध्रीनें कथिलें माझें सारथ्यनिपुणपण साचें ॥
टाकिति न बाह्यरंगें फळ नीरस ह्मणुनि निपुण पणसाचें
मी भांडेन स्थिर हो तुजहि मजाहि विहित आजि न परतणें
हरितील न गाईतें, भीतिल, करितील आजि न परतणें
मरतीच, न दाखविती पाउलहि पळोनि तोंड लेंक बित्या

१ देह. २ रणभूमीवरच. ३ उत्तम खड्ग. ४ गाईंची मुक्तता करण्याकरितां. ५ वीरश्रेष्ठांच्या समूहांत. ६ मुख. ७ निन्दा. ८ आपलाधर्म. ह्म० क्षात्रधर्म हाच रस, त्यांत. ९ फणसाचें. १० युद्ध. ११ शत्रुरूप तृणें. १२ बापाला.

ह्मणती " सद्यःकीर्ति- प्रज्ञाघ्न[1]स्पर्श तोंडलें कवि सा॥५१॥
कज्जल कसें करूं जें सैरंध्रीकृत दुधासम स्तवन ॥
सन्मन अनृतां[2] भीतें जेंवि कुठारायुधां[3] समस्त वन ॥५२॥
तीं या मुखीं न येतां यावी सुयशें करूनि सुखमां[4] जी ॥
दावाया सैरंध्री- प्रति हें प्रति वरिल केंवि मुख माजी ॥
चाल उगाचि अपयशें न तुझें मुखचंद्रमंडळ मळावें ॥
होतों बलाब्धिपारद[5] पारदतुल्य[6] न तुवां डळमळावें॥५४॥
ऐसें पार्थ वदे तों भिउनि कटक[7]-वागुलासि पोर पळे ॥
शत्रुप्रतापदाव-[8] ज्वालांनीं तो कुरंग[9] होरपळे ॥ ५५ ॥
पार्थ ह्मणे "प्रभुपाशीं[10] वर हा घे, हेंचि याचितों डमरो[11] ॥
बोलेल बहु निरर्थक तो स्वजनीं दावितांचि तोंड मरो ॥
त्यासहि ह्मणे"अरे रथ- गिरिशिखरच्युत[12] महोपळ[13] उभारे[14] ॥
आली तुला वराया कीर्ति, पराङ्मुख न हो, पळ उभा रे
हरिनीळहार[16] कृष्ण- व्याल[17] नव्हे, स्वभ्रमें पळविलास ॥
वरितां अकीर्ति न रुचे रंभेसीं हरिसही[18] पळ विलास"५८

---

१ तत्काळ, कीर्तिरूप बुद्धीचा नाश करणारा स्पर्श ज्याचा, तें. २ असत्याला. ३ कुऱ्हाड हातीं ज्याच्या, त्यास. ४ शोभा. ५ सैन्यसमुद्राचें परतीर दाखविणारा. ६ पाऱ्यासारखें. ७ सैन्यरूपी बागुलास. ८शत्रूचा पराक्रम हाच वणवा, त्याच्या ज्वालांनीं. ९ हरिण. १० शंकरापाशीं. ११ हे डमरुनांवाच्या वाद्या. १२ रथरूपी पर्वताच्या शिखरावरून पतन पावलेल्या. १३ मोठ्या दगडा. १४ चढे. १५ पाठमोरा. १६ इन्द्रनीळरत्नांचा हार. १७ कालसर्प. १८ इन्द्रालाही.

तो किमपि न दे उत्तर   उत्तर उत्तर दिशेसि सोडूनी ॥
जाय पळत, दक्षिणदि-   ग्गत नगरीप्रति अकीर्ति, जोडूनी
जाय पुरीप्रति जोडी   अपकीर्ति, सुकीर्ति हातिची दवडी॥
मातेप्रति पोर जसें   मुद्रा हरवूनि मेळवी कवडी ॥ ६० ॥
धांवे पार्थ धराया   कीं त्यासहि अपयशीं न मज्जन हो ॥
उपदेशी भगवान् कीं “ अस्ति मज्जनरीति ही नमज्जनहो’
सकळां[4] सकळा विद्या   श्रुतमात्रा ज्यासि राहिली पाठ ॥
अरिनीं कुसंगतीस्तव   त्या तैशाचीहि पाहिली पाठ[7]॥६२॥
वाटे पुढें पळे तो   स्त्रीसंगविरक्त[8]धी कुमारमणी ॥
पुत्रस्नेहें धांवे   यामागें शंभुची उमा रमणी ॥ ६३ ॥
किति हांसले विलोकुनि, झाले किति चकित बद्धनयं शस्त्री
कीं वांछील भगवंती[11]- हुनि अन्या करुनि युद्ध न यश स्त्री
कौरव ह्मणति “नव्हे स्त्री,   व्यक्त स्त्रीवेष पुरुष तर्कशतें॥
मृदुलप्रकृति स्त्रीवपु   एवंविध[12] धावनीं न कर्कश तें ॥६५॥
सारूप्य अर्जुनाचें   बाहु परिघसे[13] तसेंचि कीं शिर तें ॥
पय रुचिकं[14]-सम, परि रसिकमन-काय पयीं तसें चिकीं थिरतें
हा क्लीबसमहि देषें   क्लीबीं ऐसें परंतु तेज नसे ॥

---

१ दक्षिणदिशेला. २ माझ्या भक्तांची रीती. ३ नमन करणारे जन हो. ४ चौसष्ट कलांसहित. ५ जुसती. ६ ऐकण्यानेंच. ७ उत्तराच्या पाठीस लागला असतां, शत्रूंनीं अर्जुनाची पाठ पाहिली. ८ स्त्रीसंगतीचा ज्यास कण्टाळा आहे तो. ९ कार्तिकस्वामी. १० नीतिज्ञ. ११ श्रीदुर्गेहून निराळी. १२ या प्रकारचें. १३ दाराच्या अर्गलेसारखे. १४ रुईच्या चिकासारखें.

वाटति देखावेसे काय पुरुषवेष षंढ ते जनसे ॥ ६७ ॥
काल त्रिगर्तपतिनें[1] गोग्रहं[2] केला ह्मणोनि पृतनेला[3] ॥
घेउनि विराट गेला बहुधा तो पितृवनीं न मृत नेला ६८
तत्सुत उत्तर होता नगरीं, तो परिसतांचि गोहरणा ॥
पार्थासि करुनि सारथि आला जो. बाळ सुलभ मोहरणा
हरिण जसा सिंहीला सेनेला पाहतांचि तो भ्याला ॥
सुयशाहुनि जीवित बहु बाळाला, जेंवि वित्त लोभ्याला ॥
कातर रथी पळाला तो अयशस्सागरीं तरायाला ॥
मानी अर्जुन सारथि त्यामागें धांवला धरायाला ॥७१॥
वदति असें कुरु जों तों पदशत धांवोनि कुंतळीं[7] धरिला
जाणों अपकीर्तिनदी- पतित शिशु बळेंकरूनि उद्धारिला ॥
स्वमनीं पार्थ ह्मणे " रे जरि विहित रडेंचि मानितोस रड
मी प्रभु हें अज्ञ पदीं कीं कूपीं बसुनि मानितो सरड ७३
उत्तर ह्मणे " नको गे, पायां पडतों बृहन्नडे सोड ॥
जोडें दिली, दुखवुं नको केवळ पितृकरतळस्थ[10] हा फोड
जों जों वैराटि रडे तों तों तो पार्थ सदय, परि साचा ॥
खळसा हांसे, लोहा निंद्य नव्हे ग्रावभाव[11] परिसाचा॥७५॥
दाटूनि हित कराया तत्केशांतें धरूनि आकर्षी ॥
बसवी रथीं बळें हरि- भजनीं मंदासि जेंवि नाकर्षी॥७६॥

---

१ सुशर्म्यानें. २ गोहरण. ३ सैन्याला. ४ श्मशानामध्यें. ५ फेरफार होण्यास. ६ म्याड. ७ केशांच्या ठायीं. ८ अपकीर्तीच्या नदींत पडलेला. ९ संपत्ति. १० पितरांच्या तळाथावरील. ११ दगडपणा.

कुरवाळूनि ह्मणे " गा राजसुता योग्य तूं न कांपाला ॥
मृदुलत्व म्लानत्व स्वीकारुनि जाहलासि कां पाला? ॥ ७७
तुज उत्साह नसे तरि करितों घेउनि धनूस मी रण हो ॥
मज मेघासि कराया शरवृष्टि सहाय तूं समीरण हो ॥ ७८ ॥
घे रश्मि करीं सारथि होउनि चालीव आजि हे वाजी ॥
मी मथितों कुरुपृतना करिते क्षुब्धाब्धिसीहि हेवा जी" ॥
जाय शमीप्रति किंचित्- स्वस्थासि रथीं बळेंचि वाहूनी ॥
आलिंगाया समर- प्रियसख गांडीव-चाप वाहूनी ॥ ८० ॥
द्रोण ह्मणे " कौरव हो काय पहातां रथाकडेचि रहा ॥
अद्भुत अश्वाश्रुध्वज- कंपाद्युत्पातही पहा चिर हा ॥ ८१
परिसा बरें शिवांचें रुदित अशुभसें असुस्वर क्षण हो ॥
व्यूह रचा हो रक्षा गोधन हें यश असुस्वरक्षण हो ॥ ८२ ॥
न बुडे बळें बुडवितां उसळेचि जळीं जसा आलाबु, बुळा
दिसतो तसाचि जपतो स्वयशा न, जपे तसा भला बुबुळा
राया भीष्मा सकृदपि या नयनीं पाहवेल न क्लीबा ॥
बहुरूप अर्द्धनारी- श्वरसा तद्भक्त हाहि नक्की बा ॥ ८४ ॥
आइकतों कीं हा कृश केवळ होता तपें, परि भवातें ॥

१ बाणवृष्टि, पक्षी जलवृष्टि. २ वायु. ३ घोड्यांच्या दोऱ्या. ४ घोडे. ५ कौरवसेना. ६ खवळलेल्या समुद्राशीं. ७ थोडासा स्थिर झालेल्या उत्तराला. ८ घोड्यांच्या डोळ्यांतून अश्रु निघणें, ध्वज कंपित होणें इ० उत्पात. ९ भालूचें. १० कर्णकठोर. ११ प्राणधनाचें रक्षण. १२ भोंपळा. १३ एकवारही. १४ नपुंसकाला. १५ शंकरासारखा. १६ नकल करणारा. १७ शंकराला.

झाला बहुमत समरीं, करिल परांच्या न कां परिभवातें ॥
अस्मत्परिभव[1] करितो आजि नभातें शरव्रजें[2] भरितो ॥
गोधन हरितो, वरितो कीर्ति, अशनिभृदरिकरिघटा-हरि[3] तो
कर्ण ह्मणे " कुरुगुरुजी स्तवितां मज यूथपतिपुढें[4] कलभा[5]
ह्मणतां शकलीं[6] बहु रवि- कांतगिरिपरिस[7] रवीपरिस बल भा
भूप ह्मणे " कर्णा हा जरि अर्जुन, दैव पावला नवसा ॥
जाइल पुन्हा वनाला बंधुसह अरण्यवासि मानवसा॥८८॥
अथवा असेल दिसतो तैसा तरि परिभवें बुळा लाजो ॥
मर्कट नुरेचि, झोंबे हनुमत्पाणिस्थिता[8] गुळाला जो"॥८९॥
जाउनि शमीनिकट तो विजय ह्मणे " स्वस्थ तूं कुमारा हो
पाहुनि मत्कृत-खळबळें- मथन[9] चकित भगवती उमा राहो
मद्भुजबलानिलें[10] हें ध्वस्त[11] अहितकटक[12] अभ्र सारें हो ॥
परि हीं तुझीं धनुष्यें क्षणहि न टिकतील दभ्रसारें[13] हो ॥
आहेत पांडवांचीं दिव्यास्त्रें या शमिद्रुमीं, उतरीं ॥
पाहुनि पळोत सा हरि- नखरांतें[14] सर्व खळबळेंकुतरीं" ९२

---

१ आमचा पराभव. २ बाणसमूहानें. ३ अशनिभृत्-इंद्र, त्याचे शत्रु दैत्य, हेच हत्तीचे समुदाय, त्यांचा सिंह अर्जुन. ४ गजापुढें. ५ हत्तीच्या छाव्याला. ६ तुकड्यांत. ७ सूर्यकान्तमणीच्या पर्वतापेक्षां व सूर्यापेक्षां तुकड्यामध्यें बल व कान्ति बहु असें ह्मणतां. ८ मारुतीच्या हातांतील. ९ मी केलेलें दुष्टसैन्याचें मर्दन. १० माझें बाहुबल हाच वायु, त्यानें. ११ नष्ट. १२ शत्रुसैन्य. १३ अल्पबळाचीं. १४ सिंहाच्या नखांला.

उत्तर ह्मणे " शमीवरि शवें आहे ऐकिलें, न शिवत्वेची ॥
सांगसि असें कसें गे कुणपाचा स्पर्श सर्व शिव वेची" ॥
पार्थ ह्मणे " कैंचें शव? ठकवुन बुडवीन काय हो यश मी
त्या शस्त्रांला असतां शव आश्रय, योग्य काय होय शमी
वृक्षीं वेष्टन सोडुनि नमुनि ह्मणे " रक्ष आयुधग्रामा ॥
आलों शरण तुला मी लोक जसा रक्षआयुधग्रामा॥९८॥
जाणों सच्छस्त्रें हीं, स्वाश्रय-पांडवजयार्थ सुतपातें ॥
करितीं, व्हाया सद्यश लोकत्रितयांत अधसुतपातें' ॥९६॥
वैराटि चापखड्गा- द्यायुधचिह्नें समस्त वाखाणी ॥
भवभीतिस कवि ज्याच्या करुनि हरिस्तवसमं स्तवा खाणी
वर्णुनि शस्त्रांसि पुसे " कवणांचीं कवण यांत सांग मला
त्या पांडवांसि यांचा व्यसनांत त्याग योग्य कां गमला'
पार्थ ह्मणे " वैराटे, ज्यावरि शतकनककबिंदु पाहसि तें ॥
गांडीव, यशें जोडी जेणें विधुहूनि शुभ्रवाह सितें ॥९९॥
ब्रह्मा धरिता झाला गांडीवातें सहस्र-मित वर्षें ॥

---

१ प्रेत. २ प्रेताचा. ३ पुण्य.४रक्षण कर. ५ हे शस्त्रसमूहा- ६ रक्ष-आयु-धक्-रामा ह्म० राक्षसांचें आयुष्य जाळणाऱ्या रामाला. ७ आपणास आश्रय देणाऱ्या पाण्डवांचा जय होण्याक- रितां. ८ उत्तम तपाला. ९ तीन लोकांत. १० दुर्योधनाच्या पतनानें. ११ चाप खड्ग इ० आयुधांची चिह्नें. १२ संसारभयाला. १३ हरिस्तवसम ज्याच्या स्तवा करूनि कवि भवभीतिसी खाणी, हा अन्वय. १४ शंभर सोन्याचे ठिपके. १५ चंद्राहून. १६ अर्जुन. १७ सहस्रसंख्यापरिमित.

धरिलें प्रजापतीनें[1] त्र्युत्तरपंचाशदब्द[2] बहु हर्षें ॥ १०० ॥
मग पंचाशीति[3] समा[4] शक्रें[5], सोमेंहि[6] पंचशत[7] अब्द[8] ॥
वरुणें शत संवत्सर, याणें लागूं दिला न दुःशब्द ॥१०१॥
आहे पार्थापासीं सार्द्ध-द्वात्रिंशदब्द[9] हें चाप ॥
राहे चरमापत्यां-[10] जवळी प्रेमार्द्रधी[11] जसा बाप ॥ १०२ ॥
जें इंद्रगोपचित्रित[12] तें धर्माचें धनुष्य जाणावें ॥
ज्यावरि कांचनवारण[13] तें भीमाचें मनांत आणावें ॥१०३॥
धरिजे तें त्र्यर्कांकित[14] कार्मुक नकुळें समस्तयोधनुतें[15] ॥
सौवर्ण[16] शलभ[17] ज्यावरि सहदेवाचेंचि होय हो धनु तें१०४॥
मागें असेंचि वर्णुनि गुणं[18] तूणं[19] कृपाणं[20] बाण जाणाया ॥
तें गांडीवाद्यायुध[21] उतरुनियां आपुलेंचि आणाया १०५
"कोठें बृहन्नडे ते ज्यांचे गुण हर्ष नित्य नव देती ॥
कोठें देवी ? जी व्हा भस्म, असें त्यां खळांसि न वदे ती

---

१ दक्षप्रजापतीनें. २ त्रेपन्न वर्षें. ३ पंचांयशी. ४ वर्षें. ५ इंद्रानें. ६ सोमराजानें. ७ पांचशें. ८ वर्षें. ९ साडेबत्तीस वर्षें. १० शेवटच्या मुलाजवळ. ११ प्रेमानें ओलें अंतःकरण ज्याचें तो. १२ इंद्रगोपनांवाचे तांबडे लहान किडे असतात, त्यां सारख्या बिंदूंनीं चित्रविचित्र केलेलें. १३ स्वर्णाचा हत्ती. १४ तीन सूर्यांनीं चिह्नित केलेलें. १५ सर्व वीरांनीं स्तविलेल्या. १६ सुवर्णाचे. १७ टोळ. १८ धनुष्याची दोरी. १९ भाता. २० खड्ग. २१ गांडीव इ० शस्त्र.

पार्थ ह्मणे " वैराटे जो अर्जुन तोचि मी, असें जाण ॥
जो कंक तोचि राजा धर्म, नव्हे अनृतं[1] हें, तुझी आण॥
वल्लव भीम, ग्रंथिक तोचि नकुळ, तंतिपाळ सहदेव ॥
सैरंध्री ती, जीचा कैवारी वृष्णिभूतमह[2] देव" ॥ १०८ ॥
वैराटि ह्मणे " ज्यांतें. जाणति,जपतीहि, पूज्यपाद[3] शर्मी[4]॥
सांग बरें जाणतसें नामें त्या शक्रसूनुचीं[5] दश मी"॥१०९
मांगे "अर्जुन फाल्गुन ·जिष्णु किरीटी"असीं दहा नावें ॥
त्यांची निरुक्तिहि करी कीं तेणें सर्व सत्य[6] मानावें ११०
दशनामनिरुक्तीप्रति परिसुनि पार्थासि तो करी नमन ॥
प्रार्थूनि ह्मणे " समरीं सारथि होउनि सुखी करीन मन
घेऊनि आयुधांतें उत्तर उतरे, परंतु संदेह ॥
उठला, जेंवि रविपुढें उठती उदयींच दैत्य मंदेह[7]॥११२॥
सत्यचि अर्जुन जरि तूं कां क्लीव, क्लीववेप कां धरिला?॥
पार्थ ह्मणे " गुर्वाज्ञा ह्मणुनि, व्रत वर्ष एक आदरिला ॥
बैस रथीं तूं माझा सारथि हो तरणिचा[8] जसा अरुण ॥
न्यावा चमूवरि[9] तुंवा रथ तरुणीप्रति जसा स्मरें[10] तरुण ११४
आतां सोडवितों पशु[11] खळबळ पळ नलगतांचि पळवीतां॥
मी विजय,असें तुजचि न,सकळांही कौरवांसि कळवीतों"१५
धृतरश्मि[12] कुमार ह्मणे "दारुक कीं आजि मातली लाजो॥

१ असत्य. २ यादवांचा मूर्तिमान उत्सव असा भगवान श्रीकृष्ण. ३ पूजेला योग्य पाय ज्यांचे ते. ४ जितेंद्रिय मुनि. ५ इंद्रपुत्र अर्जुन, याचीं. ६ यथार्थता. ७ मंदेह ह्या नांवाचे. ८ सूर्याचा. ९ सैन्यावर. १० मदनानें. ११ गाई. १२ धरिल्या घोड्यांच्या दोऱ्या ज्यानें तो.

दंड करावा या कुरु- सेनेला योग्य मातलीला जो॥११६॥
काढूनि शंखवलयें[1] त्याला पुंभूषणें[2] सितें[3] वस्त्रें॥
बांधूनि केश माथां प्राङ्मुख[4] होऊनि आठवी अस्त्रें॥११७॥
तों तीं तद्दृष्टिपुढें गोचर होवूनि करुनिया प्रणती॥
"आम्हां स्व-किंकरांला आज्ञा काय प्रभो" असें ह्मणती ११८
त्यांसि नमुनि जिष्णु ह्मणे "या" यात्हृदयीं रहा, असीं न रहा
आधीं वीररसीं, मग बुडवावा सद्यशोरसीं नर हा।'११९॥
शिरतां अस्त्रें चित्तीं निजतेजें भानुला मनीं कढवी॥
चढवी गुण गांडीवीं तन्नादें कंप महिसही पढवी॥१२०॥
उत्तर ह्मणे "खरा तूं, नाहीं कोण्हीच कीं परि सहाय॥
ह्मणतों मनांत पार्था बहु वनसार्थाधिपापरिस[5] हाय" २१॥
हांसुनि जिष्णु ह्मणे "गा तुजला असहाय पार्थ कां गमला
आहे प्रसाद गुरुचा, कोण अधिक यापरीस सांग मला॥२२॥
मागें युद्धें केलीं ह्मणवूनि जनांत घेतलें धन्य॥
तेव्हां गुरुप्रसादा- हूनि मज सहाय कोण तो अन्य॥२३॥
असतां द्रोण सुरेश्वर[6] हरि हर हे गुरु-समर्थ, असहाय॥
एकाकी पार्थ कसा? न ह्मणावें त्यजुनि वीररस हाय२४॥

१ शंखांची कांकणें. २ पुरुषाचे अलंकार. ३ शुभ्र. ४ पूर्वेकडे तोंड ज्याचें. तो. ५ वनांत फिरणाऱ्या काफल्याच्या नायकापेक्षां. ६ इंद्र.

# अध्याय ४ था.



## सारांश.

अर्जुनानें आपल्या रथाचें स्मरण करितांच तो रथ आकाशांतून तत्काळ भूमीवर आला. त्यावर बसून अर्जुन मोठ्या वेगानें कौरवसैन्यावर गेला. त्यास पांहून दुर्योधनानें भीष्मास विचारिलें कीं, पाण्डवांचा अज्ञातवास सम्पला नाहीं. असें असतां, अर्जुन प्रकट झाला. तर यांनीं पुनः बारा वर्षें वनवास करावा.तेव्हां भीष्म ह्मणाला, चान्द्रमानानें बराबर तेरा वर्षें पूर्ण झाल्यावर पाण्डव प्रकट झाले. ते सत्यप्रतिज्ञ आहेत. आतां त्यांस त्यांचा राज्यभाग देऊन त्यांशीं सख्य करावें. दुर्योधनास तें आवडलें नाही. तो भीष्मादिकांस अर्जुनाशीं युद्ध करण्यास ठेवून आपण गाई घेऊन हस्तिनापुरास निघाला. अर्जुनानें मोठ्या वेगानें जाऊन प्रथम त्यासच गांठून त्याचा पराभव केला. व गाई सोडविल्या. मग कौरवसैन्यावर जाऊन कर्णाचा पराभव केला. तेव्हां कर्ण पळून गेला.

स्मरतांचि वा१नरांक- ध्वज गगनांतूनि उतरला महिला ॥
तो स्थापिला रथीं त्या श्रीकृष्णसखें शमीतळीं पहिला १॥

१ वानर-मारुति, त्याचा अंक चिह्न ज्यावर तो, असा ध्वज ज्याचा तो. २ उत्तर.

जातां कुरुकटकावरि वाजविला दिव्य देवदत्त[1] दर[2] ॥
तो[3] होय जनां जैसा कल्पांतीं[4] रुद्रदेव[5] दत्तदर[6] ॥ २ ॥
झाला उत्तर त्यांतें जिष्णु ह्मणे "पावलासि कांप दरें ॥
अद्यापि बांधिलेंसे तुझिया मतिनें अधैर्य कां पदरें" ॥३॥
तों वैराटि ह्मणे "गा कोणाचाही असा न दर वाजे ॥
बा लागले असावे अमर[7]-पुरींचेहि आजि दरवाजे ॥४ ॥
ते गज दिग्गज झाले बहुधा धैर्यावसानदरवा[8] जे ॥
वाटे श्रीवृषवाहन[9]- विभुचाहि रणीं असा न दर वाजे ॥ ५ ॥
झाली बहुधा विद्युत् कांपतसे याचियाचि निःस्वानें[10] ॥
मी किति? ज्याला भी श्री त्याला झावें कसें न निःस्वनें[11] ६
अर्जुन तुह्मीच कळलें ठेऊंद्या दर, न मानसा दर हो ॥
रक्षा धृति, आहें मी सूतपणीं हरिसंमान[12] सादर हो" ॥७ ॥
हांसोनि ह्मणे "हरिसख हो गाढासन[13] विकंपधी[14] धीट ॥
न धरीं बा दर, हा दर सादर दे वाजवूं पुन्हा नीट" ॥ ८॥
ऐसें वदे करी मृदु[15] पूर्व जलजवादनीं[16] मग जवा जी ॥
तेव्हां त्या कुरुकटकटकीं हगले मुतले समस्त गज वाजी ९

---

१ देवदत्तनामक. २ शंख. ३ अर्जुन. ४ प्रळयकालीं. ५ शंकर. ६ भय ज्यानें दिलें तो. ७ अमरावतीचे. ८ धैर्य व अवसान देणाऱ्या शब्दाला. ९ श्रीशंकराचाही. १० ध्वनीनें. ११ निर्धनानें. १२ श्रीकृष्णासारखा. १३ दृढ-आसन ज्याचें तो. १४ कंपरहित बुद्धि ज्याची तो. १५ ऐसें पूर्व मृदुवदे, मग जलजवादनीं जवा करी. हा अन्वय. १६ शंख.

द्रोण ह्मणे "न दिसे जय कां करितां आननें नत पहा रे ॥
आला विजय, जयाचें श्रीशंभुतपापुढें न तप हारे" ॥१०॥
गांधार ह्मणे "गुरुजी पण न करुनि पूर्ण हा प्रकटला हो ॥
पुनरपि वनवास करो गुरुघातक पातक प्रकट लाहो" ॥११॥
कर्णाद्यासांसि ह्मणे "तुमचे विजयी असोत हात रणीं ॥
शरपटलाच्छादित हो अर्जुनशस्त्रप्रताप हा तरणी ॥१२॥
गुरुजांस काय पुसतां चापीं गुण मद्वचेंचि चढवा हो ॥
यांला हेंचि ह्मणावें, कीं आह्मां धर्मशास्त्र पढवा हो १३॥
प्रियशिष्यधनंजयगुण वर्णुनियां यांसि त्हदय निववूं द्या ॥
उत्पातोत्प्रेक्षेनें जरि आह्मां भिववितात, भिववूं द्या ॥१४॥
पढवावें मात्र इहीं भेदावें परत्हदब्ज कटुकवचें ॥
कीं दुरुनि दिसावे हे प्रेक्षकदृष्टीस युद्धपटु कवचें ॥ १५॥
प्रार्थुनि पुढें करावे हे यज्ञीं, कीं सुभोजनावसरीं ॥
सिंधूंत तरेल कसी जी केली केलिहेतु नाव सरीं" ॥१६॥
खळकृतगुरुनिंदेतें वर्णील कधीं न विस्तरें सुकवी ॥
कीं ती श्रीगुरुभक्ति- प्रेमाऽमरपादपांकुरा सुकवी ॥१७॥
कर्ण ह्मणे "सत्य वदसि परि आजि तुझ्या नसो मनीं कांहीं

१ मुखें. २ खालीं वाकलेलीं. ३ दुर्योधन. ४ शरांच्या पड-द्यानें झांकलेला. ५ अर्जुनाच्या शस्त्रांचा प्रभाव. ६ माझ्या आ-ज्ञेनेंच. ७ उत्पातांच्या तर्कानें. ८ दुसऱ्याचें हृदयकमल. ९ क-ठोर भाषणानें. १० रणचतुर. ११ क्रीडेच्या उद्देशानें. १२ गुरु-भक्तिप्रेमा हाच कल्पवृक्ष, याच्या अंकुराला.

यद्यपि समरोत्साह त्यजिला अर्जुनभयें अनीकांहीं १८॥
जावोत गोधनातें घेउनि हे कीं उगेचि राहोत ॥
पाहोत युद्धकौतुक परि भीतिनदींत हे न वाहोत ॥ १९ ॥
ख्यात जगांत धनंजय याहुनि मी कर्ण काय गा ऊनं ॥
गाती गातिलहि कवी स्वगुण, स्वमुखेंचि काय गाऊन२०॥
पाहोत सिद्ध विद्या-धर मुनि गंधर्व देव शुद्ध रण ॥
करितों आजि सुयोधन- त्हच्छल्याचें सुखेंचि उद्धरण २१
हो स्वस्थ, स्वमनस्था आधिनगा भरतसार्थपा खाणीं॥
मच्छरटंक सहाया कैचें सामर्थ्य पार्थपाखाणीं॥ २२ ॥
म्यां जोडिलीं सदस्त्रें शस्त्रें झालींच आजि अनपायें ॥
देउनि दर्शन केलें माझें अतिमात्र त्हष्ट मन पार्थे ॥२३॥
श्रीभार्गवास्त्रतेजें भंगावें संगरांत सुत्राम्यां ॥
आश्चर्य काय त्याच्या केलें जरि भग्न आजि पुत्रा म्यां"॥
त्यासि कृप ह्मणे "कर्णा सुज्ञांहीं ऐकतांचि डोलावें ॥
ऐसेंचि बोलणें जरि, तरि पुरुषानें दहांत बोलावें॥२५॥
तूं नीतिविरुद्ध वदसि साहस हें, फल नदे वचनयज्ञ ॥
अद्भुत कर्म करुनिही वा न वदति एकही वच नयज्ञ२६॥
तूं भंगिसील कैसा, आला बांधोनि काय हात रणीं ॥

१ सैन्यांनीं. २ उणा. ३ दुर्योधनाच्या हृदयांतील शल्याचें. ४ आपल्या मनांतल्या. ५ चिन्तारूप पर्वताला. ६ भरतसमूहाच्या नायका. ७ माझे बाण, हीच टांकी. ८ पार्थरूप पाषाणामध्यें. ९ उत्तम अस्त्रें. १० सफल. ११ अत्यन्त. १२ इन्द्राला. १३ भाषणरूप यज्ञ. १४ नीतिज्ञ.

सर्वाहितांधकार- ध्वंसकर मनुष्यकाय हा तरणी ॥ २७ ॥
एकेंचि खांडववनीं या पार्थें अग्नि तर्पिला कर्णा ॥
सर्वसुरांच्या स्वधनु- ध्वनिंनेंचि त्रास अर्पिला कर्णा॥२८ ॥
एकेंचि भगवदनुजा हरिली, भ्याला न लेश कलहाला ॥
जरि खवळला पिऊनि मधु खलबलदलनदक्ष बल हाला २९
एकेंचि ईश्वरासीं केलें युद्ध प्रसिद्ध राधेया ॥
एकेंचि असुरे वधिले तन्माया एकही न बाधे या ॥३०॥
एकेंचि जिंकिला तो गंधर्वाधीश चित्रसेन रणीं ॥
रोमांचित-तनु होती वीरधनंजयपराक्रमस्मरणीं ॥ ३१ ॥
एकें त्वां काय कधी केलें कर्णा स्वकर्म वाखाण ॥
हीरकें वीरकरगनव- टंकेंहि चिरे न,जेविं पाखाणें ॥ ३२॥
घालूं पाहसि दंष्ट्रा उपडाया अहिमुखांत आंगोळी ॥
ऐसें साहस करितां होइल तनुची पळांत रांगोळी ॥ ३३ ॥
कंठीं बांधोनि शिळा बाहुबळें सागरांत तरशील ॥
परि साहसें न विजया, हें शील नसो,असो इतर शील॥३४
सर्वहि मिळोनि भांडूं कर्णा व्हावें न साहसा मान्य ॥

---

१ सर्व शत्रु हाच अन्धकार, त्याचा नाश करणारा. २ मनुष्यदेहधर. ३ आपल्या धनुष्याच्या ध्वनीनें. ४ सुभद्रा. ५ बलराम. ६ शत्रुसैन्याचें मर्दन करण्यांत दक्ष. ७ मद्य. ८ शंकराशीं. ९ निवातकवच दैत्य. १० हिरा. ११ वीराच्या हातांतील नवीन टाकीनें. १२ पाषाण. १३ दादा. १४ सर्पमुखात.

यत्नें नृपयश रक्षूं आजि नव्हे श्वेतवाह[1] सामान्य"॥ ३५ ।
द्रौणि ह्मणे "एकाकी तूंचि क्षम[2] जिष्णुवारणा[3] सूत[4] ॥
वहुधा बद्ध करीलचि लूतेचें[5] जिष्णुवारणा[6] सूत ॥ ३६ ॥
करिसि विकत्थन[7], जिंकुनि नेलें नसतांहि गोधन शिवेतें[8]॥
सत्प्रिय शुचि यश कर्णा भलत्या न करूनि शोधन शिवे तें
साहे विविधोपद्रव वाहे पृथ्वीं चतुर्विधें[9] भूतें ॥
आहे उगीच कर्णा न कधीं बोलोनि दाखवी भू[10] तें ॥३८॥
जाळी ज्वलन[11], न बोले, न वदेचि जरि प्रकाश करि तरणी[12]
न वदोनि कुलज[13] पुरुषहि आले स्वयश[14]:प्रकाश करित रणीं
पावूनि सर्वमहितें विगुणांहि[15] गुरूसि जे कुलज नर ते ॥
सत्कारिति, अलि[16] कमळीं तेंवि गुरुपदीं महाकुलजन रतें ॥
राधेया उद्धत तूं हा दुर्योधनहि फार उद्धत रे॥
गुरुनिंदक हो स्पष्ट व्यसनांत बुडे अशुद्ध, शुद्ध तरे॥४१॥
छद्मद्युतें[17] केल्या सत्सर्वस्वापहार-कर्मातें[18] ॥
पुरुषार्थे[19] श्लाघ्य असें मानुनि पावेल कोण शर्मातें[20] ॥४२॥

१ श्वेतवर्ण अश्व ज्याचे तो, अर्जुन. २ समर्थ. ३ अर्जुनाचें निवारण करण्यास. ४ हे कर्णा. ५ कोळ्याचें. ६ ऐरावताला. ७ बडबड. ८ नगराच्या सीमेपर्यन्त. ९ जरायुज-मनुष्यादि, स्वेदज-कृमि इ०, अण्डज-पक्षिसर्पादि. उद्भिज्ज-तरुगुल्मादि. १० पृथ्वी. ११ अग्नि. १२ सूर्य. १३ कुलीन. १४ आपल्या यशाचा प्रकाश. १५ गुणहीनालाही. १६ भ्रमर. १७ कपटद्यूतें. १८ सज्जनाच्या सर्व धनांचें हरण-असें. कर्म. १९ पुरुषानें साधावयाच्या गोष्टी. २० सुखाला.

कोण्या रणांत पांडव जिंकुनि तद्राज्य साधिलें वद रे ॥
कृष्णेसि जिंकिलें त्वां कोण्या समरांत सांग रे सद्रे,४३॥
तुज कीर्ति, पांडवां अप- कीर्ति,ह्मणे आयकावि कतमरण
सावध रे कां घेसी मंदा खळनायका विकत मरण ॥४४॥
सिंहासि द्वेष करुनि कोण बळी वारणांत उरणारे ॥
कां भ्रमलासि, कसा त्वां जय पावावा रणांत उरणा रे॥
अरिच्याहि सद्गुणांतें प्रेमें वाखाणितात सुज्ञानी ॥
खळहो मग वर्णावा कां न जगन्मान्य शिष्य सुज्ञानीं ॥
तुजहुनि विशिष्ट वीर्ये, चापीं जो शक्र, संगरीं जिष्णु॥
कोणा सुज्ञासि नव्हे तो पूज्य स्तुत्य शंभुसा जिष्णु॥
सुत शिष्य सम, तयांत व्यार्थी खळमति, खरे असु ज्ञाते॥
प्रिय नसतील कसे जे साधु यशस्कर खरे असुज्ञा ते ॥४९
केलें दुर्द्यूत जसें त्वां शक्रप्रस्थ तें जसें हारिलें ॥
स्वसभेंत आणिलें त्वां साध्वीस जसें न भय मनीं धरिलें॥
आतांहि तसेंचि तुवां पार्थासीं धैर्य धरुनि भांडावें ॥
भांडावें कर्ण शकुनि- संमत पांडित्य, अन्य सांडावें ५०॥
पांचांसाहि जो जिंकी सोडुनियां कुरुसभेंत अक्ष महा ॥
एकाशि शकुनिमामा जिंकाया काय आजि अक्षम हा ॥
आह्मी आजि झगडतों जरि येता तो विराट तरि त्यासीं
झगडोंना शब्देंही पार्थासीं, लवांहि अघ न कारत्यासीं ॥

१ हे सज्जनाच्या शत्रो कर्णा. २ कोणतें युद्ध. ३ गजांमध्यें. ४ हे मंद्या. ५ युद्धांत. ६ जयशील. ७ अर्जुन. ८प्राण. ९हे मूर्खा. १० फांसे. ११ असमर्थ. १२ लेशाही.

भीष्म ह्मणे“द्रौणे तूं उत्तम वदलासि, कृपाहि शुद्ध वदे ॥
धर्मन्यायोदित जें तेंचि सुभाषण मनासि उद्धव दे ॥५३॥
क्षत्रियधर्में केवळ इच्छितसे युद्ध कर्ण उत्साहें ॥
उचितचि, परंतु अनुचित करणें गुरुची दहांत कुत्सा हें॥
द्रोणद्रौणिकृपांहीं आजि करावी क्षमा, न कोपावें ॥
भेद नसावा बुधहो भेदें स्वयश न परांसि ओपावें” ५५॥
दुर्योधन नमुनि ह्मणे“ गुरुजी,मज अरिकरीं न सोपावें ॥
तेजोजननार्थ तसें वदलों त्वन्मत्सरीं नसो, पावें”॥ ५६ ॥
हांसोन द्रोण ह्मणे“ आह्मां कोपों न देचि वत्सलता ॥
नसतें क्षमाकवच तरि हृदयीं त्वच्छब्द अशनिवत् सलता”॥
भीष्मासि मग ह्मणे“नृप पुसतों अज्ञातवास-पण पुरला॥
कीं कांहीं मास तरी पक्ष तरी दिन तरी असे उरला ॥
भीष्म ह्मणे“ गांधारे पांडव पंडित खरे, न दभ्रमती॥
न भ्रमले, जे प्राकृत तेचि मनीं धरुनियां मद भ्रमती ॥
कामी कोपी लोभी जे, संसारांत पावती भ्रम ते ॥
प्राकृत पंडित पांडव असते; तरि हेहि केविं न भ्रमते ॥
शास्त्रमतें मासद्वय पांचां वर्षांत अधिक लेखावें ॥
अज्ञात-वास यास्तव सरलाचि असेंचि तत्व देखावें ॥
तेरा वर्षांत अधिक दर्शपक्ष द्वादश क्षपा पडती ॥

१ धर्म व न्याय यांनीं सांगितलेलें. २ उत्सव. ३ निन्दा. ४ वीरश्री उत्पन्न करण्याकारितां. ५ वज्रासारखा. ६ हे दुर्योधना. ७ अल्पबुद्धीचे ८ दहा पंधरवडे. ९ रात्री.

चांद्रशरन्मानें हे संख्या संख्यावदादृता घडती ॥ ६२ ॥
एवंच चांद्रमानें तेराहि स्पष्ट सारिले अब्द ॥
सत्यप्रतिज्ञ पांडव लागू देती न आपणा शब्द ॥ ६३ ॥
येतां अन्यायलवें आलपायासेंहि इंद्रपद पदरा ॥
हूं न ह्मणतील, काळा- पासुनिही पावतील हे न दरा॥
युद्धें करूनि पाक्षिक जय, त्यांतहि विजय पातला समरा॥
सम रामासीं व्हा, हो शम राज्यसमर्पणें, हठें न मरा''६५॥
कुरुंधम ह्मणे "युद्धचि हो, सख्य न हो, पितामहा यासीं॥
शक्राहि बुक्ल यातें मद्धृत पद ओपितां महायासीं''॥६६॥
भीष्म ह्मणे" तरि कांहीं बल घेउनि जा पुरां, नका राहूं॥
बा हूं मजचि ह्मण, न त्या द्विषदंगाराचिया चकोरा हूं॥
आह्मांपासीं राहो अर्ध कटक पार्थसिंह घेराया ॥
एकें भाग त्याच्या गाई, तूं एक भाग घे राया ॥ ६८॥
मी कर्ण कृप द्रोण द्रौणि असे हे रणांत पांच कसा ॥
उतरों धनंजयाच्या, कीं नुतरों, तूंचि मात्र वांच कसा"॥
धाडुनि पुढें नृपाला त्या मागुनि गोधनासि सत्वरची ॥
शास्त्रमतें व्यूहातें तत्कालचि तो अगाधसत्व रची ॥
कर्ण पुढें, गुरु मध्यें, ज्याच्या तेजासि शक्रहि न साहे ॥

१ चांद्रवर्षाच्या मानानें. २ संख्यावत्-आदृता ह्म० पंडितांनीं. स्वीकारिलेली. ३ भयाला. ४ कोणत्यातरी पक्षाचा. ५ स्वनगराला. ६ शत्रूंचा इंगळ ह्म० शत्रुदाहक श्रीकृष्ण, त्याचा. ७ सैन्याच्या चारभागांपैकीं एका भागानें. ८ कसाला. ९ अतिशय गाम्भीर्य ज्याचें तो.

दों भागीं द्रौणि कृप व्यूहामागें नदीजं तो राहे ॥ ७१ ॥
द्रोण ह्मणे " सैनिकहो हा आला कीशकेतुअर्जुन हो ॥
कोण सुहृद् न ह्मणेल ख्यात जगीं विजय विजय अर्जुन हो
हे दोन बाण माझ्या चरणांवरि उतरले पहा नमना ॥
या गौरवें मज परिस गमला कनकाद्रिही लहान मना ७३
हे अर्जुननामांकित शर मत्कर्णद्वयासि लागोनी ॥
पडले पहा, अहा रण न करी, आज्ञा मला न मागोनी॥ ७
झाले बहु, होतिल बहु, आहेतहि बहु, परंतु या-सम हा ॥
यास महादेवा दे जय, पाहिन कधि धनंजयास महा"॥७५
पार्थ ह्मणे" वैराटे रथ कुरुकटकासमीप राहूं दे ॥
गोधन हरावयास्तव आले भट कोण कोण पाहूं दे॥७६॥
तो गुरु, तो गुरुनंदन, तो कृप, तो कर्ण, तो पितामह रे
यांहीं धेनु वळाव्या शिव शिव! गोपाळ! कृष्ण! राम हरे! ७७
रे उत्तरा शकुनिचा या व्यूहांत न दिसे मला माचा ॥
त्या वांचुन यांसीं जो करणें संग्राम तो न लाभाचा ॥७८॥
बहुधा गोधन घेउनि मागें गेला पळोनि कातर तो ॥
सर्वहि खोटा व्यसनीं बुडतो, न पळो पळो, निकी तरतो ७९
हें कटक सोड, तिकडे चाल, तुझ्या हरुनि गोधना खळ तो

१ अश्वत्थामा. २ भीष्म. ३ कीश ह्म०वानर, केतूवर ज्याच्या, तो. ४ मित्र. ५ हे अर्जुना. ६ जय. ७ मिळवून. ८ मेरु देखील. ९ अर्जुनाच्या नांवानें चिह्नित केलेले. ह्म० ज्यांवर अर्जुन हें नांवलिहिलें आहे, ते. १० माझ्या दोन कानांस. ११ तेजाला. १२ वीर. १३ युद्ध. १४ भित्रा. १५ खरा.

प्राणत्राणपरायण जिकडे निरपत्रपाग्रणी पळतो॥ ८० ॥
उत्तर निज तुरगांतें, द्याया अरुणासि कौतुक, पिटाळी॥
तो गर्जोनि कुरु-कटक- कर्णी बसवी ध्वजस्थ कपि टाळी॥
कृप सैन्यासि ह्मणे हो, हो प्राप्तारिष्ट शांत, न वधावा ॥
राजा पार्थे, सांगपे सगुरु सगुरुसुत सशांतनव, धांवा" ८३
मांडुनि पार्थ ह्मणे "रे आलों मी अनुज भीमसेनाचा ॥
ज्याच्या शरांसि ह्मणती सुर असुर-बळांत भीमसे नाचा ८४
कोठें जाल, उभे रे, मत्स्येश्वरधेनुपश्यतोहर हो ॥
सोडा गोधन, नाहीं- तरि वधिन तुह्मांसि, वंद्य तो हर हो" ८५
शरपटलानें झांकी कुरुकटकालाचि तो न बांसवि, त्या ॥
खचर ह्मणति तेजस्वी लोपविता भेटला नवा सवित्या ८६
सुरदत्तधनुर्गुण-रथ- नेमि-ध्वजवासिभूतनादानीं ॥
कांपे न चमूचि, कुंही, स्वकुचांच्या जेवि पूतना दानीं॥८७
खळबळजलनिधिमग्ना धेनु उसळल्या, अलाबु झाल्या हो ॥

१ प्राणरक्षणाविषयीं तत्पर. २ निर-अप-त्रपा-अग्रणी ह्म० निर्लज्जशिरोमणि. ३ घोड्यांना. ४ कौरवसैन्याच्या कानांत. ५ ध्वजावर बसलेला. ६ वानर-मारुति. ७ काण्टाळी. ८ प्राप्त झालेलें विघ्न. ९ सकर्ण. १० दैत्यांच्या सैन्यांत. ११ शंकरासारखे. प्रलयकालीं शंकर आपले हजार बाहु पसरून नृत्य करितो. १२ विराटाच्या गाईंचे, दरवडेखोर हो. १३ अनुकूल. १४ शंकर. १५ इन्द्रपुत्र अर्जुन. १६ देव. १७ सूर्याला. १८ देवदत्त, धनुष्याची दोरी, रथचक्रधारा व मारुति ह्यांपासून झालेल्या शब्दांनीं. १९ पृथ्वी देखील. २० दुष्टसैन्य हाच समुद्र, त्यांत बुडालेल्या. २१ भोंपळा.

हांसे विजय,मनिं ह्मणे  कां गोप[1]सख्या मला बुझाल्या हो॥
गेल्या पळोनि गाई  पृष्ठावरि पुच्छभार वाहोनी ॥
राहोनि निश्चल क्षण  विजय निवे त्यांकडेचि पाहोनी॥७९
येतांचि विक्रम[2]लवें  श्रीहरिचा दयितदा[3]स वीर गडी ॥
हरि[4] करिघंटे[5]सि तैसा  त्या कुरुसेनेसि वासवी रगडी॥८०॥
अंगावरि गोरज[6] तें  श्रीगोपाळांघ्रिचें[7]चि भावुनि घे ॥
जाया सुयोधनावरि  भीमाचा भीमशक्ति[8] भाउ निघे॥८१॥
भीष्मादि ह्मणति "गेला  कीं हो दुर्योधनांत-काम[9] खरा॥
धांवोनि गांठिती सा  जयलक्ष्मीदत्तकौतुका[10] मखरा[11]"॥८२॥
पाहुनि बीभत्सु[12] ह्मणे  "आला दुर्योधनाव[13]ऽना कर्ण ॥
म्यां ऋण परिग्रहाचें[14]  वारावें आजि, जेविं नाकर्ण[15]"॥८३॥
तत्काळ उत्तरें तो  नेला कर्णाकडेचि रथ, वातें ॥
घन गिरिकडे, सुवैद्यें[16]  स्वौषध रुग्णाकडेचि[17] अथवा तें॥८४॥
भंगुनि सहाय, मारुनि  बंधु, हराया समस्त तन्मद हा ॥

---

१ श्रीकृष्णाच्या सख्या, गाई. २ अल्प पराक्रमानें. ३ प्रिय भक्त. ४ सिंह. ५ गजसमूहाला. ६ गाईच्या पायांची धूळ. ७ श्रीकृष्णाच्या चरणांचें. ८ भयंकर शक्ति ज्याची, तो. ९ दुर्योधनाचा नाश इच्छिणारा. १० विजयलक्ष्मीला दिलें कौतुक ज्यानें, त्या. ११ मखररूप अशा अर्जुनाला. १२ अर्जुन. १३ दुर्योधनाच्या रक्षणाला. १४ स्त्रीचें-द्रौपदीचें. १५ स्वर्गाचें ऋण. १६ सु-औषध. १७ रोगग्रस्ताकडे.

पार्थ शरांनीं झांकी देखोनि ह्मणे तदीय-जन्मद हा ॥९५॥
दवं जेविं तृणावरणा[3] वृष[4] भस्म करी महाशरावरणा[5] ॥
पार्थ ह्मणे "करितो गिरि-श-कमंडलुसीं[6] पहा शरा[7]व रणा" ९६
कर्णहि इषुंनीं[8] झांकी मग त्या मोक्षेच्छुमानसाध्वसखा[9]॥
रुग्णाऽनला[10] ह्मणे जो. खांडव, सोडूनि सर्व साध्वसं[11], खा॥
तें किति वर्णावें म्यां पाहत होते विचित्रसमरा जे ॥
कर्णाच्या अपयानां-[12] वधि ते गमलेचि चित्रसम राजे॥ ९८

# अध्याय ५ वा.



## सारांश.

कर्ण युद्धांतून पळून गेल्यावर कृपाचार्य, द्रोण, अश्वत्थामा हे क्रमेंकरून अर्जुनावर धांवून आले. पण अर्जुनानें त्यांचा पराभव करून त्यांस पळवून लाविलें. मग कर्ण, भीष्म, दुःशासन, दुःसह, विविंशति आणि विकर्ण यांची ही अर्जुनानें तीच

---

१ त्या कर्णाचा पिता सूर्य. २ वणवा. ३ गवताच्या आच्छादनाला. ४ कर्ण. ५ मोठ्या बाणसमूहाला. ६ शंकराच्या कमंडलूबरोबर. ७ परळ. ८ बाणांनीं. ९ मोक्ष इच्छिणाऱ्या मनाला मार्गदर्शक मित्र. १० रोगग्रस्त अग्नीला. ११ भय. १२ कर्णाच्या पलायनापर्यंत.

दशा केली. पुनः कर्ण, कृपाचार्य व द्रोण हे तिघे एकदम अर्जुनावर आले. पण अर्जुनापुढें त्यांचा पराक्रम चालला नाहीं. भीष्म धैर्य धरून पुनः युद्ध करीत असतां त्यावर अर्जुनानें दहा बाण सोडून त्यास मूर्च्छित केलें.

कर्णापयान-कोपें झालीं सैन्यें समस्त एकवट ॥
त्यांत धनंजयरथ तो जैसा प्रलयार्णवांत[1] एक वट ॥ १ ॥
जाणों बुभुक्षितांतें तो दुष्काळांत अन्न दे खाया ॥
सदयोदारा[2] शतमखें[3] ये होउनि सुप्रसन्न देखाया ॥ २ ॥
होते यदंशशेष-[4] श्वासज्वलनांत हे समिद्धरणी[5] ॥
त्याचा सखा धनंजय होय खलशलभलया[6] समिद्ध[7] रणीं ॥ ३
कोणाचेंहि शरीर द्व्यंगुलहि[8] अविद्ध[9] तो न राहूं दे ॥
मुनि ह्मणति "खळांसहि गति बा नारायणसखा नरा हूं दे ४
वाहति शोणितपूरीं[10] शतशइभांचेहि[11] कुणप[12], टोळांचा ॥
मद किति गरुडीं, सद्भट- भुजभुजगाहि[13] वरिति गुण पटोळांचा[14]
इतरांची काय कथा अद्भुत संगर करी सहासें[15] कृप ॥

---

१ प्रलयकालच्या समुद्रांत. एक वटवृक्ष मार्कंडेया करितां उत्पन्न होत असतो. २ सदय व उदार अशा अर्जुनाला. ३ इंद्र. ४ ज्या विष्णूचा अंश शेष, त्या शेषाच्या श्वासाच्या अग्नींत. ५ समिधेचें रूप पावणारी धरणी. ६ दुष्टजन हेच टोळ, त्यांच्या नाशाकरितां. ७ प्रदीप्त. ८ दोन अंगुलें देखील. ९ अक्षत. १० रक्तांच्या पुरांत. ११ शेकडों हत्तींचे. १२ प्रेतें. १३ उत्तम वीरांचे भुज हेच भुजग-सर्प. १४ पडवळांचा १५ हास्ययुक्त.

होय विरथ, सुर ह्मणती सिंह पथ न दे करीस हा सकृप६॥
बीभत्सुपुढोनि विरथ स्वविकळ कृप पळविला नरवरानीं॥
तद्धनुचा भयद भटां हरिचाहि तसा गजां न रवं रानीं७॥
मग गगनगनगाभिन्मुख- सुरमत गुरुसींहि अनर्वमुनिनर तो॥
कलह करी, कीं इतरीं. गुरु-कलहीं,यांसि जन वर्मुनि,न रतो
गुरुच्या प्रथम रथासीं रथ भिडवी क्षिप्र, मग अकोपार्थ ॥
शिर चरणांसि,प्रार्थुनि करुणेसि ह्मणे त्यजूं नको पार्थ॥९
गुरुजी करा प्रहार प्रथम, तुह्मी गुरु, अविप्र हा, रामी ॥
शांतनयसा, करीन, प्रमुदित व्हाया कावे, प्रहारा मीं॥१०॥
सच्छिष्यावरि सद्गुरु आधीं प्रेमकरूनि आंशीची ॥
मग वृष्टि बहिःकोपें सुबहु करी बहुविधेपुराशीची ॥११॥
गुरुला विविध-शरांची वाहे तो रागराशि लाखोली ॥
भेटे अस्त्रतति तया जशि पाहों सागरा शिला खोली १२
शरसागरीं तिमिंगिल गुरु, पळभार होय शिष्य कंप्रतिमी

१ हा सकृप सिंह ( अर्जुन ) करीस ( गोतमास ) पथ नदे, असा अन्वय. अर्जुनाला सकृप ह्मणण्याचें कारण पुढील आर्यंत पहावें. २ अर्जुनापुढून. ३ शरांनीं व्याकुळ झालेला. ४ अर्जुनाच्या धनुष्याचा. ५ ध्वनि. ६ आकाशांतील इंद्रप्रमुख देवतांस मान्य. ७ द्रोणाशीं. ८ अनादि ऋषि अर्जुन. ९ या गुरुकलहाला, १० ओकून- टाकून. ११ गग नथेण्याकरितां. १२ अब्राह्मण-क्षत्रिय. १३ परशुरामावर. १४ आशीर्वादाची. १५ बाह्यात्कारी कोपानें. १६ अनेक प्रकारच्या बाणसमुहाची. १७ क्रोधाचा राशि. १८ अस्त्रांची पंक्ति. १९ महामत्स्य.

परिभूत द्रोण ह्मणे "श्रीभार्गवसाचि धन्य संमति मी"१३
त्यासमर्यी शंभु ह्मणे जरि तूं रुससिल तरी उमे रूस ॥
गुह काय विदारिल हा वत्स विजय शक्तिनें सुमेरूस १४॥
करिती सूर्यास्तोदय एकमुहूर्तांत एकशतदा ते ॥
त्यांत न एकासमही होती, मेघांअसेहि शत दाते ॥१५॥
पाडिति शरपटलांनीं जेव्हां नभ भरुनि अंधकारा ते ॥
कातर ह्मणति असमर्यीं करविसि कां कल्प अंधकारा ते ॥
द्रोणार्जुन तुल्यक्रिय बिंबप्रतिबिंबसेचि ते गमती ॥
*किति कुरुकटक-प्रेक्षक! वृत्रेंध्राचींहि लोचनें भ्रमती ॥१७*
समरीं शंकरसाच द्रोण गमे, जिष्णुही अजित साच ॥
त्रिजगद्विस्मयकर अति- अद्भुत परिभवहि तो अजि तसाच
सुरमुनि ह्मणती "छात्रें छिन्नध्वजकवच गुरु पहा केला ॥
झालीं बळें पराङ्मुख मारितसे कुमति कुरुप हाकेला१९॥
अधिका न क्षत्रियता न न्यूना विप्रता, पहा तरणा- ॥

---

१ पराभव पावलेला. २पार्वती. ३कार्तिकस्वामी. पार्वतीला रुसण्याचें कारण-आपल्या मुलाची निंदा व आपल्या पित्याचा ( हिमालयाचा ) शत्रु इंद्र, त्याच्या पुत्राची स्तुति. ४ द्रोणार्जुनांपैकीं एकानें बाणवृष्टीनें आकाश भरून सूर्यास्त केला असतां, दुसऱ्यानें ती बाण वृष्टि छेदून सूर्योदय करावा. असें एका क्षणांत शेकडों वेळ ते दोघे करीत असत. ५ हे शंकरा. ६ ज्या पदार्थाचें प्रतिबिम्ब पडलें असतें, त्या पदार्थास बिम्ब ह्मणतात. ७ इंद्राचीं. ८ विष्णु. ९ शिष्यानें. १० छेदिला, ध्वज व कवच ज्याचें, तो. ११ दुर्योधन.

नसतांहि कसा ज्याचे विक्षतहि न विप्रताप हात रणा"॥
केला शीघ्र स्वबळें शिष्यें परिभूत सत्वराशि कवी ॥
याचि सुयशोर्थ बहुधा न शिके हा, गुरुहि नत्वरा शिकवी
अश्वत्थामा धांवे रक्षाया संकटांत जनकास ॥
जन कासया विते सुत कसिते न करावया भजन कास २२
इंद्रोपेंद्र तसे ते गुरुबंधु सखे कृपीपृथातनय ॥
धन यश ज्यांचें, त्यांतहि उठवी वैरासि शकुनिचा अनय ॥
तो उत्तमर्णसा गुरु सोडुनि पुत्राकडे हरिसख बळे ॥
पितृप्रतापै-हरणें द्रौणिहि हृतमणिफणीपरिस खवळे ।२४।
सांवर्तिक-मेघांच्या लाजाव्या द्रौणिसायकां धारा ॥
सत्तातहुनि होइल सुत ह्मणवायासि हाय कां धारा॥२५॥
अत्युग्र राम कीं हा द्विज ह्मणति असें पराशर व्यास ॥
काळहि चुकेल,याचा न चुकेलाचि शर,परा शरव्यास२६
बहु कल्पना सुकविसा, विजयहि बहु शरपरंपरा,व्याला॥
भंगू पाहे समरीं गुरुपुत्रासहि,जसें पराव्याला ॥ २७ ॥
ज्या इषुंनीं क्षत होतां रागें वरि आंतही हर भरे हो ॥

१ कृपी-द्रोणस्त्री, व पृथा यांचे पुत्र. २ ज्यांचें, धन हेंच यश आहे त्यांतहि. ३ ऋणदात्यासारखा. ४ अर्जुन. ५ पित्याच्या प्रभावाचें हरण केल्यामुळें. ६ ज्याच्या मस्तकांतील मणि हरण केला, अशा सर्पापेक्षां. ७ प्रलयकालीन मेघांच्या. ८ कमी योग्यतेचा. ९ परशुराम. १० हा द्विज ह्म० हा ब्राह्मण. अश्वत्थामा. ११ दूरच्या. १२ निशाणाला. १३ परक्याला. १४ बाणांनीं. १५ क्रोधानें किंवा प्रेमानें.

ते द्रौणिशरा जैसे कपि[1]ला दासें दिले हरभरे हो ॥ २८॥
तैं सुर नर हय गज हा म्हणति,"न याचेचि आठवाजी हा
घडलें गुर्[2]वघ जाया अद्भुत संग्राम आठवा जी हा"॥२९
आचार्यसुतें केली छिन्ना सोडूनि खरशरा ज्यां[3] तें ॥
पाहुनि मुनिहि म्हणति "हा पावेल अजातरिपु न राज्यातें"
भीष्मेंद्रमुख[4]-नरामर म्हणति "भला गा भला महाबाहो ॥
त्वद्दोःप्र[5]ताप अतितर अद्भुतचि,कधीं उणा न हा बा हो"
हांसे नारायणसख तें सज्य पुन्हा करून कोदंड ॥
जें काळासि म्हणे " गा झांक,मजपुढें करूं नको दंड"॥३२॥
शक्र म्हणे " व्यर्थ भरीं हा त्यजुनि विचार तर्क विप्र भर
वत्सा तुझ्या शरांनीं केला सुप्र[6]भहि अर्क विप्रभ[7] रे"॥३३
स्त्रीस म्हणे "वत्साचे, तैसे गुरुसूनुचे शचि, न भाते ॥
अक्षय्य[8] कार्य असते तरि करिते निरवकाश[9]चि नभा ते"३४
प्रतिरव[10]मिषें शरांनीं भरतां कुंथावयासि नभ लागे ॥
देवी म्हणति"सख्यांनो दारुण हा क्षात्रधर्म,न भला गे३५
करितां तुमुल[11]तर समर, शर सरले, गुरुसुतीं उणें होतें ॥
पूर्णत्व पांडवीं, हें एकें हरिदासता-गुणें हो तें ॥ ३६ ॥

---

१ वानराला. २ महापातक. ३ प्रत्यंचा. ४भीष्मप्रमुख नर व इंद्रप्रमुख अमर. ५ तुझा बाहुप्रताप. ६ उत्तम प्रभा ज्याची तो. ७ तेजोहीन. ८ ज्यांचे कार्याचा कधीं क्षय होत नाहीं ते. अर्जुनाचे बाणांचें कार्य संपत असे. कार्य संपल्यावर ते स्वस्थानीं जात असत. ९अवकाशरहित. १० प्रतिध्वनीच्या निमित्तानें. ११ फार भयंकर.

झाले भाते समरीं आणाया गुरुसुतीं उणीव रिते ॥
देती सामग्री जय तरि कां सन्नीतिला गुणी वरिते ॥ ३७॥
भंगे अश्वत्थामा, अश्वत्थां मां कचित्, सदा हरिला ॥
तसि इतरांसि जय श्री, नित्य हरिजनांसि,तो तिणें वरिला
करितां पार्थे गुरुसुत, घटजमुनिवरें समुद्र-साचि रिता ॥
धांवे कर्ण-गजावरि हरि नखरांनीं तया जसा चिरिता ३९
कर्णधनुर्ध्वनि कर्णीं शिरतां तिकडेचि पार्थ तो पाहे ॥
राहे अश्वत्थामा, कढले, चढले अपार कोपा हे ॥ ४० ॥
पार्थ ह्मणे “ रे कर्णा बहु भट मजसीं भिडोनि गडबडती
ही आजि आर्जि आहे नोहे केली सभेंत बडबड ती ४१
तेव्हां पांचहि आह्मी होतों दृढ धर्म-पाश-बद्ध रणीं ॥
आतां सुटलों खळ हो कसि हरिली कपट करुनि सद्धरणी॥
कत्थन सुकर,सुदुष्कर समर, अमर यमरवींद्रमुखहि तुला
होउत सहाय, न जयें होय खळांच्या कधींहि सुख हितुला
जे गांजिली कुरुसभे- मध्यें त्वां वायको निकर करुनी ॥
बांधावेंचि यमें तुज पुरतें तें नायकोनि करकरुनी ॥४४॥

---

१ पिंपळाला. फक्त शनिवारीं प्रातःकाळीं अश्वत्थापाशीं लक्ष्मीचा वास असतो, असें शास्त्र आहे. २ लक्ष्मी. ३ अगस्त्य ऋषीनें. ४ कर्ण हाच गज, यावर. ५ कर्णाच्या धनुष्याचा शब्द. ६ युद्ध. ७ सज्जनांची भूमि. ८ बडबड. ९ यमरविइंद्रप्रमुख १० चित्ताला.

तेव्हां यमधर्माचें अस्मद्धर्मापुढें न बळ मांडे ॥ ॥
आजि तुह्मीं ओंगरिलां काळामत्रांत सर्व खळ मांडे"॥४५
कर्ण ह्मणे " आलों बळ दावायास स्वयें पहायास ॥
शोभे समरीं, न तसा न भटांच्या भाषणीं महायास॥४६॥
बहु कर्म करी पंडित, कथनाऽवसरींहि थोडकेंच वदे॥
शाकांत प्रवर जसें पथ्याहि, तैसें न दोडकें चव दे ॥४७॥
केला पण पूर्ण, ह्मणसि, आलासि करावयासि कलहास ॥
ये, मजसीं युद्ध करीं, हो भग्न, करोत हे सकल हास॥४८॥
तूं काय, वासवासहि पळवीन रणांत आजि भंगुन गा ॥
बहु हास्य येतसें कीं पाहे लंघावयासि पंगु नगा"॥ ४९॥
पार्थ ह्मणे "राधेया करुनि पलायनहि तूं न लाजसि रे ॥
साध्वी विटाळयीं जसि, तसि बहुधा त्वन्मनीं न लाज सिरे
मारविला मजकरवीं त्वां अनुज,न तारिला, न तारविला
जारविलासन्याय स्मरला या खळतमाचिया रविला"५१
ऐसें वदोनि सहसा न पहावा साधुधर्महानिकर ॥
ह्मणुनि शरांचा सोडी झांकाया त्यासि तो महा निकर॥
हस्तीं हाणुनि खरतर शर नरमुष्टीस कर्ण समरांत ॥
सहसा विशीर्ण करिता झाला होताचि मान्य अमरांत॥५३॥
त्या कर्णाच्या तोडी तो हरितनुजनु धनुष्यवल्लीला ॥

१ वांढिलां गेलां. २ कालरूप पात्रांत. ३ सांगण्याच्या वेळीं. ४जारगृहीं. ५जाराच्या विलासाची रीति. ही केवळक्षणिक असते. ६ खलरूप अंधकाराच्या. ७ साधूंच्या धर्माची हानि करणारा ८समूह. ९ क्षीण. १० अर्जुन. ११ धनुर्गुणाला.

जन ह्मणति "मूर्त काळचि हा, वरि दावी मनुष्यवत् लीला
उग्रें कोपें रोपें भेदी मूर्च्छार्थ अंगपोराला ॥
रविहि तमांत बुडे हो न घडे द्याया कुसंग पोराला ॥५५॥
हरिहरगुरुप्रसादज अमित निजभुजप्रताप कळवीला ॥
वळवीला कर, जाणों तो गर्वयशःसमेत पळवीला ॥५६॥
भीष्मावरि जातां धृति- मान केला जेविं वज्रकवचांनीं ॥
श्रांत भ्रांतस्वांत स्वांतत्रासार्त उत्तर वचांनीं ॥ ५७ ॥
तद्धैर्यार्थ स्वयशें वर्णी स्वमुखें, जरी न वानावीं ॥
स्थिर त्यासि रथीं करि. गुरु जैसा हरिच्या सुमानवा नावीं
कुरु गुरु-पितामहांसीं जिष्णु करायासि जाय कलहातें
कीं साधुच्याहि साधुहि पात्र दुःसंगभंगफल हातें॥ ५९ ॥
नारायणप्रियसखें सर्व-मुनिवरें नरें सुरोपास्यें ॥
प्रथमचि पितामहाचा ध्वज तोडुनि पाडिला सुरोपास्यें ॥
पाखंडागमें रोधूं पाहति येऊनि आड वेदास ॥
पार्थासि तसे कौरव ज्या यावे एक आडवे दास ॥ ६१ ॥
खळ दुःशासन दुःसह आणि विविंशति विकर्ण हे चवघे॥

---

१ बाणानें. २ कर्णत्हृदयाला. ३ पृथ्वीशीं संबंध ह्म० पृथ्वीवर पतन. ४ श्रीकृष्ण, शंकर आणि द्रोण यांच्या कृपेपासून उत्पन्न झालेला. ५ भ्रमयुक्त अन्तःकरण ज्याचें, तो. ६ आपल्या मृत्युभयानें त्रस्त झालेला. ७ दुष्टसंगतीमुळें झालेला पराभव, हेंच फळ. ८ देवांनीं उपासना करण्यास योग्य अशा. ९ सुरोप-आस्यें ह्म० उत्तमबाणमुखानें. १० नास्तिकशास्त्रें.

विजयें दमुनि पळविले दोष जसे दाशरथिगुणें[1] अवघे ॥
सर्व महारथ ह्मणती त्या विजया, वासवा जसे नग[2], हूं
केले पिष्ट असुरगिरि[3] जेणें, किति त्यास ते तसे न गहूं
हरिनीं गजसे, कुरु भट जिष्णुशरांनीं उदंड, लोळविले
दिव्यांगनां-सह गगनें-यानीं[4] मग बैसवूनि बोळविले ६४
क्षतजनद्या[5] पक्षिरवें[6] ह्मणती वीरांसि आयका मन द्या
आह्मां ऐशा बुडवुनि करिति दुज्या पूर्ण काय काम नद्य
युद्ध न हरिसख मांडी त्या सद्यःस्वर्गहेतुसत्रास[7] ॥
झाले सहस्रशःकृत-कृत्य, न झाले कृतार्थ सत्रास[8] ॥ ६६॥
कर्ण कृप द्रोण पुढ़ना धांवुनि पार्थासि एकदांचि तिघे।
झांकिति दिव्यास्त्रांनीं तैं तो पळभरि महाचळस्थिति[9] घे।
योजुनि इंद्रास्त्रातें पळवी सकळांसि तो महातेजा[10] ॥
भीतिल त्या रिपु न कसे भीती गगनस्थही[11] पहाते ज्या।
द्रोणाद्यखिल पळवितां भीष्म-प्रभु कार्मुकांसि[12] आकर्षी।
केतुस्थ[13]-वानराला तो ताडी खिन्न होय नारर्षी[14] ॥ ६९ ॥
नर तच्छस्त्रें[15] छेदी लाजे पूर्णेंदु पांडुरा[16] ज्यातें ॥
तत्सुतकृतनिज पूर्वज-लंघनही श्लाघ्य पांडुराजातें ॥ ७०॥

१ दशरथपुत्र रामचंद्र, याच्या गुणानें. २ पर्वत. ३ दैत्यरूपी पर्वत. ४ विमानांत. ५ रक्तनद्या. ६ पक्ष्यांच्या शब्दानें. ७ तत्काल स्वर्गप्राप्तीस कारण अशा यज्ञाला. ८ भयभीत. ९ मोठ्या पर्वताची स्थिरता. १० मोठा पराक्रम ज्याचा, तो. ११ देवादि. १२धनुष्याला.१३ध्वजावरील.१४ नारद. १५ भीष्माचीं शस्त्रें. १६ पांडुर, ज्यानें पांडुराजातें पूर्णेन्दु लाजेइ०असा अन्वय.

चित्तीं भीष्म ह्मणे " मज- वर कर शस्त्रास्त्र वृष्टि वत्सा हूं
आह्मी पुण्ययशोर्थे स्वशरीरीं दिव्यवृष्टिवत् साहूं"॥ ७१॥
नरहि ह्मणे "ज्यामि दिले स्वमुखांचे त्वां पितामहा ग्रास
तो हा तुशीं झगडतो होउनियां स्थापिता महावास" ७२
पांघुरविलें स्वयें प्रिय- पौत्राला शस्त्रवस्त्र शांतनवें ॥
तत्काळ योजिलें हो पहिलें होतांचि अस्त्र शांत नवें ७३ ॥
योजी आजावरि शर- पटल करुनि चाप मज्ज नातू तें ॥
पाहुनि कुलज कवि ह्मणति "हें परम श्लाघ्य सज्जना तूतें"
भीष्में विजयेंचि समचि शस्त्रपटल सबहुमान वारावें ॥
अमर-रवेंचि भरावें तें नभ बहु न बहुमानवारावें ॥ ७५ ॥
मानी वृद्ध प्रेक्षक ह्मणती "अपयश कधीं न यो जीना" ॥
तरुण ह्मणती " असोनी श्रीपाशुपतहि अधीन योजीना"
साधु प्रेक्षक सुर नर ह्मणति "भला साधु धन्य शांतनवा
तूं रविसा दीपकसा योद्धा,होताचि अन्य शांत नवा"७७
पार्थ प्रतिभट, गुरु कीं, जो होय निमित्त पूतना-मरणीं ॥
कीं तो प्रभु विजयप्रद ज्याचें मुनिवित्त पूत नाम रणीं ७८
निज कुलगुरुस्तुतीप्रति परिसुनि अभिमन्युचा पिता महती
तच्चापलता खंडी वर्णी धानुष्कतां पितामह ती ॥ ७९ ॥
पार्थमनीं साधावी जिंकुनियां कुरुपितामहा महिम्या ॥
ऐसाचि पात्र व्हावा सुरलोकीं गुरु पिता महामहिम्या ८०

१ महापापाला. २ नष्ट. ३ देवांच्या शब्दांनीं. ४ पुष्कळ मनुष्यांच्या शब्दांनीं. ५ अभिमानी. ६ वृद्धाला. ७ मृत. ८ मुनींचें द्रव्य. ९ पवित्र. १० धनुर्धरपणा.

केलें सज्ज धनु असें अतिसत्वर त्या समस्तयोधनुतें ॥
कीं दशशताक्षहि ह्मणे "तुटलें नाहींच काय हो धनु तें८१
वरकड चित्रचि झाले केवळ तें चित्रसे न ते, ज्यातें ॥
हरिहर मानुनि वर्णी हरिपासीं चित्रसेन तेजातें॥ ८२ ॥
देवी ह्मणति "न भ्यावें हो सावध हे सुरापगे सारे ॥
त्वत्सुत ज्यांच्या पक्षीं, खळ केवळ हे सुराप गे सारे॥८३॥
त्यांचा श्रम शमवाया बहु शीतळ मंद गंधवह वाहे ॥
शक्र स्वयेंहिं त्यावारि पुष्पें प्रेमाश्रुबिंदुसह वाहे ॥ ८४ ॥
सुरपुष्पवृष्टिला न स्पर्शूं देती तयां तदिषुवृष्टि ॥
कीं मधुपचुंबिता त्या पतिता त्यांच्या पडूं नये दृष्टि८५ ॥
खंडी धनुष्य, द्याया निजनिपुणत्वें प्रमोद पुनरपि त्या ॥
स्वगुणोत्कर्षे पूर्वज जिंकुनियां सुखविती, न कुनर पित्या
तुटले, कीं न अशा या घाली जो संशयांत देव पुन्हा ॥
तों पार्थ ह्मणे"आर्या स्वांबास्रें शुद्ध होउंदे वपु, न्हा८७
साहुनि पितामहाचे त्याच्या पार्श्वीच तो असुख-रचिते ॥
हाणी सत्वर खर शर दश, अमरांचेहि ते असु खरचिते॥
त्या खर-शर-प्रहारें जों पावे मोह आपगेय महा ॥
देवी गंगेसि ह्मणति, "नातु न हा,बाइ आपगेय मह हा"८९

१ सर्व वीरांनीं स्तविलेल्या भीष्मानें. २ इंद्रही. ३ हे गंगे. ४ हेतत्वरूपिणी. ५ मद्यपान करणारे. ६ वायु. ७ त्यांच्या बाण-वृष्टि. ८ मद्यपीजनांनीं- पक्षीं, भ्रमरांनीं, चुंबिलेल्या. ९ भ्रष्ट झालेल्या, पक्षीं- पडलेल्या. १० स्वमातेच्या अश्रूंनीं. ११ गंगान-दीचा पुत्र, भीष्म.

कुरु ह्मणति हाय हाय न व्हावा हा हरिचियांहि हत हातें
त्या प्राकृतांसि युक्तचि गीर्वाणालांहि ह्मणवि बत हा तें
दुःखदहि सुखद ह्मणती" कपि नारद रामराम शिवशिव तें
यद्ध्वनि पतिता जीवा, बापा मुळसें,वळेंचि शिव शिव तें
पडतां मूर्च्छित नेला • माघारा भीष्म जाणत्या मतें ॥
ईशप्रहिता देइल दुःख न ज्या दिव्य बाण त्या मृ तें ॥

# अध्याय ६ वा.



## सारांश.

कर्णकृपद्रोणादिकांचा अर्जुनानें पराभव केल्यावर दुर्योधन स्वतः सैन्यासह अर्जुनावर गेला. विकर्णही त्याच्या साह्यास गेला. अर्जुनानें दोघांचाही पराभव केला. तेव्हां ते पळून गेले. याप्रमाणें सर्व कौरववीरांचा पराभव केल्यावर अर्जुनानें आपला पूर्वींचा वेष धारण केला. "कौरवांचा पराभव अर्जुनानें केला" असें राजाला कळूं नको, मी स्वतः कौरवांचा पराभव केला" असें राजाला कळीव असें उत्तराला सांगून, त्याला घेऊन तो नगरांत आला. उत्तर नगरांत येण्यापूर्वींच दूतांनीं जयाचें वृत्त राजाला कळविलें, तें ऐकून राजास मोठा आनंद झाला. त्यानें नगरांत

---

१ इंद्राच्याही. २ देवांनांही. ३ हाय हाय. ४ श्रीरामनामध्वनि कल्याण. ६ ईश्वरानें पाठविलेली, ७मुई.

मोठा उत्साह करविला. मोठ्या आनंदानें विराटराजा कंकासह द्यूत खेळत असतां, कंक ह्मणाला,बृहन्नडा सारथि असल्यामुळेंच उत्तर विजयी झाला. बृहन्नडेची स्तुति केल्यामुळें विराटास राग येऊन त्यानें कंकाच्या नाकावर फांसा मारिला. तेव्हां नाकांतून रक्त वाहूं लागलें. तें रक्त भूमीवर पडलें असतां राष्ट्र जळून भस्म होईल, याकरितां कंकाच्या सूचनेवरून सैरंध्रीनें तें रक्त ताटामध्यें धरिलें. त्याच वेळीं उत्तर आला असें द्वारपाळांनीं राजास कळविलें, त्यांस कंक हळूच ह्मणाला बृहन्नडा क्षणभर बाहिर असों दे. तिनें ही माझी दशा पाहिली असतां आतांच अनर्थ करील. मग उत्तर राजसभेंत आल्यावर त्यानें पित्यास नमस्कार केला. व सभेच्या एका कोणांत कंकास पाहून, ह्याची अशी दशा कोणीं केली ह्मणून विचारिलें. विराटानें, हें माझेंच कृत्य असें त्यास सांगितलें. तेव्हां उत्तर ह्मणाला ब्रह्मक्षोभानें नाश होईल. ह्याचे पाय धरून क्षमा मागावी. विराटानें कंकाचे पाय धरून त्याची क्षमा मागीतली. मग उत्तर ह्मणाला, मी कौरवसैन्य पाहून घाबरून पळत होतों; इतक्यांत कोणी देवपुत्र येऊन त्यानें मला सारथ्य देऊन आपण स्वतः कौरवांचा पराभव केला. तो देवपुत्र तुह्मांला उद्यां किंवा परवां भेटेल.

झाले कर्णकृपगुरु- प्रभृति महावीर भंग नउ ठावे ॥
स्वबलसहित कुरुपं उठे जरि शिक ह्मणे कदापि न उठावें१ ॥
हाणीं भल्लं ललाटीं त्यासि ह्मणे पार्थ हाण चवताळ ॥

---

१ दुर्योधन. २ लोहमय बाण.

धृष्टां दुष्टा भ्रष्टा तुझिया वृत्ती नसेचि चव ताळ ॥ २ ॥
हांसे तो भटतल्लज भल्लज पीडा न तल्लटांत ॥
हेतींत पोहणारा सिंधूच्या जेंवि भल्ल लाटांत ॥ ३ ॥
होय कुरुप नरशरपरि- वृत दववृतं जेंवि कुंज रानीं कीं ॥
शिरला शरगणपंचांऽ- नन त्या कुरुकटककुंजराऽनीकीं ४॥
धांवे विकर्ण सत्वर कीं तो निष्फळ असो नरायास ॥
प्राणव्यसनीं सोडिल 'केंवि भ्राता असोन रायास॥ ५ ॥
नर शर त्यावरि सोडी वधिती तत्काळ तन्महेभा ते ॥
प्रेमें ह्मणे पुजावे म्यां धनुसह बहुत जन्म हे भाते ॥ ६ ॥
खळ तत्सहायभंगाचि निज सद्व्रत हें मनांत आणून ॥
प्रथम विकर्ण पळविला मग नृप तदुरांत बाण हाणून ॥७ ॥
मिळतां त्रिवर्ग सद्यश सज्जन भेदील कां न नीचोर ॥
जो खळ सर्वस्व हरी धर्माचें, जेंवि काननीं चोर॥ ८ ॥
कुरुप ह्मणे "बा सूता दे मज असुदान, हाक हाक हरी ॥
प्राकृत न ह्मणतिल कसे कां खवळविला नहांक हा कहरी ९
पळतां सुयोधनातें पार्थ ह्मणे " करुनि वाहुशब्द अरे ॥
कोठें जाशिल? नाशिल तुज दहना,मद्धनुष्य-अब्द अरे१०

१ दांडग्या. २ प्रशस्तवीर. ३ शस्त्रांत. ४ अर्जुनबाणांनीं आच्छादित. ५ वणव्यानें व्यापलेलें. ६ बाणसमूह हाच सिंह. ७ कौरवसैन्य हेंच गजसैन्य त्यांत. ८ अर्जुनाचा प्रयत्न. ९ त्याच्या महागजाला. १० त्याच्या साह्याचा नाश. ११ धर्मार्थकाममोक्ष, १२ नीचाचें हृदय. १३ घोडे. १४ वृथा. १५ कहर करणारा. १६ माझें धनुष्य हाच मेघ. १७ हे शत्रो.

वृद्धांधगुरुमिथुनें[1] हो बहु धन्य, परंतु पापरतेरेतें[2] ॥
न मळो, झाला असती ज्या शुद्धकुळीं अपांपरत[3] रे तें ११
केले होते कीं त्वां गुरुपासीं क्षात्रधर्म मुखपाठ ॥
देती वृद्धचि उष्णा कीं दहना न्हावयासि सुख पाठ ॥ २२ ॥
कांपसि भयें रणसमय हेमंतसमय नव्हे तुझी आण ॥
मी सत्य धनंजय[4], परि पार्थ, नव्हें असितपर्थ[5] खरें जाण ॥
ह्मणतां पुण्ययशःसुख- हेतु[6] स्वदानें[7] कां नको राहो ॥
ऐका निज मतिचें अभि- मानमलनिरुद्ध[8] कान कौरा हो ॥
स्वर्गति[9] कपिलादानेंचि[10] घे बहुहित हेंचि तुज सुपात्रास ॥
असु वसुंचि[11] मानले परि याला बहु काळदस्युचा[12] त्रास ॥
यशचि यशोभिरता[13] बहु- मत नामचि एक जेंवि नामरता ॥
अपयशचि कुजन सेवी जाणुनिही पथ्य जेविना मरता ॥
मान विसरलां कीं तो सरला रुसलां अहो सुयोधन हो ॥
प्राणरहित हो परि पळ- भरि माणरहित कधीं सुयोध नहो
जसि कीर्ति सदा हरिस, न तसि आवडली नवी मरा नवरी ॥
स्वांतः पुरांतही[14] जो गतकीर्ति[15] करी न वीर मान वरी ॥
इत्यादि नर वदे जें झालें त्या कुंजरासि अंकुश ते ॥

---

१ वृद्ध आणि अंध असें गुरूचें ( पितरांचें ) द्वंद्व ह्म० धृतराष्ट्र गान्धारी. २ पापाच्या ठायीं रत झालेल्या वीर्यानें. ३ हे आपा-बाबा. ४ अग्नि, पक्षीं- अर्जुन. ५ अग्नि. ६ पुण्य व यश ह्यांस कारण. ७ स्वर्गदान. ८ अभिमानरूप मळानें बंद झालेले. ९ स्वर्गप्राप्ति. १० गोदानच. ११ द्रव्य. १२ कालरूपी चोराचा. १३ यशाचे ठायीं रमणाराला. १४ आमल्या अंतपुरांत. १५ ज्याची कीर्ति गेली, तो.

खलत्हृदय साधुवचनें दुखवे न सुतप्त-लोहशंकुशतें ॥ १९ ॥
परेत पर पार्थावरि पदपीडित- पुच्छभाग-तक्षकसा ॥
न उगारेल गरुडसा त्यावरि तो दुष्टनाशदक्ष कसा ॥२०॥
तेव्हां नृप रक्षाया सावध होता नदीज सामागें ॥
कर्णीहि वामपार्श्वी रक्षियला निधि जसा महा-नागें ॥२१॥
त्याच्या दक्षिणपार्श्वी अश्वत्थामा, पुढें कृप द्रोण ॥
दुःशासनादि बहु खळ होते आयीत योजितो कोण ॥२२॥
ते लागले समस्तहि शस्त्रांहीं एकदांचि वर्षाया ॥
हांसत ह्मणे "धनंजय याहो या एकदांचि वर्षा या ॥२३॥
जै स्वरथाही न शिवों एकाही आशुगां न दे वर्षे ॥
शक्र ह्मणे "कर हरिहर- विजयांचें आशु गान दे वर्षे"॥२४॥
साधु ह्मणति हा होय द्रोणप्रियशिष्य होय हरदास ॥
होय अजितसख ह्मणतिल " घन गुरुजी याशर-मकर-दास
प्रथम परास्त्रें वारी द्रुत मग संमोहनास्त्र नर योजी ॥
चित्तांत ह्मणे "गुरुजी रणिं बाणासुरसहाय हर यो" जी॥२६
संमोहनास्त्र, चाप- प्रवर, मोहांस देवदत्त दर ॥
मोहिति परां, नर जसा होय, जसा वामदेव दत्तदर ॥ २७॥

१ अतितप्त झालेल्या शेंकडों शंकूंनीं. २ शत्रु. ३ पायानें दुखविला पुच्छभाग ज्याचा, अशा तक्षकासारखा. ४ दुष्टाच्या नाशाविषयीं समर्थ. ५ डाव्या बाजूला. ६ द्रव्याचा ठेवा. ७ महासर्पानें. ८ उजव्या बाजूला. ९ सज्जनांत. १० बाणाला. ११ विष्णु व शंकर यांच्या यशांचें. १२ हे नागदा. १३ शरसमुदाय देणाराला. १४ शत्रूंचीं अस्त्रें. १५ त्वरित. १६ बाणासुराला मदत करणारा. १७ येवो. १८ अतिगंभीर. १९ शंकर.

पार्थ ह्मणे "भगिनीचें स्मर उत्तर[1], उत्तरा उतर, वास[2] ॥
घे कर्णाचें, भ्रमले धनुच्या परिसोनि राउत[3] रवास[4] ॥२८॥
डसला मोहाहि[5] समुत- गुरुस, मग न कां सुयोधना चावे ॥
एक कबंध[6]चि सक्रिय[7] हे हर्षाया सुयोध नाचावे ॥ २९॥
जा, न हसावें, न तुवां भ्यावें, घेतां हरूनि वास कृपा ॥
घे सद्गुरुप्रसादाहि नत न लुटिति काय गा शिवा[8] सकृपा ॥
गुरुसुत[9]सुयोधनांचीं नीळें[10] भरितें सदा नव सुवासें[11] ॥
ध्यावीं त्या काय उणें कितिकां देती न दान वसुवासें[12]॥३१
भ्रमला नसे महात्मा आहे याहुनिहि शांतनव[13] साजो ॥
शिवसा पावत आला व्हाया व्यसन[14] प्रशांत नवसा जो३२
हरवी वाळाकरवीं त्या पांचांचीं[15]हि कीर्तिसह वासें ॥
बुडत्येच संत[16]हितांच्या बहु थोरांचीहि कीर्ति सहवासें[17]॥ ३३
भीष्माची परम-सुखा विजयि-हरिजना[18] पहात पावे धी[19] ॥
मग मुराडितांचि रथ तो इषुंनीं[20] त्यातें महांतपा[21] वेधी ॥३४॥
पार्थहि त्याच्या वेधी सोडुनि शीघ्र क्षुरप्र[22] वाहातें[23] ॥
तत्सूताचेंहि धरी विजय[24]विशिख-हत उर प्रवाहातें ॥ ३५॥

---

१ वचन. २ वस्त्र. ३ स्वार. ४ध्वनीला. ५ मोहसर्प. ६ शिरोरहित शरीर. ७ व्यापारयुक्त. ८ शंकराला. ९ अश्वत्थामा व दुर्योधन याचीं. १० भरलेलीं. ११ सुगंधानें. १२ द्रव्य आणि वस्त्र १३ श्रीभीष्म. १४ संकट. १५ कर्ण, द्रोण, अश्वत्थामा, दुर्योधन व कृप यांचीं. १६ सज्जनशत्रूंच्या. १७ संगतीनें. १८ यशस्वी झालेल्या कृष्णभक्ताला. १९ बुद्धि. २०बाणांनीं. २१ उग्रतप ज्यानें' तोभीष्म. २२ बाण. २३ घोड्यांना. २४ अर्जुनाच्या बाणांनीं ताडिलेलें.

कुरुकटकांतूनि निघे रथ घन-पटलामधूनि जेंवि रवी ॥
हरिजन-तेज न वद्वे षडरींसहि अरि वधूनि जें विरंवी ३६
हरिजन हरिसे स्तुत्य स्वरिपूंसहि, पार्थ सुगति दे वधुनी ॥
आहे याचीहि सदा- चरणप्रभवा सुकीर्तिदेवधुनी॥३७ ॥
हे तों एक प्रभु, नर- नारायण, यांत भेद न गमो जी ॥
त्यांच्या गुणापुढें न त्रिदशांचा आपणासि नग मोजी ३८
भूप ह्मणे "ज्या एकें .केले बहु हे असे परासु भट ॥
तो सोडिला कसा हो, सोडिति जीवा,न परि परा,सुभट४०
हांसोनि नदीज ह्मणे हा-काळवारि त्वदीय शक्ति-मती ॥
कोठें गेल्या होत्या चापलतेसह भुजाहि शक्तिमती॥ ४०
पार्थ बहु भला, तुमच्या तो आजि अपार्थ कापिता माना॥
या अभयदा न व्हाया नरजाति अपार्थका पिता माना४१
बा न द्रवे अधार्मिक, सर्वहि ये, परि न ये नटा कविता॥
अस्मद्वधार्थ धृत असि याकरवीं काळही न टाकविता४२
जे काय दुरभिमानी श्रमती जोडूनि अघ नर सदा ते ॥
भूपा असदुपदेशद मरुपथिका जेंवि अघनरसदाते ॥४३॥
जाऊ गोधन, योध न वेचावे, तूं पुरासि चाल क्रमा ॥

१ विरघाकून टाकी. २ सदाचारापासून उत्पन्न झालेली. ३ सुकीर्ति हीच गंगा. ४ (कल्प) वृक्ष. ५ दुर्योधन. ६ मृत. ७ सामर्थ्य व बुद्धि. ८ शक्तिसंपन्न. ९ अप-अर्थ ह्म० व्यर्थ. १० अभय देणाराला. ११ मनुष्यजाति. १२ निरर्थक- नरजाति अपार्थका न व्हाया, या अभयदा, पिता माना. हा अन्वय. १३ आमच्या वधाकरितां. १४ वाईट उपदेश करणारे. १५ निर्जलप्रदेशांतील प्रवाशांना. १६ अ-घनरस-दाते ह्म० पाण्यावांचून इतर वस्तु देणारे.

दे कर्णकृपद्रोणां रथ, मजही, आतुरासि चालकेसा ॥४४॥
भूपाचे उपदेशीं मग होतां गर्व शांत, न वच रणा ॥
वदला, विहित हित ह्मणुनि नमिति मनें सर्व शांतनवचरणा॥
परतों लागे जेव्हां कुरुबळ सोडूनि दुरुप दीनमनें ॥
विजय करी पाडुनि शर भीष्मद्रोणादि-गुरुपदीं नमनें॥४६
मग कुरुपतिचा भेदुनि मुकुट विखरिला धुळींत मणिगणे कीं
भीमीं भक्ति, बहु दया त्याही तज्जन्मपत्रकरगणकीं॥४७
करि कृष्णसख कुपतिची कुदशा केवळ तथापि.कुं रुसेना॥
परते गरुड त्यक्ता जैसी नागी तसीच कुरुसेना ॥ ४८ ॥
पर ते प्रथम परतले मग नगभित्तनुज वीर तो परते ॥
नरतेज किति तया,ज्या स्मरतां सुर असुर युवतिसीं न रते
प्रभु सुरदत्त-दरातें वाजवि परिसोनि तद्रवा हगती ॥
मुतती भयें विसरती त्या कुरुकटकांत भद्रवाहगती ॥५०॥
तो अभयदेश जातां मत्स्यपुरा करुनि अभय देश-पथें ॥
जे भग्न-भीत शरणा- गत कुरुभट त्यांसि अभय दे शपथें॥

---

१ पीडिताला, २ चालविणारा असा. ४ भीष्मपदाला उमेद. ५ मणींचा समूह. ६ त्या दुर्योधनाची पत्रिका करणाऱ्या ज्योतिष्यावर. भीमानें केलेली दुर्योधनवधाची प्रतिज्ञा व ज्योतिष्याचें घटित हीं व्यर्थ नव्हावीं ह्मणून अर्जुनानें दुर्योधनाचा वध केला नाहीं, असा भाव. ७ भूपतीची. ८ पृथ्वी. ९ नगभित्-पर्वत तोडणारा इंद्र, त्याचा तनुज अर्जुन. १० देवदत्तशंखाला. ११ कल्याणकारक्रमार्ग. १२ अभयदात्यामध्यें श्रेष्ठ.

हरुनि यशोधन गोधन योध अगणित क्षयासि नेवून ॥
त्या नृपपुत्रासि ह्मणे चाल पुरा हें मनींच ठेवून ॥ ५२ ॥
यद्यपि सत्य वदावें निजगुरुपासीं, तथापि त्यासम जो ॥
तुज बहुमत धर्म प्रभु, तदनुमतें ही कथा पिता समजो॥५३॥
ह्मण कुरुमर्दन गोधन- मोचन इत्यादि कर्म हें माजें ॥
अनृतहि हित, साधूच्यां रक्षी प्रेमा, तसेंचि हेमा जें॥ ५४॥
"साजेल कसा तुमच्या. आंगींचा मज मुलास पेरावा ॥
लज्जाफलार्थ कैसा गुरुकर्णीं अनृत शब्द पेरावा ॥ ५५ ॥
आहे प्रसादकामुक आज्ञा मोडील हा कसा दास ॥
ह्मणतां तसें ह्मणेलचि जडकंदरें देचि हाक सादास"॥५६॥
जय-कथन करिति जाउनि नृपपुत्रप्रहित दूत नगरातें ॥
बाळासहि न गिळोंदे वदनींचा मधुर नूतन गरा तें ॥५७॥
तीं स्वायुधें शमीवरि ठेववितां, राघवा वृषाकपिला ॥
स्मरुनि कपि उडे,विजय- श्री ज्यासि भजे,जसी वृषा कपिला
गेला गगनपथें ध्वज जो निज-तेजें ह्मणे उभा रविला ॥
पहिला सिंहांक ध्वज पार्थें त्या स्यंदनीं उभारविला॥५९॥
झांकी वपुला, क्षतजें वमतां वमा अरीषु, न्हाल्याला ॥
झाला सारथि पहिला, योषावेषासि तो पुन्हा ल्याला॥ ६०
वैराटि रथी केला सत्प्रेम वहु श्रितीं, न बहु लेंकीं ॥

१ गुरूसमान. २ स्वर्णादिद्रव्याला. ३ पोषाख. ४ लज्जारूप-फलप्राप्तीकरितां, ५कृपा इच्छिणारा. ६गुहा. ७ शब्दाला. ८ राज-पुत्रानें पाठविले. ९गरा-फणसाचा. १० रामचंद्राला. ११ शंकराला •१२ बैलाला. १३ गाय. १४ रक्तानें. १५ शत्रूंचे बाण. १६ याचा" वपुला,, याकडे संबंध. १८ स्त्रीवेषाला. १७ आश्रितावर.

व्रीडा[1] महत्त्व त्यातें,[2] विजयें[3] जयश्रीविवाहबहुलें[4] कीं ॥६१॥
विजयी विराट इकडे ये, पूजिति पौर विप्रजन यातें ॥
येतांचि सभेंत पुसे प्रेमें त्या उत्तरा स्वतनयातें ॥ ६२ ॥
जन कथिति "धेनु कुरुनीं वळिल्या, येंवूनि उत्तराशेला[5]॥
त्वत्कीर्तिनें पसरिला स्वपरित्राणार्थ उत्तरा शेला ॥६३ ॥
गेला कुरु जिंकाया, आहे सारथि बृहन्नडा, गमला ॥
सत्य कुमारांघि,[6] वदला लागो अपकीर्तिचा न डाग मला६४
भूप ह्मणे "कुरु होतिल वारे, करितील आजि अभ्रें[7] मुला॥
दुःख सुदेष्णेला जें, शिरतां सिंहांत कलभें[8] अभ्रमुला[9]॥६५॥
अक्षत असाल ते जा, मेळविलें काल आर्यहो यश तें ॥
लघु, गुरु हें घ्या, धीरां वीरांच्या सिद्ध कार्य होय शतें॥६६॥
हांसुनि धर्म ह्मणे "हो विजयि-सुतातें पहाल नयनांहीं ॥
आहे बृहन्नडा जरि सारथि, तरि गोधनांसि भय नांहीं ॥६७॥
सारथि बृहन्नडा जरि उत्तर मांसें भरील तरि भूतें ॥
परिभूतें[10] होतीलचि तन्मंत्रें करुनि आजि अरि-भूतें ६८॥
घालिल बृहन्नडा, जसि देवी घाली, नरांऽमर[11] क्षेमीं[12] ॥
वांद्री[13] ह्मणे न उरविन बाधा, घालीन रामरक्षे मीं ॥ ६९ ॥

१ लज्जा. २ अर्जुनाला. ३ अर्जुन. ४ यशोलक्ष्मीच्या विवाहाचें बहुलें असा. ज्या अर्जुनाच्या साह्यानें जयश्री मिळणार त्याला सारथिवेष घेऊन लज्जा धरणें हें महत्त्व झालें, असा भाव. ५ उत्तर दिशेला. ६ कार्तिकस्वामी. ७ मेघ. ८ छावा. ९ ऐरावताच्या स्त्रीला. १० पराभव पावलेलीं. ११ मनुष्य व देव. १२ सुखांत १३ मुद्र.

ऐसें धर्म वदे तों करिती येउनि सभेंत दूत नती ॥
कथिती विजयकथा जी देणारी हर्ष नित्य नूतन ती ॥७०
"देवा कुमार आला, सोडविल्या धेनु, पळविलीं कटकें ॥
न वयःप्रमाण तेज- स्विजनीं ह्मणती कवी न तें लटकें"७१
धर्म ह्मणे "आयकिलें दूतांचें वचन चांगलें कानें ॥
राया सुख-रोमांचित केलें कीं आजि अंग लेंकानें ॥ ७२॥
सारथि बृहन्नडा ज्या तद्विजयें करुत वायका नवला ॥
चिंतामणिगल बालक जो,दुर्लभ त्यासि काय कानवला७३
दूतांतें सुखवुनि नृप सचिवांसि ह्मणे गुढ्या उभारा हो ॥
पुर शोभवा पुढें जा राजपथीं विप्रजन उभा राहो ॥७४ ॥
गाजत वाजत साजत आज तया जतन करुनि आणा हो
जर्ममांगें मत्स्यांचा हा रिपुशशि-राहु-बाहु राणा हो" ७५
यापरि वदोनि हर्षें सामोरे सर्व लोक पाठवुनी ॥
आजि करावी अक्ष- क्रीडा ऐसें मनांत आठवुनी ॥७६ ॥
सर्वस्व समर्पी या धर्मासि ब्राह्मणासि बाणकर्में ॥
नृप कृष्णेसि ह्मणे "मे सैरंध्रि मदक्षपात्र आण कमें" ७७
धर्मासि "ह्मणे हूं या मांडा उकलूनि रम्य तळ पट हो"॥
कृष्णाहि ह्मणे "मेल्या अक्षकराचें समूळ तळपट हो" ७८

---

१ पराक्रमी जनांमध्यें. २ चिंतामणि गळ्यांत ज्याच्या, तो. ३ मत्स्यदेशांचा. ४ शत्रुरूपचंद्राला राहुभुजासारखा. ५ बाणासारखें. ६ माझा सोंगट्यांचा पट. ७ फांसे करणारांचें.

द्यूत करूं या, ह्मणतां धर्म ह्मणे "आवरूनि धी राहें ॥
व्यसनावर्ती[1] पाडिल न निघों दे सावरूनि धीरा हें ॥ ९ ॥
हें काम-कोप-लोभ- प्रमुख-महानर्थ-कोटिचें वतन ॥
वं[2]त न ह्मणे कवण कितव[3] धर्महि दुःखांत पावला पतन ८०
धर्मानळाहि देवन[4] दे वनवास प्रसिद्ध उत्साहें ॥
हूं न ह्मणवे विराटा निर्मोल प्राणहानि कुत्सा हें ८१
अक्षांसह टाकूनि श्री-ह्री धी कीर्तिही कितव देतो
आग्रह तरी प्रवर्तो[5] द्यूत, नृपा जो सखा हित वदे तो" ८२
द्यूत प्रवर्तता[6] तो भूप ह्मणे "ऐकिलोंसि कंकातें
कुरु जिंकिले कुमारें वय तरि अद्यापि उचित अंकीं तें" ८३
धर्म ह्मणे "हे कौरव किति, सूत बृहन्नडा कुमारा ज्या
समरीं अमरींच्याही[7] तो भय देईल कुंकुमा राजा" ८४
मत्स्य ह्मणे "रे कंका शंका सोडूनि बोलसी भलतें
क्लीबासि मत्सुताधिक ह्मणसी हें वचन मन्मनीं सलतें ८५ ॥
कंका रंका सद्यो- जातहि[8] हरि भंगितो करिघटातें[9] ॥
ब्रह्मांडाधिकाहि घटज[10] सेवुनियां सागरा करि घटातें ॥ ८६ ॥
विप्राधमा जरि मनीं वांचावें हें असेल, हो मूक ॥
न पुन्हा असें वद, सखा ह्मणवुनि ह्मणतों न जीविता मूक" ८७
धर्म ह्मणे "जिंकाया शक्त न भीष्मादिकां नगारीती[11] ॥

---

१ संकटाच्या फेऱ्यांत. २ हायहाय. ३ जुगारी. ४ द्यूत. ५ चालूं दे. ६ मांडिला. ७ देवांगनांच्याही. ८ नुकता जन्मलेला. ९ गजसमूहाला. १० अगस्ति. ११ इंद्र.

कुरुगुरुपुढें विरे पर- शक्ति, नृपा होय कां न गारा ती ॥ ८८ ॥
त्यावरि बृहन्नडाचि प्रौढा, जसि दानवावरि भवानी ॥
गावें या दोघींचें यश भूपा आदरें हरिभवानीं ॥ ८९ ॥
कुरु-गुरुसवें झगडतां त्या सुरगुरुचेंहि ओंठ करपावे ॥
विंध्यस्कंधगशिशुचा .कां विधुच्या मंडळा न कर पावे'' ९०
ऐसें सत्य वदे जों तों घाली माळ अक्षमा राया ॥
शिकवी युधिष्ठिराच्या भाळीं पाणिस्थ अक्ष माराया ९१ ॥
अक्षप्रहार होतां वाहों लागे असृद्ध नाकानें ॥
तें स्वांजळींत धरिलें त्या शांतिक्षांतिविजितनाकानें ॥ ९२
धर्माऽभिप्रायज्ञा कृष्णा ताटांत तें धरी रगत ॥
पति-त्द्दत साध्वीनें, नाडीनें जाणिजे शरीर गत ॥ ९३ ॥
तों तो उत्तर आला द्वारस्थांनीं नृपासि जाणविला ॥
तेणें अत्युत्कंठित होउनि भेटावयासि आणविला ॥ ९४ ॥
तेव्हां कंक हळूच क्षत्त्यासि म्हणे ''बृहन्नडा राहो ॥
पाहो न हें सभेंत न तत्क्षोभें रक्त नृपतिचें वाहो ॥ ९५ ॥
रण नमतां मद्देहीं जो क्षत कीं क्षत-ज-लेश काढील ॥
तो तत्काळ वधावा जरि त्याला अमृत शक्र वाढील ॥ ९६
ही सत्य तत्प्रतिज्ञा, या राजाचें म्हणोनि हो हित रे ॥

---

१ विष्णु व शंकर यांनीं. २ बृहस्पतीचे. ३ विंध्यपर्वताचे खांद्यावर चढलेला. ४ असहनशीलता. ५ हातांतील. ६ रक्त ७ समाधान व सहिष्णुत्व यांनीं जिंकिला स्वर्ग ज्यानें अशा धर्मानें ८ द्वारपालाला. ९ रक्तबिंदु.

मारील विराटातें  हें माझें देखतांचि लोहितें[1] रे ''॥ ९७ ॥
क्षत्त्यानें गुंतवितां  जरि सक्षत तरि निराकुल[2]-क्षणसा ॥
राहे बाहेर प्रभु  परम सु-लक्षणहि तो कु-लक्षणसा ॥ ९८ ॥
उत्तर पित्यासि वंदुनि  पाहे कंकासि तो सभाकोणीं ॥
तातासि पुसे ''ऐसा  केला अन्याय हा महा कोणी''॥९९ ॥
भूप ह्मणे ''पुत्रा म्यां  केला स्वकरेंचि दंड या कंका ॥
कीं हा करी प्रशंसा  षंढाची, नच धरी मनीं शंका'' ॥ १००
उत्तर ह्मणे ''अहाहा  केला अन्याय हा, धरा पाय ॥
ब्रह्मक्षोभ स्वर्गा[3]-पायहि केवळ नव्हे धरा[4]ऽपाय'' ॥ १०१ ॥
नमुनि विराट ह्मणे ''बा  कंका चुकलों महायशा पावें ॥
न मला सख्या तुवां या  मदर्था[5] घेउनि सहाय शापावें ''॥१०२
कंक ह्मणे ''सोड चरण  मज सोसावें असें जरि न कळतें ॥
गळतें रक्त महीवरि  तरि हें त्वद्राष्ट्र तत्क्षणीं जळतें'' १०३ ॥
शमतां शोणित-धारा  संपादी धर्मराज तो शुचिता ॥
तों ये बृहन्नडा मग  दावी जी रीति आपणा उचिता ॥ १०४ ॥
राजा ह्मणे ''कुमारा  या वृत्तें लाज या कुमारा[6] हो ॥
निंदुनि इंदुनिभ[7]-यशा  क्षण मौनव्रतपरा[8] उमा राहो ॥ १०५ ॥

---

१ रक्त. २ पीडारहित क्षण ह्म० आनंद ज्याचा, असा ३ स्वर्गप्राप्तीची हानि करणारा. ४ पृथ्वीचा नाश करणारा. ५ माझ्या अपराधाला. ६ कार्तिकस्वामीला. ७ चंद्राप्रमाणें शुभ्र यश ज्याचें, त्या कुमाराला ८ मुक्याच्या व्रतामध्यें गढलेली.

त्वां जिंकिला कसा तो अश्वत्थामा तमाचि तो कर्ण ॥
तोहि द्रोण महात्मा दिव्यधनुर्वेदशंभुगोकर्ण ॥ १०६ ॥
केला कसा कृपाचा भंग कसा पळविला सुयोधन गा ॥
कैसा भीष्मप्रमुखा स्वभुज अशनि कळविला सुयोधनगा'' १०
उत्तर ह्मणे "पित्या कुरु पाहुनि झालों भयाकुळ, पळालों ॥७
सिंह प्रेक्षुनि यूथ- भ्रष्ट कलभसाच मी बहु गळालों ॥ १०८॥
मरणेच्छु निर्धनातें दाता सोडूनि सुजळ दे वसुतें ॥
जैसें यश तैसें हें केलें मद्वचन उज्वळ देवसुतें ॥ १०९ ॥
मज सारथि करुनि रथी झाला विद्या प्रकामं रुद्रा ज्या ॥
ठाव्या त्या देवसुता बहुमत तो त्र्यंबका मरुद्राजा ॥११०॥
दिव्यदराच्या नादें निर्मुनि त्या कुरुवळांत आधीतें ॥
हरिलें होतें गो-धन जें मोडविलें पळांत आधीं तें ११ १॥
आधीं कर्ण पळविला मग केला विरथ तो कृपाहि राया ॥
शकला न एकही त्या देवसुताच्या यशा नृप हिराया॥ ११२
अरिमेनेसि न वरतें पाहूं दे जेंवि साधु कुल्टतें ॥
काय वदूं गुरु गुरुसुत जिंकुनि भीष्मावरींहि उलटे तें ॥.
श्रीमद्भीष्मासहि तो निजशस्त्राऽस्त्रप्रवीणता कळवी ॥
पळवी सुयोधनातें सामकट तदाश्रितानें मळवी ॥११४॥

१ दिव्य असा धनुर्वेद हाच शंकर, त्याला गोकर्णक्षेत्र होणारा. २ उत्तम योद्धे हेच पर्वत, त्यांस. ३ कळपांतून चुक-लेला. ४ दारिद्र्यामुळें मरण इच्छिणारा. ५ यथेच्छ. ६ इन्द्राला. ७ त्याच्या आश्रितांचीं मुखें'

संमोहनाऽस्त्र योजुनि सर्वांसहि देवपुत्र मग मोही ॥
हरिहरलीलेहून न्यूना लीला तुम्हांसि न गमो ही" ॥१५॥
मत्स्य म्हणे "तद्दर्शन तुज घडलें तें मलाचि कां नाहीं ॥
नेत्रें बहु तळमळती लाभ मिळविला भलाचि कानाहीं॥
सर्वस्वें पूजाया तो आम्हां मायबापसा मान्य ॥
लीलेनें हरिला जरि तेणें हा ताप काय सामान्य ॥१७॥
सांग कसें तुज दिसतें तो मज दावील काय पाय सखा॥
याहुनि उणाचि दुकळीं म्हणतो "हो कायपुष्ट, पायस खा"
उत्तर म्हणे "उद्यां कीं परवां भेटेल तो असें वाटे ॥
जळ कारुण्यहि विनतोऽ नुगतचि सोडील तें कसें वाटे ॥
समजावेंचि परि न त्या यमधर्मवरेंचि तत्व तें समजे ॥
सज्ज्ञांनीं सत्करुणे वांचुनि मतिचे न चालती गमजे॥२०॥
राजाऽज्ञेनें वस्त्रें कुरुवीरांचीं बृहन्नडा उचली ॥
म्यां उत्तरेसचि न तीं भेटे बहुत सुकविमतिसही रुचली
कन्येसि असीं वस्त्रें ओपी निर्मावियासि बाहलि हा ॥
श्रोते हो हृत्फलकीं प्रेमें श्रितकल्पवृक्षबाहु लिहा ॥ १२
शोभा सोडुनि होता शुद्ध वसंतीं करीरसा पार्थ ॥
मग मंत्रातें न्हाया उद्धव संतीं करी रसापार्थ ॥ १२३ ॥

१ ह्मणणारा. २ शरीरानें पुष्ट. ३ भूमीचा उतरता प्रदेश किंवा नम्रजन, त्यांस अनुकूल. ४ हृदयपटावर. ५ आश्रितांस कल्पवृक्षच असा बाहु. ६ नेत्तीच्या वृक्षासारखा. ७रसाप' भूपति, त्याकरितां..

मन्त्र नृपसुतासी कीं हाहि उद्यांचाहि तो दिवस जावा ॥
परवां बैसोनि पदीं धर्म प्रभु ध्यावया शिव सजावा २४

## उत्तरगोग्रहण समाप्त



# अध्याय ७ वा.



### सारांश.

भगवान् अच्युत जो श्रीकृष्ण त्याच्या पदकमलाचें चिन्तन करून धर्मराज आपल्या बंधूंसह आपला पूर्वीचा वेष घेऊन विराटाच्या सभेंत येऊन सिंहासनावर बसला. विराटानें तें पाहिल्यावर त्यास राग आला. तेव्हां अर्जुनानें सांगितलें, कीं इंद्रपदावर बसण्यास देखील योग्य असा हा पुण्यश्लोक धर्मराज आहे व हे आह्मी चौघे त्याचे बंधु आहों. सैरंध्री ही द्रौपदी होय हें ऐकून विराट सद्गदित झाला. तो पांडवांस नमस्कार करून ह्मणाला, अज्ञानानें माझ्याकडून आपले बहुत अपराध घडले. त्यांची मला तुह्मी क्षमा करावी हा राज्याचा तुह्मीच स्वीकार

करावा. माझी कन्या उत्तरा हिचा अर्जुनानें अंगीकार करावा. तें ऐकून धर्मानें विराटाचें समाधान करून अर्जुनाकडे पाहिलें. अर्जुन ह्मणाला उत्तरा ही मला कन्येप्रमाणें आहे. ह्याकरितां ही माझा पुत्र अभिमन्यु ह्याची स्त्री होईल. तें विराटानें मान्य केलें. नंतर उपप्लव्य नगरांत मोठ्या समारंभानें अभिमन्यु व उत्तरा ह्यांचा विवाह झाला.

अच्युत- पदासि चिंतुनि सानुज धर्म स्ववेष घेऊनी ॥
सुदिनीं बसे नृप- पदीं त्या मत्स्याच्या सभेंत येऊनी ॥१॥
मागुनि विराट येउनि हांसोनि ह्मणे "सभासदा कंका ॥
भद्रासनीं बसाया आजि तुज कसी न वाटली शंका"॥२॥
अर्जुन, ह्मणे नृपा हा हरिच्या अर्धासनीं बसायाचा ॥
आहे प्रताप- महिमा विख्यात जगत्रयीं असा याचा ॥३॥
गंधर्वांसि हरि ह्मणे याचींच यशें करूनि तांडव गा ॥
हा पुण्यश्लोक[1] प्रभु सम्राट्[2] सद्गुण-समुद्र पांडव गा"॥४॥
मत्स्य ह्मणे "पांडव हा- तरि भीमप्रमुख बंधु जे चवघे ॥
कोठें? कृष्णा कोठें? जीस क्षणहि न विसंबिती अवघे"॥५॥
पार्थ ह्मणे "सूद[3] तुझा बल्लव मगधेंद्रकाय[4] हा चिरिता ॥
करिता झाला सूता- न्वयसागर[5] भीम- काय[6] हाचि रिता ६

१ पुण्यप्रद कीर्ति ज्याची, तो. २ ज्यानें राजसूययज्ञ केला व जो द्वादशमंडलाधीश, तो सार्वभौम राजा. ३ आचारी. ४ जरासंधाचें शरीर. ५ कीचकाचा वंश, हाच समुद्र. ६ भयंकर शरीर ज्याचें, तो.

हयपाळ जो नकुळ तो, गोपाळक तोचि होय सहदेव॥७॥
सैरंध्री हे कृष्णा, मेले कीचक इला अनादरिते ॥
हे किति हर- मुरज उदाधे व्हावे क्षोभें इच्या अनादरिते ८
अज्ञात-वास दुर्घट परि निर्विघ्न त्वदाश्रयें घडला ॥
होतों सुखरूप तुझ्या गर्भांत श्रम न लेशही पडला"॥९॥
उत्तरहि पांडवांतें वर्णुनि कळवी पुन्हा स्वजनकास ॥
कीं "हेचि घालणारे व्यसनीं तारावया स्वजन कास"१०
भूप ह्मणे "त्वां अर्जुन पूजावा सर्वकाळ भीमहि म्यां ॥
न असत्य, हरिजनाच्या सोडुनियां गर्व काल भी महिम्या॥
वत्सा काय वदों रे धर्मात्मा धर्म हा असा मान्य ॥
म्यां ताडिला ललाटीं अक्षें अपराध हा असामान्य ॥१२॥
सचिवांहीं म्यां त्वांहीं प्रार्थावा धर्मराज, कन्या या ॥
द्यावी धनंजयाला पोटीं घालावयासि अन्याया"॥१३॥
उत्तर ह्मणे:"बहु बरें नकळत अपराध घडति, परि साचे॥
साधु क्षमी यशस्कर, घनंहि सुभूषेंत पडति परिसाचे"॥१४॥
भेटे विराट राजा त्या पांचां पांडवांस गुरुसाच ॥
व्यसनांत आश्रय-प्रद अन्न-प्रद होय वृद्ध गुरु साच ॥१५॥
धर्मासि ह्मणे"बाऽगा साधो जोडा नमचि या दिवसा ॥
स्वपदीं मच्चित्तींही संपादुनि सुकृत- जय-दयादि वसा ॥१६॥
तूंचि बळी स्वजनांसह तरलासि न वायुनंदन वनौका ॥

१ शंकराचा मृदंग. २ नादरहित. ३ परिसाचे घन सुभूषेंत पडती ह्म० परिसाला फोडणारा लोखंडाचे हातोडे सुवर्णमय होतात. ४वनचर.

वरिति सुमति सत्संगाति उतराया वार्धि[1] मंद नव नौका १७
तारुनि परासि तरतीं हरि-जन जें वर्णिलें असें कविनीं ॥
तें दाविलें मज तुह्मीं कुरुकुळसंततिसरोजिनी-रविनीं[2]॥१८॥
राज्यादि सर्व दिधलें तुज म्यां हें आपुलें असें ह्मण गा ॥
शशि[3]- चूड नको न ह्मणे धुतऱ्याचें-फूल वाहत्या भणगा
धर्मा धनंजय- वधू होउ ह्मणे धन्य भाग्य मत्तनया ॥
देसील मान वचना तूंचि प्रभु अन्य भाग्यमत्त न या"॥२०॥
पाहे धर्म धनंजय- वदनातें तेधवां, नर वदे तो ॥
तें परिसिते ह्मणति सुख याहुनि हरि- वेणुचा न रव देतो ॥
प्रेम तुझें आह्मांवरि ऐसेंचि दयासुधानदा राहो ॥
अभिमन्युची वधू हो ती माझी बा बुधा न दारा हो ॥२२॥
कांवि वरावी? वर्तत होती कीं एकवर्ष कन्यासी ॥
हरिजन- कथेंत शिरतां न विशंकावे शुकादि संन्यासी २३
तो साधु- जनां तोखद ओखदसा होय खळ- जना भावा ॥
योग्य तुला जामाता बहिश्चर प्राण जळज-नाभाचा"॥२४॥
मत्स्य ह्मणे "बा धर्मा- वंद्य तुझें नंदना वना शील ॥
त्रिजगदघातें[7] तुमचें पुण्य-लता-कन्द नाव नाशील ॥ २५ ॥

---

१ समुद्र. २ कौरववंशाची वृद्धि हीच कमालिनि,तिचे सूर्य. ४ शंकर. ऐकणारे. ५ आनंदप्रद. ६ पद्मनाभ श्रीकृष्णाचा. ७ त्रैलोक्याच्या पातकाला. ८ पुण्यरूपवल्लीचा कंद, असें.

देवा सौभद्रार्थ स्वीकारावी तुह्मींच कन्या हो ॥
घ्या पदरीं हे सन्तति या सम्बन्धें जगांत धन्या हो''२६
धर्म ह्मणे ''बहु उत्तम हें मज अश्लाघ्य काय हा नातें ॥
मिळतां सुवर्ण-मुद्रा अर्थी इच्छील काय होनातें ॥२७॥
धाडूनि दूत धर्मे आप्तांला हा विवाह जाणविला ॥ ॥
अभिमन्यु राम कृष्ण द्रुपद स्वकुमार-वर्ग आणविला२८॥
आणुनि सम्पत्ति दिल्या· श्रीकृष्णें भक्त-नायका सारी ॥
तो आटतांचि आला· भेटाया मेघ काय कासारा ॥२९॥
अभिमन्यु-विवाहो-त्सव जग निववी, जेंवि चन्द्र पुनिवेचा ॥
धर्म ह्मणे ''हूं कनकें मणि बहु वस्त्रान्न-राशिहुनि वेचा ॥३०
नट-नर्तकी-गणातें धर्म ह्मणे ''राम-कृष्ण-गानाचा ॥
नृत्याचा रस शिवसे जाणति जे त्यांपुढेंचि गा नाचा''३१
भीम म्हणे वाढा हो स्वस्थपणें भूमिदेव जेवा जी ॥
चालूं नका बसाया घ्या व्हावे जे महेभ जे वाजी''३२॥
राम म्हणे ''घालाव्या कुडक्या चारीहि याच कानीं कीं ॥
मुनि भूषवितां भासे मूर्तस्वर्वृक्ष याचकानीकीं ॥ ३३ ॥
सहदेव नकुळ अर्जुन अच्युत बळ भीम धर्म नव्यांही ॥
त्या नात्यासि न विसरविति, ते गमति विराटबन्धु, न व्याहीं ॥

---

१ भक्तशिरोमणि धर्म, यास. २ बहुमूल्य. ३ पूर्णिमेचा. ४ रामाच्या आणि कृष्णाच्या यशाच्या गायनाचा. ५ ब्राह्मण हो. ६ मोठे हत्ती. ७ घोडे. ८ मूर्तिमान कल्पवृक्ष. ९ याचकसमूहांस १० नव्यालाही

श्रोतेहो वर्णावें किति, मज गप्पी असें वदाना कीं॥
स्वल्प उपप्लव्यपुरीं उत्सव, बहु होय हो तदा नाकीं३५॥
वदावि मयूराकरवीं श्रीराम विराटपर्व चवथें बा ॥
स्वल्प म्हणोनि न सोडी अमृताची शक्ति सर्व चव थेंबा ॥
रामघन सत्प्रसादा- ऽमृत जों जों बहु वळोनि वर्षतसे॥
तों तों भक्त मयूर स्वार्याकेका करूनि हर्षतसे ॥ ३७ ॥

१ रामरूप मेघ. २ उत्तम कृपा हेंच अमृत. ३ आपल्या आर्या हेच मयूरशब्द.

## मुंबईमध्यें.

" श्रीहरिवरदा " प्रिंटिंग प्रेसमध्यें छापिला.

# विराटपर्व.

| पृ. | ओ. | अशुद्ध | शुद्ध. | पृ. | ओ. | अशुद्ध. | शुद्ध. |
|---|---|---|---|---|---|---|---|
| ४ | ११ | ता राया | ताराया | ३४ | १५ | सरंध्रीची | सैरंध्रीची |
| ४ | १८ | प्रंथिक | ग्रंथिक | ३६ | ४ | हरवायया | हरवाया |
| ५ | ४ | सरखा | सखा | ३६ | ७ | यस स्वी | यशस्वी |
| ७ | १६ | विवत्री | विनवी | ३६ | ७ | आश्चर्यजिरतें | आश्चर्या नरतें |
| ८ | ११ | उर्वशी | अप्सरा | ३८ | ५ | मुख | मुख |
| ९ | २२ | क्षः | वृक्ष | ३९ | ४ | हरवूनि | हरवूनि |
| ९ | २२ | ारता | जारता | ३९ | १९ | नुसती. ६ | नुसत्या |
| ११ | १४ | निजा नाकीं. | निजाना कीं | ४० | ९ | सुलभ मोहर. | सुलभमोहरणा |
| ११ | १९ | वुयुन | वून | ४० | १८ | वरूनि | भरूनि |
| १४ | ५ | शृंगरस | शृंगाररस | ४० | २१ | म्याड | भ्याड |
| १४ | १८ | संकेतानें | संकेतानें | ४१ | २ | स्वीकाराग | स्वीकारानि |
| १५ | ४ | ज्ञातारी | ज्ञातान्याची | ४१ | ८ | वाहूनी | वाहूनी |
| १५ | ८ | भरासि | मरासि | ४१ | १३ | आलाबु | अलाबु |
| १६ | ७ | पाबेल | पावेल | ४२ | १२ | मद्गुज | मद्गुज |
| १८ | ९ | मुक केला | मुके कोल्हा | ४५ | १३ | क्लीव, क्षीव | क्लीब, क्लीब |
| १९ | ८ | ठकारें | टाकारें | ४६ | २ | शंख | शंख |
| २० | १ | कांतर | कातर | ४८ | ३ | त्यांतें | त्यांतें |
| २० | २ | वृंद्दासि | वृंद्दासि | ४८ | ६ | दरवा जे | दरवाजे |
| २० | ७ | भाला | घाला | ४८ | ७ | पर्यावसान | पर्यवसान |
| २० | २० | मिऱ्यांचीं | मिऱ्यांचीं | ५१ | १९ | मुखात | मुखांत |
| २३ | १२ | वृदंबुज | हृदंबुज | ५२ | १० | बिगुणाहि | विगुणाहि |
| २४ | ११ | भूमिगत | भूमिगत | ५२ | ११ | रतें | रत |
| २८ | ७ | पालक ताप | पालक-ताप | ५२ | १४ | छद्मयुतें | छद्मयुतें |
| ३० | १३ | स्वार्थयत्न | स्वार्थ यत्न | ५३ | ५ | सिंहासि | सिंहासी |
| ३० | १७ | गेले ले | गेलेलें | ५३ | २० | कारण्यासी | कारिण्यासी |
| ३३ | २१ | अर्जुनाचा | अर्जुनाची | ५४ | १० | वत् | वत् |
| ३४ | ९ | नुधडूनि | नुघडूनि | ५५ | ४ | आन्पायासें | अन्यायासें |
| ३४ | १० | मोधन | गोधन | ५५ | १८ | पुंड | पुंड |

| पृ. | ओ. | अशुद्ध. | शुद्ध. |
|---|---|---|---|
| ५७ | ३ | ध्वजस्थ | ध्वजस्थ |
| ६० | ७ | पुष्कळांत | दुष्काळांत |
| ६० | ११ | घंगुल | व्यंगुल |
| ६१ | २ | सर | शर |
| ६१ | ८ | अविप्र | अविप्र |
| ६१ | १२ | बिविध | विविध |
| ६१ | १९ | अनाडि | अनादि |
| ६२ | ९ | वृत्रघ्नाचीं | वृत्रघ्नाचीं |
| ६२ | ११ | ०द्विस्मय | ०द्विस्मय |
| ६३ | ८ | बळे | वळे |
| ६३ | ९ | स्वबळे | खवळे |
| ६३ | १४ | पपंपरा | परंपरा |
| ६४ | १० | भर | भरे |
| ६४ | ११ | बत्सा | वत्सा |
| ६७ | १० | कुरु गुरु- | कुरु-गुरु- |
| ६७ | १७ | संबंघ | संबंध |
| ६८ | १६ | पूर्णेंदु पांडुरा | पूर्णेंदुपांडुरा |
| ६८ | १७ | ०निज पूर्वज | ०निजपूर्वज |
| ६९ | १० | वहु | बहु |
| ६९ | २२ | वृद्धाला | वृद्धाला |
| ६९ | २३ | मुनींचें | मुनींचें |
| ७० | २ | घनु | धनु |
| ७० | ४ | हरिहर | हरिहर |
| ७१ | ४ | शिव तें | शिवतें |
| ७३ | १ | भल्ल | मल्ल |
| ७४ | ३ | वृद्धांफ | वृद्धांध |
| ७४ | ८ | कौरा | कोरा |
| ७४ | १४ | माणराहित | मानरहित |
| ७४ | १९ | मरा | रमा |

| पृ. | ओ. | अशुद्ध. | शुद्ध. |
|---|---|---|---|
| ७४ | २३ | आमल्या | आपल्या |
| ७४ | २३ | अंतपुरांत | अंतःपुरांत |
| ७५ | १० | ज | जैं |
| ७५ | १७ | (१) जसा | तसा |
| ७५ | २३ | बाणग्सुराला | बाणासुराला |
| ७६ | ५ | हसावें | हसावें |
| ७६ | ६ | सद्गुरु | सद्गुरु |
| ७६ | २३ | घोडचींना | घोडचांना |
| ७६ | २३ | अर्जुनाच्गा | अर्जुनाच्या |
| ७८ | १३ | भद्रवाहगती | भद्रवाह गती |
| टी. | ११ | मार्ग | चाल |
| ७९ | ४ | पिता | पित्या |
| ८१ | १२ | जमगांर्गे | मजमार्गे |
| ८१ | १८ | अक्षकराचें | अक्षकाराचें |
| ८२ | २ | हैं | हें |
| ८२ | ५ | उत्साहें | उत्साहें |
| ८४ | ११ | मदधा | मदघा |
| ८५ | १३ | कृपहि | कृपहि |
| ८६ | २१ | भुपाति | भूपति |
| ८८ | ४ | विराटानें | विराटानें |
| ८९<br>सु. | ५<br>ओ | अर्जुन बृहन्नडा मी भिडला<br>ज्या चापपाणि सहदेव ॥ | |
| ८९ | ९ | महिम्या | महिम्या |
| ८९ | २२ | सुवर्णमण | सुवर्णमय |
| ९० | ८ | तेधवां | तेधवां |
| ९० | १९ | शकर | शंकर |
| ९० | १९ | पद्मनभ | पद्मनाभ |
| ९२ | ७ | आर्य | आर्या |